टिळक महाराष्ट्रविद्यापीठ-ग्रंथमाला ६

टिळक महाराष्ट्र विद्यापीठानें वाङ्मयपारंगत ( एम्. ए. ) पदवीं
करितां मान्य केलेला

# ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास

लेखक
चिंतामण गणेश काशीकर,
वाङ्मयपारंगत

प्रथमावृत्ति १९३५

किंमत दोन रुपये

# भूमिका.



टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची वाङ्मयविशारद–पदवीपरीक्षा संस्कृत विषयांत उत्तीर्ण झाल्यानंतर पुढील अभ्यासाकरितां कोणता विषय घ्यावा असा प्रश्न पडला. जुना असूनहि ज्याचा अर्वाचीन दृष्टीनें अभ्यास करतां येईल असा विषय निवडणें जरूर होतें. या दृष्टीनें विचार करतां वेदवाङ्मय हा एकच विषय असा आढळला कीं, ज्यांत अर्वाचीन दृष्टीनें अभ्यास करण्यास पुष्कळ अवसर आहे. तेव्हां ऋग्वेदाचा संस्कृतिदृष्ट्या अभ्यास करून वाङ्मयपारंगत–पदवीपरीक्षेकरितां प्रबंध लिहावा असें ठरविलें. त्याप्रमाणें या विषयाचा दोन अडीच वर्षें अभ्यास केला आणि प्रबंध लिहून गेल्या वर्षी विद्यापीठास सादर केला, तो विद्यापीठाकडून मान्यहि करण्यांत आला तोच आज पुस्तकरूपानें विद्यापीठाकडून प्रकाशित करण्यांत येत आहे.

प्रथमच ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, ऋग्वेदकालाचा हा इतिहास संपूर्ण आहे असें समजण्याचें कारण नाहीं. याला अनेक कारणें आहेत. ऋग्वेदाचा अर्वाचीन दृष्टीनें अभ्यास सुरूं होऊन एक शतक लोटलें तरी ऋग्वेदाचा संपूर्ण आणि खरा अर्थ अद्यापि उलगडलेला नाहीं; आणि तो केव्हां उलगडेल हेंहि कोणी सांगूं शकणार नाहीं. अर्थात् अशा स्थितींत ऋग्वेदकालीन इतिहास लिहिण्याचा प्रयत्न कोणींहि कितीहि कसोशीनें केला तरी तो अपूर्ण आणि सदोषच रहाणार.

तथापि आज ऋग्वेदाचें आणि ऋग्वेदकालासंबंधींचें ज्ञान ज्या मर्यादेपर्यंत पोंचलें आहे तेथपर्यंत जाऊन इतिहास लिहावयाचा झाला तरीसुद्धां किती तरी अभ्यास व्हावयास पाहिजे. संस्कृतशीं संबंध असलेल्या जगांतील सर्व भाषांचा भाषाशास्त्राच्या दृष्टीनें अभ्यास, आर्यसंस्कृतीच्या समकालीन आणि तिच्याशीं संबद्ध असलेल्या इतर संस्कृतींचा अभ्यास, मानववंशशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र, ज्योतिषशास्त्र इत्यादि शास्त्रांचा अभ्यास इतकी पूर्व तयारी झाल्यानंतरच ऋग्वेदकालचा सापेक्ष संपूर्ण इतिहास लिहितां येईल. याकरितां या विषयावर इंग्रजी, फ्रेंच व विशेषतः जर्मन इत्यादि युरोपीय भाषांमध्यें आजपर्यंत जें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे तें सर्व अभ्यासावयास पाहिजे. कारण वेद-वाङ्मय हें आपलें असूनहि त्याचा सर्वांगीण अभ्यास त्यानींच आपल्यापेक्षां कितीतरी पटींनीं अधिक केला आहे. त्यांचे प्रयत्न पाहूनच अलीकडे गेल्या पन्नास वर्षांत हिंदुस्थानांत प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास थोडाथोडा होऊं लागला आहे. तेव्हां इतकी साधनसामुग्री संपादन करणें हें दीर्घ कालावधीचें काम आहे. दोनतीन वर्षांच्या अल्पकालांत अर्थातच तें होणें शक्य नाहीं. तथापि इंग्रजीमध्यें या विषयासंबंधीं जें वाङ्मय उपलब्ध आहे त्याचा बराचसा उपयोग प्रस्तुत प्रबंधांत करण्यांत आला आहे. ( वाचलेल्या किंवा उपयोगांत आणलेल्या ग्रंथांची यादी पुस्तकाच्या शेवटीं जोडली आहे ).

पदवी घेतल्याबरोबर एखाद्या विषयाचा स्वतंत्र आणि संशोधनपूर्वक अभ्यास करण्याची पात्रता येते असें मला वाटत नाहीं. ज्या विषयाचा अभ्यास करावयाचा त्याची पूर्वतयारी झाल्यानंतर पुढील अभ्यास त्या विषयाच्या विद्वानाच्या देखरेखी-खालीं होणें आवश्यक आहे. तरच तो अभ्यास सुसूत्र आणि परिपूर्ण होऊन त्यांत संशोधन होऊं शकेल. पाश्चात्य देशांत आणि इतर सर्वत्रहि उच्च पदवी घेतल्यानंतर सुद्धां संशोधनपूर्वक प्रबंध लिहावयाचा झाल्यास विद्वानांच्या देखरेखीखालीं अभ्यास करावा लागतो. अशा प्रकारचें दिग्दर्शन मला मिळूं शकलें नाहीं, आणि निवडलेल्या विषयाचा अभ्यास माझा मलाच स्वतंत्रपणें करावा लागला. अर्थात् या पुस्तकांत कांहीं नवीन संशोधन आढळेल अशी अपेक्षा वाचकांना करतां यावयाची नाहीं.

वेदकालीन इतिहासासंबंधीं मराठींत थोडेंसें वाङ्मय उपलब्ध आहे; परंतु ऋग्वेद-कालाचा संस्कृतिदृष्ट्या ऊहापोह करणारें स्वतंत्र असें पुस्तक मराठी वाङ्मयांत हें पहिलेंच आहे असें वाटतें. या दृष्टीनें ज्यांचा या विषयाशीं परिचय केवळ मराठींतूनच झाला आहे. किंवा व्हावयाचा आहे, त्यांना हें पुस्तक उपयुक्त वाटेल अशी अपेक्षा आहे. हिंदूंच्या आद्य धर्मग्रंथांपैकीं पहिला आणि महत्त्वाचा ग्रंथ म्हणून सामान्य वाचक ऋग्वेदाकडे आदर, गूढत्व आणि कुतूहल अशा संमिश्र भावनेनें दुरूनच दृष्टि-क्षेप करीत असतो. या पुस्तकानें त्याचा ऋग्वेदाशीं आणि तत्कालीन वातावरणाशीं बराच परिचय होऊन त्याची दूरत्वाची भावना बरीच कमी होईल.

बनारस हिंदु विश्वविद्यालयांतील डॉ. प्राणनाथ यांनीं प्राचीन हिंदी संस्कृतीसंबंधीं एक लेखमाला नुकतीच ७ जुलै १९३५ पासून ' इलस्ट्रेटेड वीक्ली ऑफ इंडिया ' मध्यें सुरू केली आहे. अर्थात् त्यासंबंधींचा विचार पुस्तकांत करतां आला नाहीं. त्यांचें विधान असें आहे कीं, प्राचीनकाळीं इ. पू. ४००० या कालांत इजिप्त ते उत्तर हिंदुस्थान या प्रदेशांत सुमेरियन लोकांची वसति होती. उत्तर हिंदुस्थानांतील पोटभाषा या प्राचीन सुमेरियिन भाषेतून निघालेल्या आहेत, संस्कृत भाषा ही सुमे-रियन, फोनीशियन, इजिप्शियन इत्यादि भाषांच्या मिश्रणापासून बनलेली आहे. ऋग्वेद हा एक सुमेरियन इतिहासाचा ग्रंथ आहे. कारण त्यामध्यें सुमेरिया आणि इजिप्त यांतील प्रांत, शहरें आणि तेथील इ. पू. ४००० ते इ. पू. १००० या कालांतील राजे यांचा उल्लेख आलेला आहे.

डॉ. प्राणनाथांच्या या विधानास संपूर्ण उत्तर यावयाचें झाल्यास सुमेरिया, इजिप्त इत्यादि देशांतील इतिहास त्यांच्या भाषेसह आणि लिप्यांसह निरीक्षावयास पाहिजे. परंतु वरवर पाहिल्यास सुद्धां त्यांचें विधान चुकीचें असल्याचें दिसून येणार आहे. त्यांनीं दर्शविलेल्या शाब्दिक साम्यांना भाषाशास्त्राचा निकष लावला पाहिजे. भाषाशास्त्राच्या दृष्टीनें शब्दांचीं स्थित्यंतरें यदाकदाचित् सत्य ठरलीं तरीसुद्धां केवळ शब्दसाम्यावरून एवढा मोठा सिद्धान्त काढणें धाष्टर्याचेंच म्हटलें

पाहिजे. ऋग्वेदांतील जेवढ्या शब्दांचें साम्य आढळलें तेवढे शब्द म्हणजे कांहीं संस्कृत भाषा नव्हे. त्या शब्दाव्यतिरिक इतर हजारों शब्द आणि मुख्यतः व्याकरण यांच्या भिन्नत्वाची व्यवस्था कशी लावावयाची हा महत्त्वाचा प्रश्न आहे. ऋग्वेद हा सुमेरियन इतिहासाचा ग्रंथ आहे असें म्हटलें तर सुमेरियाचा त्रोटक परंतु सुसूत्र इतिहास त्यांत सांपडावयास पाहिजे. तसा तो त्यांनीं दाखवून दिला तर त्यांचें म्हणणें मान्य करावें लागेल. सुमेरियन शहरें आणि राजे यांच्याशीं तुल्य दिसणारे ( ! ) कांहीं शब्द ऋग्वेदांत इतस्ततः विखुरलेले आढळले म्हणजे कांहीं सुमेरियाचा इतिहास ऋग्वेदांत सांपडला असें सिद्ध होत नाहीं. ज्या राजांचीं नांवें त्यांना ऋग्वेदांत आढळलीं आहेत त्यांचा काळ इ. पू. ४००० ते इ. पू. १००० असा तीन हजार वर्षांचा आहे. म्हणजे इ. पू. १००० नंतर ऋग्वेदांतील मंत्रांची निर्मिति झाली कीं तीन हजार वर्षांच्या कालांत मंत्ररचना होऊन त्यांचें ग्रथन इ. पू. १००० नंतर झालें ? पहिला विकल्प खरा मानला तर भाषाशास्त्र, ज्योतिषशास्त्र आणि इतर महत्त्वाचीं शास्त्रें यांनीं ठरविलेल्या ऋग्वेदकालाला अजिबात फांटा बसतो. दुसरा विकल्प खरा मानला तर तीन हजार वर्षांच्या प्रचंड कालांत मंत्रांच्या भाषेंत केवढा तरी फरक पडावयास पाहिजे होता ! एवढ्या मोठ्या कालांत भाषेमध्यें कांहीं फरक झाला नाहीं हें विधान भाषाशास्त्राच्या अगदीं विरुद्ध आहे. या दुसऱ्या विकल्पामध्यें आणखी एक आपत्ति अशी येते कीं, तीन हजार वर्षांच्या काळांत हे मंत्र ग्रंथरूपानें संगृहीत कसे केले गेले नाहींत ? आणि इतका दीर्घकालपर्यंत विस्कळित राहिलेले हे मंत्र इ. पू. १००० पर्यंत टिकले तरी कसे ? अशा प्रकारचे अनेक महत्त्वाचे आक्षेप डॉ. प्राणनाथांच्या या नवीन उपपत्तीवर येत असल्यामुळें ती विचारार्ह आहे असें वाटत नाहीं.

या पुस्तकाला ' ऋग्वेदकालीन संस्कृतिक इतिहास ' असें नांव दिलें आहे; त्यासंबंधानें विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. हा ऋग्वेदकालीन इतिहास आहे, हें स्पष्टच आहे. आतां संस्कृति या शब्दांत कशाचा अंतर्भाव होतो असें विचारण्यापेक्षां कशाचा अंतर्भाव होत नाहीं असें विचारणेंच सयुक्तिक होईल. तेव्हां मंत्रकर्त्या ऋषींच्या पूर्वपीठिकेपासून रचनाकाल संपेपर्यंतच्या कालाचें सर्व दृष्टींनीं अवलोकन या पुस्तकांत केलेलें आहे. यांतील बराचसा भाग वाचकांस साहजिकच नीरस वाटण्याचा संभव आहे. तथापि समाजाच्या बाल्यावस्थेकडे कुतूहलपूर्वक पाहणारास त्यांत थोडासा तरी वाचनीय भाग आढळेल अशी आशा आहे. ग्रंथांतील मजकुराची संपूर्ण कल्पना यावी म्हणून ' अनुक्रमणी ' सविस्तर दिली आहे. प्रत्येक परिच्छेदांतील मजकूर चटकन् ध्यानांत यावा म्हणून त्याचा सारांश परिच्छेदाच्या प्रारंभीं कोपऱ्यांत दिला आहे. शेवटीं सूचि जोडलेली आहे. अशा रीतीनें पुस्तक शक्य तों उपयुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे.

या प्रबंधाच्या लेखनाच्या कामीं अनेक ग्रंथकारांच्या बहुमोल अभ्यासाचा मीं

उपयोग करून घेतला आहे; तेव्हां त्यांचे आभार प्रथम मानले पाहिजेत. वैदिक संशोधन मंडळ पुणें, भारत इतिहास संशोधक मंडळ पुणें आणि सर परशुरामभाऊ कॉलेज पुणें, या संस्थांच्या चालकांनीं आपल्या ग्रंथसंग्रहांचा उपयोग करण्याची परवानगी दिल्याबद्दल त्यांचा मी आभारी आहें. टिळक महाराष्ट्र विद्यापीठानें माझा प्रबंध पुस्तकरूपानें प्रकाशित केल्याबद्दल त्यांचेंहि आभार मानणें माझें कर्तव्य आहे. शेवटीं, मतभिन्नत्वाला भरपूर वाव असणाऱ्या या पुस्तकाच्या बाबतींत नीरक्षीरविवेक आचरण्याबद्दल वाचकांना विनवून ही ' भूमिका ' समाप्त करतों.

मिति आषाढ शु॥ १५ शके १८५७<br>पुणें. ता. १६-७-१९३५ } चिं. ग. काशीकर

# प्रस्तावना

श्रीयुत चिंतामण गणेश काशीकर 'टिळक' विद्यापीठांतून उत्तीर्ण झालेले 'वाङ्मयविशारद' ह्यांनीं त्याच विद्यापीठातर्फे होणाऱ्या वाङ्मयविषयांतील 'पारंगत' परीक्षेकरितां 'ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास' हा उत्कृष्ट निबंध लिहून 'वाङ्मयपारंगत' ही पदवी मिळविली. हा निबंध आतां छापून प्रसिद्ध होत आहे म्हणून त्याला उपोद्घात ह्या दृष्टीनें चार शब्द मीं लिहावे अशी इच्छा श्री. काशीकर ह्यांनीं मजजवळ प्रदर्शित केली तेव्हां मला थोडें संकट पडलें. वैदिक वाङ्मयाचा थोडाबहुत अभ्यास जरी मजकडून झाला असला तरी 'पारंगत विषयक निबंधाला प्रस्तावना लिहिण्याइतका त्या विषयांत मी 'पारंगत' नाहीं असें माझें मन मला सांगत आहे; तथापि लेखकानें स्वतः प्रस्तावना न लिहिण्याची जी प्रथा हल्लीं पडली आहे तिला अनुसरून आणि विवाहसमारंभांत अक्षत देऊन निमंत्रण करण्याचें कार्य दुसऱ्याकडूनच करवावें लागतें इकडे लक्ष पोहोंचवून प्रस्तावनारूपानें प्रस्तुत चार शब्द लिहीत आहें.

प्रकृत निबंधाप्रमाणें ऋग्वेदकालीन समाज संस्कृतीचें यथातथ्य चित्र मनश्चक्षूंपुढें उभें करणारा ग्रंथ मराठींतच काय, परंतु इंग्लिश भाषेंतहि माझ्या अवलोकनांत आला नाहीं. ह्या निबंधाची भाषा प्रौढ तर आहेच पण विवेचनहि फारच मार्मिक असल्यानें जिज्ञासूंना तर हा निबंध उत्तम रीतीनें मार्गदर्शक आणि बोधप्रद होईल अशी खात्री वाटते. निबंधकारांच्या मताशीं माझीं मतें सर्वस्वीं नाहींत तरी बव्हंशीं जुळतीं अशींच आहेत. मतभिन्नता ही कोठेंहि असावयाचीच. भगवद्गीतेसारख्या सुगम ग्रंथाच्या अर्थासंबंधानें, धोरणासंबंधानें आणि तत्त्वासंबंधानें तीव्र मतभेद माजलेले आपण पाहतों; तेथें ऋग्वेदासारख्या अत्यंत प्राचीन आणि भाषादृष्टीनें अतिशय कठिण अशा ग्रंथाच्या अर्थासंबंधानें किंवा तत्कालीन संस्कृतीसंबंधानें बराच मतभेद झाला असता तरी त्यांत कांहींच आश्चर्य नव्हतें. वैदिक वाङ्मयावर इंग्लिश, फ्रेंच, आणि जर्मन इत्यादि भाषांतून शेंकडो ग्रंथ आणि तेहि अत्यंत विस्तृत असे आज उपलब्ध आहेत. वैदिक व्याकरण, वैदिक कोश, वैदिक विचारसरणी, वैदिक यज्ञमार्ग, वेदांचा कालनिर्णय अशा प्रत्येक मुद्द्याचें सांगोपांग विवरण करणारे ते ग्रंथ आहेत; त्यांत मॅक्समुलर, रोट, लुडविग, गेल्डनेर, ग्रासमान, हिलेब्रांट, बर्नूव्ह, म्युइर, वेबर, मॅकडोनेल, ओल्डेनबर्ग, श्रेडेर, विंटरनिट्झ आणि आपलेकडे लो॰ टिळक, श्री. पावगी, श्री. चिंतामणराव वैद्य, श्री. अतुलचंद्र, अय्यंगार इत्यादि अनेक विद्वानांनीं शेंकडों ग्रंथ लिहिले असतां मीं श्री. काशीकर ह्यांच्याच ह्या छोट्या निबंधाची शिफारस केली हा अतिशयोक्तीचाच एक प्रकार आहे असें देखील पुष्कळांस वाटेल. पण माझ्या म्हणण्याचा मुद्दा इतकाच कीं, सर्व गोष्टींचें

'थोडक्यांत' प्रमाणबद्ध आणि सुलभ असें विवेचन ह्याच निबंधांत आढळेल; आणि तज्ज्ञ होण्यासाठीं कोणकोणत्या ग्रंथांचें परिशीलन केलें पाहिजे हेंहि अभ्यासूच्या ध्यानांत येईल.

ऋग्वेदासंबंधानें पहिली नड त्यांतील शब्दांच्या अर्थाची होय. पेशः, शर्धः, यामन्, घृपुः, अज्मन्, सहः, रविः, अरावन्, वाजं, ऋनम्, तुविद्युम्नः, असे अनेकच काय पण शेंकडों शब्द व्युत्पन्न संस्कृतज्ञांसहि अपरिचित असतात. वैदिक भाषा ही एक निराळीच भाषा आहे. इंग्लिशमध्यें ज्याप्रमाणें 'स्पेन्सर'ची 'फेरी-क्वीन,' मराठीमध्यें जशी 'ज्ञानेश्वरी,' त्याचप्रमाणे संस्कृतांत ऋक्संहिता हा ग्रंथ अत्यंत जुनाट आहे. ऋक्संहितेंतील सूक्तें कमींत कमी ६००० वर्षांपूर्वीचीं आहेत असें लो० टिळक आणि बोनचे प्रो० याकोबी ह्यांनीं सप्रमाण सिद्ध केलें; असें असूनहि अजून त्याला युरोपियन तज्ज्ञांची ठाम संमति मिळाली नाहीं, बरीचशी मिळाली आहे. कारण तज्ज्ञ म्हणविणाऱ्या किंवा तज्ज्ञ समजल्या जाणाऱ्या युरोपियन विद्वानांची विचारसरणीच अशी कीं, ग्रीक संस्कृतीपेक्षां वैदिक संस्कृति श्रेष्ठ तर राहोच पण प्राचीनहि ठरतां उपयोगी नाहीं. हा हट्ट नव्हे, हा स्वभाव आहे. त्यांना इजिप्शन, असीरियन व ग्रीक संस्कृतीचें जितकें कोडकौतुक वाटतें, तितकें तें हिंदुसंस्कृतीविषयीं वाटत नाहीं. कांहीं सन्मान्य अपवाद वगळले तर युरोपियन मन हें संकुचित अशा राष्ट्रीय वृत्तीचें असतें, व त्याच मार्गाकडे त्याची प्रवृत्ति असते. हीच गोष्ट आपल्या इकडील शोधकांस माहीत नाहीं. त्यामुळेंच आपल्या इकडील बरेच विद्वान् युरोपियन विचारसरणीतील दोषांनाच बळी पडतात. उदाहरणार्थ, केल्टिक, जर्मन, सॅक्सन, लेटिश रशियन इत्यादि भाषांचें नातें संस्कृत भाषेशीं बळेंच जोडण्यांत येत असतें तें आपल्या इकडील मंडळी सरळपणें मान्य करतात. ऑल्टेरतुम्स्कुंड, गेस्सेलशाफ्ट, कुल्टुर अशा तऱ्हेचा शब्दसमूह वापणारा जर्मन, वॉ-जूद-मसिए अथवा व्हॉययॉशेर त्रूव्हेर्त यूँ ट्रेजॉर असें बोलणारा फ्रेंच, ह्यांच्या भाषेशीं संस्कृतचा संबंध बेलाशक जुळवून देतात हें केवढें आश्चर्य? दहा-पांच शब्द एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत जातात. लॅटिन व ग्रीक भाषांच्या द्वारा गेलेले पांच पंचवीस संस्कृत शब्द फ्रेंच मध्यें आढळतील. परंतु लॅटिन व ग्रीक भाषेंत मात्र संस्कृतशीं उच्चारानें व अर्थानें समान अशा शब्दांचा भरणा अधिक आढळतो. म्हणून त्यांचा संबंध संस्कृतशीं जोडणें एकवेळ क्षम्य ठरेल. जोऑन ( जीवः ), बॉयॉस ( वायुः ), बरॉस ( भारः ), फॉनॉस ( भानुः ), फॉस्फरस् ( भास्वरः ), सॉक्रतिस ( सुक्रतुः ) ॲरिस्टॉस ( अदिष्टः=अभंगः ), हेलियॉस ( सूर्यः ), हिम्न ( हिमः ), युफोनी ( सुभाषितिः ), हैप्नॉस ( स्वप्नः ), ह्याप्रमाणें बरेच ग्रीक शब्द संस्कृतशीं अर्थोच्चारानें सहज जुळतेसे दिसतात. ग्रीक भाषेची व्याकरणदृष्ट्या रचनाहि संस्कृतशीं जुळती आहे. तशीच गोष्ट लॅटिनची. पर्सोना ( पुरुष ), मेडियम् ( मध्यम ), मॉर्टिस्

( मृत्युः ), सर्पंट ( सर्पः ), न्युबिस् ( नभः ) असे अनेक लॅटिन शब्द संस्कृतशीं साम्य पावतात. परंतु ह्या भाषांचा संस्कृतशीं जन्यजनकभाव नाहींच, पण भगिनीभावहि असेल कीं नाहीं, ह्याची शंका आहे. संस्कृतशीं–वैदिक संस्कृतशीं खरा भगिनीभाव झेंद भाषेचा आहे. जर्मन–रशियनचा जर संस्कृतशीं संबंध असेल तर मग आरबीचाहि कां असूं नये ? परंतु आपल्या इकडील संस्कृतज्ञांना ग्रीक लॅटनची किंवा आरबी–हिब्रूची नुसती ओळखहि नसावयाची. युरोपियनांनीं झोकलेल्या गप्पांवरच ह्यांची भिस्त असणार. म्हणूनच युरोपियन लोकांचे चुकीचे धादांतहि आमच्या गळीं सिद्धांत म्हणून उतरतात. युरोपियन विद्वान् जें भाषासाम्य दाखवितात तें ठरीव तात्पुरतें. शास्त्रदृष्ट्या त्याची छाननी आतांपर्यंत तरी कोणी केलेली नाहीं.

ह्याप्रमाणें भाषासाम्याची वासलात लागल्यावर मुख्य प्रश्न ऋग्वेदाच्या स्वरूपाचा. ह्या बाबतींतहि युरोपियन विद्वानांचें पूर्वी अनुकूल मत नव्हतें. ऋग्सूक्तें हीं मागासलेल्या मनःप्रवृत्तींचीं सामान्य मनुष्याच्या अल्पसमजुतीचींच द्योतक आहेत असा त्यांचा ग्रह होता. परंतु लुडविगच्या भाषान्तरानें त्यांत बराच बदल झाला आहे. आपल्या इकडे तो मतभेद निराळ्या स्वरूपांत आहे. वेदकाळीं मांसाहारप्रचार सर्रास होता, बालविवाह नव्हता, विधवावपन नव्हतें, पुनर्विवाह रूढ होता इतकेंच नाहीं, मृतपतीच्या बंधूशींच भ्रातृजायेचा पुनर्विवाह होण्यास अडचण नव्हती. चातुर्वर्ण्यच काय पण मुळीं जातिभेदच नव्हता; पुनर्जन्माची समजूत नव्हती, मूर्तिपूजा माहीत नव्हती; वेदांचा अर्वाचीन दृष्ट्या विचार करणारांची विचारपद्धति अशी आहे. ह्याच्या अगदीं उलट मत बऱ्याच सनातनी पण्डितांचें आहे. त्यांत आंग्लविद्याविभूषित विद्वानहि आहेत. सनातनी हें नांव मात्र जरा चमत्कारिक वाटतें. जातिभेदाचा कट्टा पुरस्कर्ता आणि जातीजातींमध्यें उच्च–कनिष्ठ असे भेद तीव्रभावनेनें मानणारा असा जो मद्यमांसनिवृत्त ब्राह्मण अथवा ब्राह्मणेतर असेल त्याला हल्लीं सनातनी म्हणतात. त्याला पुनर्विवाह मान्य नसावयाचाच पण हींच मतें वेदांमध्यें प्रतिपादन केलीं आहेत असेंच तो म्हणत असतो. अर्थात् वेदांतील शब्दांच्या अर्थाची विलक्षण ओढाताण हाच ह्या वादविवादाचा स्वाभाविक परिणाम होतो. पुष्कळ तज्ज्ञ विद्वानांचें मत असें आहे कीं, अत्यंत प्राचीन काळीं किंवा ऋग्वेदकाळीं जातिभेद तर नव्हताच. परंतु चातुर्वर्ण्यहि अस्तित्वांत नव्हतें. निरनिराळ्या वर्गाचे लोक असणारच परंतु विवाह आणि खानपान ह्यांनीं तुटक झालेलें असें चातुर्वर्ण्य त्यावेळीं नव्हतें. ह्याच्या उलट ह्या मताचे जे प्रतिस्पर्धी ते असें निक्षून सांगणार कीं अगदीं असलाच जातिभेद त्या काळींहि होता. परंतु ऋक्संहितेंत फक्त पुरुषसूक्तांतील एकाच ऋचेशिवाय ' वैश्य ' आणि ' शूद्र ' हे शब्द अकरा हजार ऋचांमध्यें पुनश्च एकदांसुद्धां कां आले नाहींत ह्याचें समाधानकारक उत्तर मात्र त्याला देतां येणार नाहीं. ऋग्वेदांत ' राजा ' हा शब्द शेंकडो वेळां आला

असून ' राजन्य ' हा क्षत्रियार्थी शब्द पुनः दुसऱ्यानें आलाच नाहीं. फार काय पण "ब्राह्मण" हा शब्द देखील ऋग्वेदांत १०।१५ वेळांच आलेला आहे. राजन्य वैश्य, आणि शूद्र हे शब्द एकवार एकेच ठिकाणीं आले असल्यानें ऋग्वेदांत त्यांचा उल्लेख नाहींच असें समजलें पाहिजे. मग चातुर्वर्ण्याची सिद्धता कशी होणार ? शूद्रांचा तर नाहींच, पण त्रिवर्णाचा ओझरता उल्लेख ऋग्वेदांत आणखी एकदां आला आहे ( ८. ३५. १६ सूक्त पहा ). तेव्हां तीव्र जातिभेदवादी असें समजतो कीं, वेदावरून जर आतांच्या जातिभेदाचें समर्थन करतां न आलें तर तत्काळ धर्म बुडेल. सुधारक किंवा स्वैरवादी लोकांची समजूत अशी कीं, जर वेदावरून चातुर्वर्ण्य सिद्ध होऊं शकलें किंवा मांसाशनाचा निषेध ग्राह्य ठरला तर जग रसातळास जाईल. वेदांकडे अर्थात् ऋग्वेदाकडे पाहण्याच्या ह्या दोन्ही दृष्टि चुकीच्या आहेत. अमुक एक गोष्ट वेदकाळीं असलीच पाहिजे किंवा नसलीच पाहिजे असें ठरवूनच हे लोक वेदाच्या शब्दांची व्यर्थ फोडतोड करीत बसणार !

वेद आणि विशेषतः ऋग्वेदसंहिता ही मानवी समाजाच्या बाल्यावस्थेंतील निर्मिति नव्हे हें वेदसूक्तांवरूनच सिद्ध होणार आहे. त्याला दुसरा मार्गच नाहीं. अर्थात् कांहीं ऋचांचा सरळ अर्थ येथें देणें भागच आहे.

## मं. १ सूक्त ३१

' हे अग्निदेवा, पहिला ऋषि तूं आहेस. देवांचाहि देव आणि कल्याणकारी मित्र तूंच झाला आहेस; तुझ्या आज्ञेनुसार कर्तृत्वशाली आणि प्रतिभासंपन्न मरुत् हातांत झगझगीत भाले घेऊन ( भूमिवर ) अवतीर्ण झाले. हे अग्निदेवा, अगदीं पहिला आणि प्रमुख असा अंगिरांचा अभिमानी तूंच झालास. तुझें ज्ञान अपार. तूं सर्वव्यापी आणि अत्यंत प्रज्ञाशाली आहेस. हे अग्ने, भक्ताची कीर्ति प्रत्यहीं वाढवीत जाऊन त्यास तूं उत्तमोत्तम अशा अविनाशी पदावर स्थापन करतोस; आम्हां ज्ञानी भक्तांना ( इहजन्मीं आणि परलोकीं अशा ) दोन्ही जन्मांत उपयोगीं पडणारी समृद्धि आणि श्रेय अशीं दोन्ही तूं अर्पण करतोस. अग्निदेवा, तूं आमचा मार्गदर्शक, तूं आमचा उत्साहप्रद पिता; आम्ही तुझीं लेंकरें आहोंत. हे अजिंक्य देवा, वीरोत्तम असा तूं आपल्या आज्ञेचें यथायोग्य पालन करवितोस."

---

## मं. १ सूक्त ३२

"हे इन्द्रा, ज्यावेळीं सर्वांपेक्षां प्रबळ अशा अहीचा तूं वध केलास त्यावेळींच सूर्य, उषा, आणि द्युलोक हे दृग्गोचर झाले आणि तुझ्या समोर उभा राहूं शकेल असा कोणीहि शत्रु तुला उरला नाहीं. वृत्र हें नांवच क्रूर; तथापि त्याचा क्रूरपणा त्याच्या नांवापेक्षांहि जास्त होता पण इंद्रानें आपल्या वज्रानें जेव्हां त्याचे भुजदण्ड छेदून टाकले त्या वेळेस तो छिन्नबाहू अहि पृथ्वीवर पडला. सर्व चराचर सृष्टीचा प्रभु इन्द्र हाच

होय. सर्व प्राण्यावर त्याचीच सत्ता. ( आम्ही ) मानवांचा त्याचप्रमाणें चराचरांचा राजा तोच आहे; आणि रथाची धांव त्याच्या अरांना वेढून टाकते, त्याप्रमाणें हें अखिल विश्व इन्द्रानें वेढून टाकलेलें आहे. "

---

## मं. १ सूक्त १०२

"( इन्द्राचे ) बाहू गोधन जिंकून आणतात. त्याच्या कर्तृत्वशक्तीला सीमाच नाहीं. ( अमितक्रतुः ) तो अत्यंत श्रेष्ठ आणि प्रत्येक सत्कृत्यांत अगणित रीतींनें सहाय करण्यास समर्थ आहे. इन्द्राची कल्पनाहि कोणाला करतां यावयाची नाहीं. त्याच्या ओजस्वितेमुळें तो उपमायोग्य होऊन बसला आहे. हे प्रभो, तुझ्या ओजस्वितेचें प्रमाण तीन भुवनें आणि तीन देदीप्यमान लोक असें त्रिगुणित आहे. ह्या अखिल विश्वापेक्षांहि तूं अत्यंत मोठा आहेस. "

---

## मं. ३ सूक्त २७

" पहा, अग्नि मी आहें. मी जन्मतःच सर्वज्ञ. घृत हा माझा नेत्र. माझ्या मुखांत अमृत आहे. तीन तत्त्वांचें जे तेज तें मी. मीच रजोलोकाचें मापन करितों. मीच अविनाशी अशी तपनशक्ति; हवि म्हणतात तोहि मीच आहें. हे द्युलोक आणि पृथ्वीहो, तुम्ही सत्यवादी अग्नीस संतुष्ट करा. "

---

## मं. ८ सूक्त ८७

"इन्द्रा, तूं सकल विश्व आक्रमण करणारा आहेस. तूंच सूर्याला प्रकाशमान् करतोस. तूं परम थोर आहेस. विश्वाचा उत्पन्नकर्ता, विश्वाचा देव आहेस. आपल्या दीप्तीनें तूं स्वर्लोकाला प्रकाशित करून द्युलोकाच्या तेजोमय प्रदेशांत गमन करतोस. इन्द्रा, तूं अधार्मिक दुष्टांचा नाश करणारा, सज्जनांचीं मनें विकसित करणारा आणि द्युलोकांचा स्वामी आहेस. हे इन्द्रा, जलमार्गानें जाणारे लोक पाण्याच्या योगानेंच आराम पावतात, त्याप्रमाणें आम्हीं देखील आमच्या प्रबल वासनांना तुझ्या ठिकाणीं पोहोचवून स्वस्थ राहतों. तथापि वीराला असेंच तेज आम्हांला अर्पण कर आणि आमच्या अंगीं उत्कृष्ट शौर्य बाणेल असें कर.

तुम्ही सत्वसामर्थ्याची मनीषा धरणारे आहांत; म्हणून जगांत सत्य म्हणून जर कांहीं असेल तर त्याच सत्यस्वरूपानें इन्द्राची स्तुति करा. आतां "हा कोण आहे ? त्याला कोणीं पाहिलें आहे ? " असेंहि एखादा म्हणेल, पण स्वतः इन्द्रच आम्हांस सांगतो आहे कीं " हा पहा मी येथें आहें पहा, मीं यच्चयावत् वस्तुमात्राला आक्रमण करून टाकलें आहे. "

वरील सूक्तांवरून ऋग्वेदांच्या स्वरूपाची थोडीतरी स्पष्ट कल्पना येईल. ऋग्वेदांत भाकडकथा नाहींत, नुसतें अर्थशून्य कर्मकाण्ड नाहीं किंवा भलत्याच कोणाची तरी वाह्यात् स्तुतिहि नाहीं. ऋग्वेद हें भक्तिरसात्मक आणि वीराला योग्य असें स्फूर्ति-प्रेरित काव्य आहे. अर्थ करतांना एवढी गोष्ट पक्का लक्षांत ठेविली पाहिजे. वेदांचा उपयोग यज्ञाशिवाय कर्मकाण्डाशिवाय दुसरा नाहीं अशा समजुतीनें सायणाचार्यांनीं आपलें भाष्य लिहिलें. त्यामुळें यक्षस्, पृक्ष; वाजं, नमः श्रवः, इषः प्रयस् अशा भावनायुक्त अनेक शब्दांचा अर्थ त्यांनीं पुष्कळ वेळां हविरन्न असा केला; युरोपियन विद्वानांनीं त्यांतील 'हवि' टाकून केवळ अन्नाचाच स्वीकार केला आहे; आणि आमच्या इकडाल प्रो. नानासाहेब राजवाडे त्यांच्यासारखा एक धोरणी विद्वान् वरील शब्दांपैकीं प्रत्येक शब्दाचा अर्थ "धन, द्रव्य, पैसा" असाच करितो. त्यांतलें इंगित अगदीं साधें आहे, तें हें कीं, सायणाचार्य, प्रो. राजवाडे किंवा पाश्चात्य विद्वान् हे त्यांच्या **पूर्वनिश्चित धोरणाप्रमाणें** वेदाला **वळण** देऊं पाहतात, परंतु वास्तविक असें असावयास पाहिजे कीं, **वेदाचें स्वरूप** अगोदर जाणून नंतरच आपलें धोरण निश्चित केलें पाहिजे. म्हणजे इंद्र जसा भक्तांशीं बोलतो त्याप्रमाणें ऋग्वेद देखील आपलें हृद्गत अभ्यासू विद्यार्थ्याजवळ सांगून टाकून त्याची अंतःकरणवृत्ति खळवळून सोडील. अंतःकरणाची खळवळ हेंच ऋग्वेदाचें रहस्य आहे; आणि शब्दाचा अर्थ ठरवितांना तो शब्द ऋग्वेदामध्यें जितक्या ठिकाणीं आढळत असेल तितक्या ठिकाणीं वेदाचें स्वरूप विषय आणि संदर्भ पाहून जो योग्य अर्थ ठरेल त्याच्या तुलनेनेंच इतरत्र अर्थ-निश्चिति करणें हा एकच सयुक्तिक मार्ग आहे. तो अनुसरल्यास ऋग्वेदाच्या अर्थाचा उलगडा होण्यास विलंब लागत नाहीं.

त्याप्रमाणें अर्थ केल्यास ६००० वर्षांपूर्वीचा समाज त्याचा धर्म, लोकांचा स्वभाव, त्यांची संस्कृति, त्यांचे तत्त्वज्ञान इत्यादि गोष्टींचें यथातथ्य ज्ञान होतें. व त्याचा सद्यःस्थितीमध्येंहि उपयोग करून घेतां येईल. वेद जर आपणास मार्गदर्शक होणार नसतील तर त्यांची आवश्यकता तरी कोणती ? परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, आपल्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें वेदाकडून मिळतात. ऋग्वेदाचा विशेष तो हाच. कार्याकार्यव्यवस्थिति सहज समजावी म्हणून तर वेदाची जरूर. दुसऱ्या ठिकाणीं हा सल्ला मिळणार नाहीं. तेथें 'महाजनो येन गतः स पन्थाः' असला मोघम उपदेश आढळेल. कारण 'महाजन' कोण हें लचांड पुनः राहिलेंच. 'यानि यानि अस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि' ही श्रुतिच आहे; पण ती देखील मोघम. 'सत्य' म्हणजे काय, 'धर्म' म्हणजे काय, 'ऋत' म्हणजे काय, 'सदाचार' अथवा 'सुचरित' म्हणजे काय त्याचा पूर्ण उलगडा ऋक्संहिता आणि यजुर्वेदाचा मंत्रमय गद्य-भाग ह्यांत स्पष्टपणें केलेला आहे. ब्राह्मणग्रंथांमध्यें ह्या प्रकारचा आदेश किंवा उप-

देश अगदीं अल्प आहे. बहुतेक भाग निव्वळ यज्ञांच्या प्रक्रिया वर्णन करण्यांत व अनेक आख्यायिका सांगण्यांत खर्च झाला आहे. त्याकारणानें ' ब्राह्मणें ' हा वास्तवार्थानें वेद होऊं शकत नाहीं. तैत्तिरीय संहितेंतील ' ब्राह्मण-भाग ' आणि ऋग्संहितेंतून घेतलेल्या ऋचा वगळल्यास केवळ यजुर्वेदाचा असा अगदीं थोडा भाग शिल्लक राहतो. म्हणूनच ऋग्वेदाचें प्राथम्य आणि महत्त्व आहे. बाकी ऋग्वेद आणि यजुर्वेद ह्यांत तत्त्वतः भेद नाहीं, आणि कांहि नये. भेद आहे तो व्यावहारिक आहे आणि त्यांतच ऋग्वेदाला त्याच्या प्राचीनत्वामुळें, विस्तारामुळें, आकर्षकत्वामुळें आणि विषयविविधतेमुळें महत्त्व आहे. असो. निबन्धकारांनीं योग्य विषय निवडून आणि त्याचें थोडक्यांत परंतु साङ्गोपांग विवेचन करून प्राचीन इतिहासाच्या वाङ्मयांत महत्त्वाची भर घातली आहे. आणि वेदाच्या उज्ज्वल स्वरूपाचें आविष्करण करण्यास यथायोग्य साहाय्य केलें आहे. ह्याबद्दल महाराष्ट्रांतील सुबुद्ध जनतेकडून त्यांच्या परिश्रमांचें चीज होईल असा भरंवसा वाटतो.

रामचंद्र विनायक पटवर्धन.

# प्रकाशकाचे दोन शब्द



टिळक-महाराष्ट्र-विद्यापीठाचे एक वाङ्मयविशारद श्री. चिं. ग. काशीकर यांनीं ' वाङ्मय-पारंगत ' पदवीपरीक्षेकरतां ' ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास ' या विषयावर निबंध लिहून १९३४ च्या एप्रिलमध्यें परीक्षणाकरितां विद्यापीठास सादर केला. विद्यापीठानें त्याच्या परीक्षणाकरितां डॉ. वा. गो. परांजपे, एम्. ए. एल्‌एल्. बी., डी. लिट्., व 'श्रुतिबोध 'चे संपादक श्री. रा. वि. ऊर्फ बाबासाहेब पटवर्धन, बी. ए. एल्‌एल्. बी., या दोन विद्वानांना परीक्षक नेमलें व त्यांनीं सदर निबंध ' वाङ्मय-पारंगत ' पदवीकरितां पसंत केल्यावरून श्री. काशीकर यांना गेल्या पदवीदानसमारंभप्रसंगीं ' वाङ्मय-पारंगत ' ही पदवी देण्यांत आली. विद्यापीठाची 'पारंगत' (एम्. ए.) पदवी घेणारे हे पहिलेच पदवीधर असून त्यांचा प्रबंध आज विद्यापीठामार्फत पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यास आम्हांस आनंद वाटत आहे. श्री. काशीकर यांनीं आपली भूमिका निवेदन केली असून स्वतंत्र रीत्या केलेल्या त्यांच्या या अभ्यासाचें गुणदोषनिरीक्षण करणें हें चिकित्सक विद्वानांचेंच काम आहे व ते ते करतीलच अशी अपेक्षा बाळगणें अनाठायीं होणार नाहीं.

टिळक-महाराष्ट्र-विद्यापीठ ग्रंथमालेचें आज हें सहावें पुस्तक जनतेस सादर करण्यांत येत असून पूर्वीच्या पांच पुस्तकांना जसा जनतेकडून उदार आश्रय मिळाला, त्याचप्रमाणें याही पुस्तकास मिळेल अशी आशा आहे.

श्री. बाबासाहेब पटवर्धन यांनीं पुस्तकास विस्तृत प्रस्तावना लिहून विद्यापीठास उपकृत केल्याबद्दल त्यांचे व वेळ थोडा असूनहि छपाईचें काम वेळेवर व्यवस्थित करून दिल्याबद्दल आनंद छापखान्याचे चालक श्री. गो. ब. जोशी यांचे आभार मानून पुरें करतों.

टिळक म. विद्यापीठाचा चौदावा
पदवीदानसमारंभ
टिळकजयंति, आषाढ व॥ ६ शके १८५७
( ता. २१।७।३५ )

प्रकाशक

# अनुक्रमणी



# ऋग्वेदकालीन सांस्कृतिक इतिहास

## विभाग पहिला

## इन्डो-युरोपियन लोक

### प्रास्ताविक

ऐतिहासिक आणि प्रागैतिहासिक काल

हिंदुस्थानच्या इतिहासांत अगदीं पहिला 'ऐतिहासिक कालविभाग' म्हणजे ऋग्वेदकाल होय. इतिहास उपलब्ध करून देणारें प्रमुख साधन म्हणजे वाङ्मय, आणि हिंदुस्थानांतील प्राचीनतम वाङ्मय म्हणजे आर्यांचा आद्य धर्मग्रंथ-ऋग्वेद. म्हणून ऋग्वेदकाल हाच हिंदी इतिहासाचा आद्य कालविभाग म्हटला पाहिजे. वास्तविक इतिहासाच्या विषयांत 'पहिला काल' ही भाषा अनुपपन्नच आहे. कारण इतिहासाचा आदि कसा सांगतां येईल? तेव्हां जेथपासूनच्या कालाची सुसंगत माहिती उपलब्ध होऊं शकते, त्या कालास इतिहासाचा आदिकाल म्हणणें प्राप्त आहे. या दृष्टीनें पाहतां ऋग्वेदरचनेच्या पूर्वीच्या कालाचें सम्यक् ज्ञान करून देणारें कोणतेंहि वाङ्मयात्मक साधन उपलब्ध नसल्यानें ऋग्वेदकाल हाच हिंदी इतिहासाचा आदिकाल समजण्यांत येतो. ज्या कालांतील वाङ्मय उपलब्ध नाहीं, त्या कालांतील इतिहासाचें ज्ञान तौलनिक भाषाशास्त्र ( Comparative Philology ), तौलनिक पुरातत्त्वशास्त्र ( Comparative Archaeology ), तौलनिक मानववंशशास्त्र ( Comparative Ethnology ) व तौलनिक पुराणशास्त्र ( Comparative Mythology ) या अर्वाचीन शास्त्रांच्या शोधांमुळें हळुहळु उपलब्ध होत असलें, तरी तें सर्व त्या शास्त्रांवर उभारलेल्या तर्कांवर अधिष्ठित असल्यामुळें त्रोटक व अनिश्चित स्वरूपाचें असतें; किंबहुना, त्या शास्त्रावरून निघणारीं अनुमानें भिन्नभिन्न व कित्येक वेळीं

परस्परविरुद्धहि असूं शकतात. त्यामुळें अशा काळास 'ऐतिहासिक काल' ( Historic Period ) न म्हणतां 'प्रागैतिहासिक काल' ( Prehistoric Period )असें म्हणण्यांत येतें.

संस्कृत भाषेचा प्रागैतिहासिक ज्ञानावरील परिणाम

असें जरी आहे तथापि हिंदुस्थानच्या ऋग्वेदकालीन इतिहासाचें अवलोकन स्पष्ट आणि याथातथ्यानें करावयाचें असेल तर प्रागैतिहासिक कालाकडे प्रथम लक्ष्य दिलें पाहिजे. या बाबतींत पहिलें व सर्वांत महत्त्वाचें साधन म्हणजे तुलनात्मक भाषाशास्त्र. सन १७८९ साली बंगालचे सरन्यायाधीश सर वुइल्यम जोन्स यांनीं 'अभिज्ञानशकुन्तलम्' या कालिदासाच्या सुप्रसिद्ध नाटकाचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केलें तेव्हां या शास्त्राचा पाया घातला गेला. जोन्ससाहेबानीं जेव्हां हें नाटक वाचलें, तेव्हां संस्कृत भाषेंतील अनेक शब्दांशीं युरोपांतील कांहीं भाषांमधील शब्दांचें साम्य आहे, असें त्यांना आढळून आलें. या सर्व भाषा बोलणाऱ्या लोकांचा प्राचीन काळीं कांहीं तरी परस्परसंबंध असला पाहिजे, असा त्यांनीं निष्कर्ष काढला. अशा रीतीनें संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासानें जगांतील प्रमुख भाषांच्या साम्याचा शोध लागला व त्या शोधानें जागतिक इतिहासाच्या ज्ञानांत क्रांति करून टाकली; कारण त्याच्या योगानें त्या भाषा बोलणाऱ्या लोकांच्या प्रागैतिहासिक परस्पर संबंधांवर नवा प्रकाश पडला.

अर्वाचीन शास्त्रांचा उपयोग

जगांत सध्यां प्रचलित असलेल्या निरनिराळया भाषांचें व्याकरण, त्यांचे शब्दकोश, इत्यादींच्या तुलनेवरून त्या भाषा बोलणाऱ्या राष्ट्रांचा जो एकत्रित इतिहास उपलब्ध होतो, तो बव्हंशीं सत्य असतो असें समजण्यास हरकत नाहीं. परंतु एवढ्या एकाच प्रमाणावरून खरा इतिहास सांपडणार नाहीं. तुलनात्मक मानववंशशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र, तौलनिक पुराणशास्त्र इत्यादिकांचेंहि साहाय्य त्या बाबतींत मिळणें जरूर आहे. भाषांच्या सर्वांगीण तुलनेवरून ज्या ज्या लोकांचा इतिहास उपलब्ध होतो, त्या त्या लोकांचें वंशदृष्ट्या निरीक्षण करून तौलनिक मानववंशशास्त्र हें त्या इतिहासाला या दृष्टीनें मदत करतें. तसेंच त्या लोकांची संस्कृति व त्यांचा धर्म या बाबतींत तुलनात्मक भाषाशास्त्रावरून जीं अनुमानें निघतात, त्यांचें सत्यत्व ठरविण्याच्या

कामीं अनुक्रमें पुरातत्त्वशास्त्र व पुराणशास्त्र हीं उपयोगीं पडतात. या सर्व शास्त्रांचा शोध व त्यांचा अभ्यास प्रथम पाश्चात्य पण्डितांनीं केला, व या नवीन दृष्टीनें संस्कृत वाङ्मयाचा अभ्यासहि प्रथम त्यांनींच केला. परंतु त्याचा समग्र इतिहास पहाण्याचें या ठिकाणीं प्रयोजन नाहीं. अशा रीतीनें वाङ्मयात्मक प्रमाण नसलेल्या प्रागैतिहासिक कालांतील इतिहास या तौलनिक शास्त्रांवरून ज्ञात होतो. या दृष्टीनें ऋग्वेदरचनापूर्वकालासंबंधीं कोणती माहिती मिळते हें प्रथम पाहिलें पाहिजे.

भाषाशास्त्राचें अनुमान

व्याकरण आणि शब्दकोश यांच्या बाबतींत संस्कृत भाषेचा ग्रीक, लॅटिन, टयूटॉनिक, केल्टिक, स्लाव्होनिक आणि झेंद या भाषांशीं निकटचा संबंध आहे. म्हणून तुलनात्मक भाषाशास्त्रज्ञांनीं या सर्व भाषांच्या समूहाला 'इंडो-युरोपियन' असें नांव दिलें आहे. ज्याप्रमाणें फ्रेंच, स्पॅनिश व इटॅलियन या भाषा परस्परांच्या भगिनी आहेत, त्याप्रमाणें या सात भाषांचें एकमेकींशीं भगिनीत्वाचें नातें आहे; आणि ज्याप्रमाणें फ्रेंच, स्पॅनिश व इटॅलियन या भाषांचा मूळ लॅटिन भाषेशीं संबंध आहे, त्याप्रमाणें वरील सात भाषांचा एका अतिप्राचीन मूलभाषेशीं संबंध आहे. ही मूलभाषा बोलणारे लोक एकाच वेळीं एकाच ठिकाणीं रहात होते, ही गोष्ट निर्विवाद आहे. कारण त्याशिवाय त्या भाषांतील साम्याचा उलगडा होत नाहीं. मूलभाषा बोलणाऱ्या लोकांसंबंधीं विचार करतांना चालू भाषांतील शब्दांवरून त्या लोकांसंबंधीं कोणतें अनुमान निघतें तें सहजच समजेल व संस्कृत, झेंद, ग्रीक, लॅटिन, टयूटॉनिक, केल्टिक आणि स्लाव्होनिक या भाषा बोलणारे लोक एके काळीं परस्परांच्या सान्निध्यांत रहात होते, हा जो सिद्धांत वर सांगितला तो आपोआपच सिद्ध होईल.

## इंडो-युरोपियन लोक व वंशैक्य

इंडो-युरोपियन वंशानें एक नाहींत

आतां तत्पूर्वीं एका वादग्रस्त प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. तो प्रश्न असा कीं, मूलभाषा बोलणारे हे लोक एकाच मानववंशाचे होते, कीं भिन्न मानववंशांचे होते? या प्रश्नासंबंधीं पाश्चात्य विद्वानांमध्यें अनेक वर्षें मतभेद होते. तुलनात्मक भाषाशास्त्राचा उदय झाल्याबरोबर ज्या विद्वानांनीं त्याचा

अभ्यास केला, त्यांचें असें मत बनलें कीं मूलभाषा बोलणारे लोक ज्या अर्थी एकत्र रहात होते, त्याअर्थी ते एकाच मानववंशाचे होते. प्रख्यात जर्मन पंडित प्रो. मॅक्समुल्लर हे या मताचे अग्रणी होत. त्यांच्या समकालीन विद्वानांचेंहि मत त्यांच्याप्रमाणेंच होतें. परंतु मानवशास्त्रज्ञांना ( Anthropologists ) त्यांचें हें मत मान्य झालें नाहीं. दिवसानुदिवस प्रो. मॅक्समुल्लर यांच्या अनुयायांची संख्या कमी होत चालली व मूलभाषा बोलणारे लोक एका वंशाचे नव्हते हा सिद्धांत प्रस्थापित होऊं लागला. मानवशास्त्रज्ञांचा मुद्दा असा कीं, भाषेच्या एकत्वाचें प्रमाण वंशाचें एकत्व सिद्ध करण्याला पुरेसें नाहीं. त्यांची भाषा एक होती म्हणून वंशहि एकच होता, असें मानण्याचें कारण नाहीं. कांहीं लोक ही भाषा बोलत असावेत, त्यांनीं आपल्या शेजारच्या लोकांना जिंकलें असावें व त्यामुळें या जित लोकांनीं जेत्यांची भाषा उचलली असावी. कदाचित् जिंकणाऱ्या लोकांनींहि जिंकलेल्यांची भाषा आत्मसात् केली असेल. कदाचित् दोन्ही भाषांचें मिश्रणहि झालें असेल. अशा प्रकारचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आढळतात. यांतील कोणत्याहि परिस्थितींत वंश एक असेलच असें ठाम सांगतां येत नाहीं. कारण यांत दोघांचे वंश भिन्न राहिले असतील अगर कदाचित् दोघांचें मिश्रणहि झालें असेल. अशा स्थितींत भाषेचें एकत्व म्हणजे वंशाचें एकत्व असेलच असें निश्चित सांगतां येत नाहीं. सर्वांची भाषा एक असण्याला अनेक कारणें संभवतील. अशा रीतीनें भाषैकत्वावरून वंशैकत्व सिद्ध होऊं शकत नाहीं हा सिद्धांत सर्वसंमत होऊं लागला व आजमितीस तो पूर्णपणें प्रस्थापित झालेला आहे. अर्थात् मूलभाषा बोलणारे सर्व लोक वंशानें एक होते असें समजण्याचें कारण नाहीं. ' इंडो–युरोपियन लोकांच्या परस्परसंबंधांविषयीं अजूनसुद्धां पुष्कळ ढोबळ चुका होत असून त्या बऱ्याच प्रचलित आहेत. अद्यापिहि पुष्कळ लोक ' इंडो–युरोपियन मानववंश '–जो अस्तित्वांत नाहीं व कधींहि नव्हता–असा प्रयोग करतात. पुष्कळ वेळां असें म्हटलेलें ऐकूं येतें कीं, हिंदु, पारशी, रोमन, ग्रीक, जर्मन आणि स्लाव्ह हे लोक एकाच रक्ताचे आहेत व ते मूळ इंडो–युरोपियन मानववंशाचे आहेत. अशा प्रकारचे सिद्धांत हे उतावीळपणानें काढलेले होत. '*

---

* Winternitz—History of Indian Literature Vol. I. p. 5

वर उल्लेखिलेल्या सात भाषांची एक मातृभाषा होती असें म्हटल्यानंतर

मूलस्थानीयांना नांव काय द्यावें ?

ती भाषा बोलणाऱ्या लोकांना नांव काय द्यावें हा प्रश्न येतो. या लोकांस संबोधणारें 'आर्यन्' हें नांव प्रो. मॅक्समुल्लर यांनीं शोधून काढलें; व त्यांच्या वंशैक्यप्रतिपादक मताप्रमाणें तें ठीकहि होतें. कारण 'आर्यन्' लोक असा शब्द-प्रयोग केल्याबरोबर वंशकत्वाची कल्पना मनांत उभी राहते. परंतु ती कल्पना त्याज्य असल्यामुळें तें नांवहि त्याज्यच ठरलें. 'इंडो-जर्मानिक' ही संज्ञा क्लापरोथ् या जर्मन भाषाशास्त्रज्ञानें इ.स. १८२३मध्यें प्रथम उपयोगांत आणली. तिच्या शोधकाचें नांव अज्ञात आहे. प्रो. गायगेर यांच्या प्रतिपादनामुळें ही संज्ञा विशेष प्रचारांत आली. परंतु एकमेकींशीं संबंध असलेल्या सर्व भाषांचा तींत समावेश होत नसल्याकारणानें ती सदोष ठरली. वंशकल्पना न आणतां केवळ एक भाषा बोलणाऱ्यांचा वाचक शब्द म्हणून प्रो. रॅपसन् यांनीं केंब्रिज विश्वविद्यालयातर्फे प्रसिद्ध केलेल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत, बऱ्याचशा इंडो-युरोपियन भाषांत मनुष्यवाचक असलेला 'विरोस्' ( Wiros ) हा शब्द उपयोगांत आणलेला आहे. परंतु या शब्दाचा इतर कोणीं ग्रंथ-कारानें उपयोग केलेला नाहीं. 'इंडो-युरोपियन' ही संज्ञा डॉ. थॉमस यंगनें शोधून 'क्वार्टर्ली रिव्ह्यू' मध्यें इ. स. १८१३ मध्यें प्रसिद्ध केली. हाच शब्द सर्वत्र रूढ झाला असल्यानें तोच या ठिकाणीं वापरला आहे.

हे इंडो-युरोपियन लोक मूळ कोठें होते, या प्रश्नावरील मतभेदाइतके मतभेद व त्यावरील चर्चेइतकी चर्चा इतिहासांत दुसऱ्या कोठल्याहि विषया-वर झाली नसेल. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून आजमितीपावेतों या प्रश्नावर खल चाललेला आहे व त्यासंबंधीं अद्यापिहि विद्वानांत ऐकमत्य झालेलें नाहीं. या प्रश्नाचा विचार आतां करावयाचा आहे.

## इंडो-युरोपियनांचें आदिस्थान

भिन्नभिन्न लेखकांनीं सुचविलेलीं मूलस्थानें

इंडो-युरोपियनांच्या मूलस्थानासंबंधीं प्रारंभापासून आतांपर्यंत कोण-कोणतीं मतें मांडण्यांत आलीं आहेत हें प्रथम पाहिलें पाहिजे. इ. स. १८०६ च्या सुमारास जर्मन भाषाशास्त्रज्ञ अडेलुंग यांनीं हिंदुस्थानचें नंदनवन म्हणून प्रसिद्ध असलेला काश्मीर प्रांत हें इंडो-युरोपियनांचें मूलस्थान म्हणून

ठरविलें. मध्य–आशिया हें मूलस्थान असल्याबद्दलचें विधान जे. जी. ऱ्होड् यांनीं इ. स. १८२० मध्यें केलें. वेंदीदाद म्हणून झेंद अवेस्त्याचा जो भाग आहे त्यांत वर्णन केलेल्या भौगोलिक परिस्थितीवर या विधानाची उभारणी झालेली होती. श्लेगेल, पॉट, लासेन, जेकब ग्रिम, पिक्टेट, मॅक्समुल्लर इत्यादि अनेक पाश्चात्य विद्वानांनीं निरनिराळीं प्रमाणें देऊन या विधानास पुष्टि दिली. मध्य–आशियाविषयक सिद्धांतावर पहिला हल्ला डॉ. लॅद्‌म यांनीं चढविला. त्यांच्या मतें इंडो–युरोपियनांचें आदिस्थान युरोपांतच शोधलें पाहिजे. या सिद्धांतास हळुहळु अनुयायी मिळूं लागले. उरल पर्वताच्या पश्चिमेस व फ्रान्स आणि जर्मनीच्या उत्तर बाजूस युरोपखंडाचा जो भाग आहे तो मूलस्थान होय, असें प्रो. क्यूनो यांनीं प्रतिपादिलें. त्यांच्या प्रमाणांत भर टाकून पुष्कळ जर्मन व इतरदेशीय पंडितांनीं युरोपीय सिद्धांतास दुजोरा दिला. प्रो. गायगेरनीं जर्मनी हेंच मूलस्थान म्हणून प्रतिपादन केलें. बर्च, बीच व ओक या तीन वृक्षांचें अस्तित्व हा त्यांनीं आपल्या विधानास आधार घेतला. मध्य व दक्षिण युरोपालाहि कोणीं महत्त्व दिलें आहे.*

याशिवाय रशियन तुर्कस्तान, युफ्राटिस नदीच्या कांठचा प्रदेश, स्कँडिनेव्हिया, आइसलँड असे अनेक प्रदेश मूलस्थान म्हणून पुढें मांडण्यांत आले. प्रो. रॅपसन् यांनीं ऑस्ट्रिया हंगेरीपैकीं हंगेरीच्या आसपासचा प्रदेश इंडो-युरोपियनांचें मूलस्थान म्हणून कल्पिला आहे. पुणें येथील श्री. ना. भ. पावगी यांनीं 'आर्यावर्तिक होम अँड दी क्रॅडल् ऑफ ह्यूमॅनिटी' या पुस्तकांत भूगर्भशास्त्राच्या आधारावर आर्यावर्त हेंच आर्यांचें मूलस्थान म्हणून प्रतिपादन केलें आहे. त्यांचेच मुद्दे पुढें वाढवून इ. स. १९२१ सालीं कलकत्त्याचे डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं 'ऋग्वेदिक इंडिया' या पुस्तकांत तोच सिद्धांत मांडला. आदिस्थान ठरविणें हा प्रस्तुत पुस्तकाचा उद्देश नसल्यामुळें निरनिराळ्या स्थानांसंबंधींच्या प्रमाणांचा उल्लेख व त्यावर टीकात्मक चर्चा करण्याचें या ठिकाणीं प्रयोजन नाहीं. डॉ. वॉरेन यांनीं 'पॅराडाइज् फाउंड' या पुस्तकांत मूळ मनुष्यवसति उत्तरध्रुवाजवळ होती असा सिद्धांत मांडला. त्याचा अवलंब करून इ. स. १९०३ सालीं लो. टिळकांनीं 'आर्क्टिक होम इन् दी वेदाज्' हें सुप्रसिद्ध पुस्तक लिहिलें. ऋग्वेद आणि झेंद अवेस्ता यांतील बलवत्तर प्रमाणें आपल्या बुद्धिमत्तेनें शोधून काढून, भूगर्भशास्त्र, तौलनिक भाषाशास्त्र

* H. H. Bender–The Home of the Indo-Europeans

व पुराणशास्त्र यांच्या आधारें त्यांनीं आपला सिद्धांत जगापुढें मांडला. त्याचें जोरदार निरसन अद्यापि केलें गेलें नसल्यामुळें तोच या ठिकाणीं स्वीकारण्यांत आला आहे. इंडो-युरोपियन लोक एकाच मानववंशाचे-आर्यवंशाचे आहेत हें लो. टिळकांचें मत मात्र मागें दिलेल्या कारणास्तव स्वीकारतां येत नाहीं; तरी सुद्धां आर्क्टिक प्रदेशासंबंधींचा त्यांचा सिद्धांत स्वीकारण्यास बाध येत नाहीं. उत्तरध्रुव हें इंडो-युरोपियनांचें आदिस्थान ठरविण्याकरितां त्यांनीं जीं प्रमाणें दिलीं आहेत, तीं येथें विस्तारपूर्वक उल्लेखण्याचें कारण नाहीं; त्यांचें सिंहावलोकन येथें पुरेसें होईल.

उत्तरध्रुव-प्रदेशांतील हवामान

सुमारें दहा हजार वर्षांपूर्वीं उत्तरध्रुवाजवळचा प्रदेश मनुष्यवस्तीस पूर्णपणें योग्य होता, असें भूगर्भशास्त्राच्या आधारानें सिद्ध होतें. भूगर्भशास्त्राच्या बाबतींत अनेक शास्त्रज्ञांचे भिन्नभिन्न किंबहुना विरुद्ध तर्क असले तरी अलीकडे उपलब्ध झालेल्या प्रमाणांवरून त्या प्रदेशांतील हवामान चांगलें होतें, याबद्दल सर्वांचें एकमत आहे. हल्लीं तो सर्व प्रदेश हिममय आहे. त्या प्रदेशांत निदान तरी दोन भिन्न काळीं हिमवृष्टि झाली. या दोन हिमवृष्टींच्या मधल्या कालांत तेथील प्रदेश मनुष्यवस्तीस व वनस्पतींच्या वाढीस योग्य होता. जमीन आणि पाणी यांचें जें प्रमाण हल्लीं त्या प्रदेशांत आहे, त्याहून भिन्न प्रमाण हिमयुगांच्या मधल्या कालांत ( Interglacial Period ) तेथें होतें. उन्हाळा व हिंवाळा हे ऋतु तेथें सौम्य होते. क्रांतिवृत्तावरील प्रदेशांत ( Tropical Countries ) ज्या वनस्पति उगवतात त्या सर्व तेथें अस्तित्वांत होत्या.

खगोलविषयक परिस्थिति

अवेस्त्यांतील विधानाप्रमाणें उत्तरध्रुवाच्या अगदीं टोंकाच्या प्रदेशांत एका वर्षांत एकच दिवस व एकच रात्र होती, व हल्लींहि आहे. तीनशेंपासष्ट दिवसांपैकीं एकशें चौऱ्याण्णव दिवस सूर्य आकाशांत असतो. म्हणजे साधारण हवामानाच्या प्रदेशांतील एकशें चौऱ्याण्णव दिवसांचा एक दिवस उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत असतो. उरलेल्या एकशें एकाहत्तर दिवसांची रात्र असते. ही संपूर्ण रात्र अंधकारमय नसते. दिवस सुरू होण्यापूर्वी सत्तेचाळीस दिवस अरुणप्रकाश व रात्र सुरू होण्याचे पूर्वीं अठ्ठेचाळीस दिवस संधिप्रकाश असतो. अशा रीतीनें पूर्ण अंधारी अशी रात्र फक्त

शहात्तर दिवसांची असते. सूर्य दक्षिणेकडे उगवतो. तारे उगवतहि नाहींत आणि मावळतहि नाहींत; तर क्षितिजाभोंवतीं फिरत रहातात. आकाशाचा उत्तरगोलार्ध नेहमीं दिसत असतो व दक्षिणगोलार्ध नेहमीं अदृश्य असतो सबंध वर्षांत एक दिवस, एक रात्र, एक सकाळ आणि एक सायंकाळ असते. अरुणप्रकाश आणि संधिप्रकाश क्षितिजाभोंवतीं फिरत रहातात आणि चोवीस तासांत त्यांचें एक वर्तुळ पुरें होतें. उत्तरध्रुवापासून कांहीं अंतरावर असलेल्या प्रदेशांत ( Circumpolar regions ) याहून थोडी निराळी परिस्थिति असते. एक प्रदीर्घ दिवस, एक प्रदीर्घ रात्र आणि कांहीं सामान्य दिवस व रात्री यांनीं तेथील वर्ष बनलेलें असतें. सूर्य दक्षिणेकडेच उगवतो. ताऱ्यांपैकीं पुष्कळसे उत्तरध्रुवप्रदेशाप्रमाणेंच गोल फिरतात; बाकीचे उगवतात आणि मावळतात. कारण त्यांच्या गतीचें वर्तुळ किंचित् कलतें असतें. अरुणाचा आणि संध्येचा प्रकाश उत्तरध्रुवाच्या प्रदेशापेक्षां कमी काळ रहातो. अशा प्रकारची भौगोलिक परिस्थिति उत्तरध्रुवाच्या व तत्सान्निध प्रदेशांत असते व हिमयुगांच्या मधील काळांत ती तशीच होती.

प्रदीर्घ दिवसरात्रींचे उल्लेख हिंदु आणि पारशी वाङ्मयांत आहेत.

प्रदीर्घ दिवस आणि रात्र यांचे उल्लेख संस्कृत वाङ्मयांत व झेंद अवेस्त्यांत सांपडतात. संस्कृत वाङ्मयांतील मेरु पर्वताची कल्पना उत्तरध्रुवापासूनच आलेली आहे. उत्तरायण आणि दक्षिणायन ( देवांचा दिवस आणि रात्र ) व देवयान आणि पितृयाण मार्ग या ज्या कल्पना आपल्या प्राचीन वाङ्मयांत आहेत, त्यांचें मूळ उत्तरध्रुवावरील मोठा दिवस आणि मोठी रात्र यांतच सांपडतें. शुभ देवयान आणि अशुभ पितृयाण या कल्पना अवेस्त्यांतहि आहेत. पितृयाणांत अगर दक्षिणायनांत मरण येणें ही गोष्ट प्राचीन आर्य ( इंडो-इराणी लोक ) अशुभ मानीत असत. ( अजूनसुद्धां रात्रीं मृत झालेल्या देहाचा अंत्यसंस्कार उजाडल्याखेरीज करीत नाहींत. पारशी लोकसुद्धां मृत देह सूर्यप्रकाशांत आणून नंतर त्याचा अंत्यविधि करतात ). ग्रीक आणि नॉर्स वाङ्मयांतहि अशा प्रकारचा उल्लेख आहे. यावरून मोठया दिवसाचा आणि रात्रीचा परिचय इंडो-युरोपियनांना होता असें दिसून येतें.

ऋग्वेदांत उषादेवतेचें जें वर्णन आहे तें उत्तरध्रुव प्रदेशांतील उषःकालाशीं

ऋग्वेदांतील उषेचें वर्णन उत्तरध्रुवप्रदेशांतील आहे.

बरोबर जुळतें. एरवीं त्या वर्णनाचा उलगडाच होत नाहीं. ऋग्वेदांत ' उषासः ' असा बहुवचनी प्रयोग येतो. एवढेंच नव्हे तर ' तीस ही त्यांची संख्याहि त्यांत ( ऋ. सं. ६. ५९. ६ ) उल्लेखलेली आहे. अरुणप्रकाशाचें प्रत्येक वर्तुळ ही एक उषा होय. उत्तरध्रुवापासून असलेल्या अंतराच्या प्रमाणावर उषांची संख्या अवलंबून राहील. ज्या ठिकाणीं वसाति केली असतां तीस दिवस उषःप्रकाश दिसेल त्या ठिकाणीं सूर्य सात महिन्यांहून अधिक काळ क्षितिजावर असूं शकणार नाहीं. ऋग्वेदांतील आदितीची अगर सात आदित्यांची कथा व सूर्याचीं ' सप्तचक्र ' व ' सप्ताश्व ' हीं नांवें यांवरून सात महिन्यांचा सूर्यप्रकाश दिग्दर्शित होतो. उषादेवतेच्या सूक्तांतील वर्णन तेथील उषःकालाला लागू केलें म्हणजे त्या सूक्तांचा अर्थ सुसंगत लागतो. मोठा दिवस आणि मोठी रात्र यांचे सूचक असे बरेच उल्लेख संहिता व ब्राह्मण ग्रंथांतून आलेले आहेत. सामान्य अहोरात्रींची कल्पना तेथें केल्यास अर्थ बरोबर लागत नाहीं.

भृगु, अथर्वन् आणि अंगिरस हीं ऋषिकुलें इंडो-युरोपियनांच्या आदिस्थानांत होतीं. कारण ग्रीक व पर्शियन भाषांमध्यें हे शब्द आढळतात. यांपैकीं अंगिरसांचे ' नवग्वाः ' व ' दशग्वाः ' असे दोन प्रकार होते. याचा अर्थ असा कीं, अंगिरसांपैकीं कांहीं आपले यज्ञ नऊ महिन्यांत व कांहीं दहा महिन्यांत संपवीत. म्हणजे उत्तरध्रुवाजवळील ज्या प्रदेशांत ते रहात असत, तेथें अनुक्रमें नऊ व दहा महिने प्रकाश असे. कारण अंधारामध्यें यज्ञयाग करणें अशक्य होतें. ममता आणि उतथ्य यांचा मुलगा दीर्घतमस् हा ' दशमे युगे ' म्हणजे दहाव्या महिन्यांत अंध आणि वृद्ध झाला असतां त्याच्या मुलांनीं त्याला खड्डयांत टाकून दिलें; तेथून अश्विनौनीं त्याला सोडविलें. या ऋग्वेदांतील कथेवरूनहि दहा महिने प्रकाश असलेला प्रदेश प्रतीत होतो. दोन महिन्यांचा एक असे दहा महिन्यांचे पांच ऋतु ( पाद ) होतात. या दृष्टीनें ' पंचपाद ' असें वर्षाचें नामाभिधान ऋग्वेदांत ( ऋ. सं. १.१६४.१२ ) आढळतें. ' गवामयनम् ' हा याग वास्तविक एक वर्षपर्यंत चालावयाचा असतां तो दहा महिनेपर्यंतच ( तै. सं. ७. ५. १. १,२ ) कां चालविण्यांत येत असे ? बारा महिन्यांच्या यागाचें पुण्य दहा महिन्यांच्या

यज्ञसंस्थेंतील उत्तरध्रुवस्थानीय अवशेष

यागानें कसें मिळणार? याचें उत्तर असें कीं हा याग ज्या ठिकाणीं प्रथम सुरू करण्यांत आला, तेथें दहा महिन्यांचें वर्ष होतें. म्हणजे वर्षांतून दहा महिने तेथें सूर्यप्रकाश होता. पुढें लोक नेमस्त प्रदेशांत उतरल्यावर सामान्य दिवसरात्रींनीं बनलेलें बारा महिन्यांचें वर्ष झालें, तरी सुद्धां रूढी-मुळें एक वर्षपर्यंत चालवावयाचा यज्ञ दहा महिनेच चालविण्यांत येऊं लागला.

इंद्र–वृत्रकथा ऋग्वेदांत अनेकवार आली आहे. तिचे चार भाग पडतात.

इंद्र-वृत्रयुद्ध

( १ ) हें युद्ध इंद्र व वृत्र यांमधील आहे. वृत्राच्या ऐवजीं प्रसंगोपात्त नमुचि, शुष्ण, शंबर इत्यादि नांवें आलीं आहेत. ( २ ) नद्या किंवा जलसंचय या स्वरूपांतील जलाकरितां हें भांडण आहे. ( ३ ) गाई परत मिळण्याकरितां हें युद्ध आहे. ( ४ ) प्रकाश मिळविण्याकरितां हा झगडा आहे. या चारी गोष्टींचा एकाच वेळीं योग्य उलगडा ज्याच्यायोगें होईल तें स्पष्टीकरण खरें असें म्हटलें पाहिजे. निरुक्तकार यास्क, सायण, मॅक्समुल्लर इत्यादींनीं निरनिराळया उपपात्ति मांडून या कथेचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु कोणाच्याहि उपपत्तीनें या चार भागांचा एकाच वेळीं स्पष्ट उलगडा होत नाहीं.

त्याचें स्पष्टीकरण

'स्वर्गीय जलाचा' ( दिव्याः आपः ) उल्लेख ऋग्वेदांत व पुढील वाङ्मयांत आला आहे. पृथ्वीच्या सभोंवतालचा, वरचा आणि खालचा प्रदेश स्वर्गीय जलानें व्याप्त आहे अशी वैदिक ऋषींची कल्पना होती. त्यांची अशीहि कल्पना होती कीं, आकाश हें त्या जलानें ( Watery vapours ) व्याप्त झालेलें आहे, आणि चंद्रसूर्यादिकांना जी गति आहे ती त्या आंतरिक्ष जलामुळेंच ( Celestial waters ) मिळते. हें जलतत्त्व सदैव वरून खालीं आणि खालून वर असें वर्तुलाकार फिरत असतें. हें जल केव्हां केव्हां नद्या किंवा प्रवाह अशा स्वरूपाचें कल्पिलेलें आहे. हे प्रवाह अंतरिक्षांत वहात असतात व ते वरुणाच्या मुखांत किंवा पाताळांतील समुद्राला मिळतात. पाताळ ( Nether world ) हें या प्रवाहांचें मूलस्थान होय. वरुणाचें व यमाचें साम्राज्य आणि वृत्राचें गुप्त स्थान हेंच होय. पारशी ग्रंथांत या पाताळाचें चांगलें वर्णन केलेलें आहे; आणि त्या ठिकाणीं ( Bundahish 20–4 ) एक विशेष गोष्ट अशी सांगितली आहे कीं, जल आणि प्रकाश यांचें उत्पत्ति-

स्थान एकच आहे. त्यांत सूर्याला जलमार्गावरून वर आकाशांत येण्यास सांगितलें आहे. म्हणजे जलप्रवाहामुळें सूर्यादिकांना गति मिळते. अर्थात् जलप्रवाहाची गति थांबली कीं, प्रकाशाचीहि आपोआपच थांबली. तेव्हां रजोलोकांत ( Lower Hemisphere ) लपलेला वृत्र जलप्रवाहाच्या वर येण्याच्या गतीला प्रतिरोध करी. जलप्रवाह वर येईनासा झाला कीं, सूर्यादि तेजोगोलांचीहि वर येण्याची गति थांबलीच. आणि इंद्राचा वृत्रावरतीं जय असा कीं, तो त्या पाण्याचा मार्ग वृत्रापासून मोकळा करीत असे. त्यामुळें जलप्रवाह वर येई व त्याबरोबर सूर्यादि ज्योतीहि उदयाचलावर येतां इंद्रानें सोडविलेल्या गाई म्हणजे दिवस किंवा सकाळचे सूर्यकिरण समजण्यास हरकत नाहीं. अशा प्रकारचें इंद्र-वृत्रयुद्ध साहाजिकच दरवर्षी चालत असे; व तसे उल्लेखहि आहेत. ऋ. सं. २.१२.११ या मंत्रांतील ' चत्वारिंश्य-शरदि ' या पदावरून असें दिसतें कीं, इंद्रवृत्रयुद्ध दरवर्षी शरदृतूंतील चाळी-साव्या दिवशीं सुरू होत असे. त्याकाळीं वर्षारंभ शरदृतूंत असे. म्हणजे एका वर्षापैकीं वसंत, ग्रीष्म आणि वर्षा या तीन ऋतूंचे एकशेंऐशीं व शरदृतूचे चाळीस मिळून दोनशेंवीस दिवस सूर्यप्रकाश त्या ठिकाणीं होता.

विष्णूचीं तीन पावलें म्हणजे काय ?

विष्णूच्या तीन पदांचा उल्लेख ऋग्वेदांत अनेकवार आला आहे. त्याचीं दोन पावलें मनुष्यांना दिसतात, परंतु तिसरें मनुष्यांच्या दृष्टीपलीकडे आहे. विष्णु ही सूर्यदेवता ( Solar deity ) आहे. विष्णूचीं तीन पदें म्हणजे सूर्याच्या वार्षिक गतीचे तीन भाग होत. वर्षाचे दोन भाग सूर्य क्षितिजावर असल्यामुळें मनुष्यांना दिसत होता, परंतु तिसऱ्या भागांत जेव्हां तो क्षितिजाखालीं जाई आणि दीर्घकालपर्यंत सर्वत्र अंधार होई, तेव्हां सूर्याच्या गतीचा तिसरा भाग म्हणजे विष्णूचें तिसरें पाऊल अदृश्य आहे अशी कल्पना केली गेली.

आर्क्टिक उपपत्तीमुळें पुष्कळ कथांचें स्पष्टीकरण होतें.

आंधळे, पांगळे इत्यादि पीडितांना मदत करून त्यांना सोडविणें हें ' अश्विनौ ' चें मुख्य कार्य आहे. दुःखित व्यक्ति म्हणजे क्षितिजाखालीं गेलेला सूर्य, व अश्विनौ म्हणजे त्याला क्षितिजावर आणणारे उषेचे अग्रदूत अशी कल्पना केली म्हणजे अश्विनौच्या सर्व कथांचा योग्य रीतीनें उलगडा होतो. त्रित आप्त्य, बृहस्पति, इत्यादींच्या

वैदिक कथा, रामायणांतील दशरथादि व्यक्ति व पुराणांतील दशावतारादि कथा इत्यादींचें बरोबर स्पष्टीकरण या आर्क्टिक उपपत्तीमुळें होतें. त्याचप्रमाणें अवेस्त्यांतीलहि पौराणिक कथांचा उलगडा या उपपत्तीमुळें उत्तम रीतीनें होतो. एवढेंच नव्हे तर आर्क्टिक महासागराजवळील प्रदेशांतील स्मृतींचे अवशेष युरोपांतील ग्रीक, लॅटिन, ट्यूटॉनिक, स्लाव्होनिक आणि केल्टिक वाङ्मयांतील पौराणिक कथांतून पहावयास सांपडतात, आणि त्या कथांचें स्पष्टीकरण आर्क्टिक उपपत्तीमुळें निर्दोष रीतीनें करतां येतें.

अशा रीतीनें, आर्क्टिक मूलस्थानासंबंधींची डॉ. वॉरेन यांनीं मांडलेली उपपत्ति भूगर्भशास्त्र, तौलनिक भाषाशास्त्र आणि पुराणशास्त्र व ज्योतिषशास्त्र यांच्या आधारानें लो. टिळकांनीं दृढतर केली आहे. डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं आपल्या पुस्तकांत या उपपत्तीवर असा आक्षेप घेतला आहे कीं, उत्तरध्रुवाजवळ आर्यांची वसति एके काळीं होती एवढी गोष्ट यामध्यें सिद्ध होते; परंतु तेंच त्यांचें मूलस्थान होतें ही गोष्ट त्यावरून सिद्ध होऊं शकत नाहीं. परंतु हा आक्षेप निराधार आहे. अर्वाचीन शास्त्रांच्या आधारानें आक्षेपकानें आर्यांचें, किंबहुना इंडो-युरोपियनांचें अन्य मूलगृह प्रथम सिद्ध केलें पाहिजे. त्यानंतर तेथील सर्व लोक कांहीं विशेष कारणानें उत्तरध्रुवाकडे गेले असें दाखविण्याची जबाबदारी त्याच्यावर पडते. कांहीं लोक तिकडे गेले व कांहीं स्वस्थानीं राहिले असें म्हणून चालणार नाहीं. कारण तेवढेच कां गेले आणि बाकीचे मूलस्थानीं कां राहिले असा प्रश्न पुनः उद्भवतो. सर्वच लोक उत्तरध्रुवाकडे गेले असें सिद्ध करण्याच्या आवश्यकतेचें आणखी एक कारण असें कीं आर्यांच्या ( इंडो–इराणी ) किंबहुना इंडो–युरोपियनांच्याहि वाङ्मयांत तशा प्रकारचे उल्लेख आहेत. या उल्लेखांचें स्पष्टीकरण योग्य रीतीनें करतां आलें पाहिजे. जे लोक उत्तरध्रुवाकडे गेले तेवढ्यांनींच ग्रंथरचना केली व म्हणून त्यांत उत्तरध्रुवासंबंधींचे उल्लेख आले असें म्हणणें शक्य नाहीं. कारण वाङ्मय हें सर्व जनतेचें प्रातिनिधिभूत असतें. आर्य मूळ हिंदुस्थानांतच होते हा डॉ. दासांचा सिद्धांत भूस्तरशास्त्रावर उभारलेला आहे. आवश्यक त्या अर्वाचीन प्रमाणांचा त्याला पाठिंबा नाहीं. सर्वच प्रमाणें त्यांच्या विधानाविरुद्ध आहेत. अशा रीतीनें पायाच ढांसळल्यावर त्यावरील त्यांच्या आक्षेपाची इमारतहि आपोआपच ढांसळून पडते.

आर्क्टिक उपपत्तीवरील आक्षेप

आर्क्टिक उपपत्तीवर दुसरा एक आक्षेप पाश्चात्य लेखकांकडून असा घेण्यांत येतो कीं, ज्या झेंद अवेस्त्यांतील उल्लेखांचे आधार घेण्यांत आले आहेत, त्याची रचना झरथुष्ट्रानें केली आहे व त्याचा काल फारफार तर इ. पू. १००० वर्षें हा आहे. परंतु झरथुष्ट्राचा काल अगोदर निश्चित नाहीं. दुसरें असें कीं, सर्व झेंद अवेस्त्याची रचना झरथुष्ट्रानेंच केली हें कशावरून ? व जरी केली असली तरी त्यांतील सर्व विधानें त्यानें स्वतःचीं अशीं केलीं, त्याच्या पूर्वीच्या वाङ्मयाचा त्यानें उपयोग केला नाहीं, किंवा प्राचीन वाङमय अवेस्त्यांत ग्रथित केलें नाहीं असें समजण्यास काय प्रमाण आहे ? तेव्हां हाहि आक्षेप जोरदार नाहीं. आर्क्टिक उपपत्तीवर कितीहि आक्षेप जरी घेण्यांत आले तरी दुसरी बलवत्तर उपपत्ति पुढें येईपर्यंत हीच उपपत्ति खरी धरून चाललें पाहिजे.*

दुसरा आक्षेप

## इंडो–युरोपियनांची संस्कृति

मागें लिहिल्याप्रमाणें मूलस्थानांतील संस्कृतीचें ज्ञान होण्यास तुलनात्मक भाषाशास्त्र हें प्रमुख किंबहुना एकच साधन उपयोगीं पडतें. परंतु हें साधन सर्वांशीं उपयोगीं पडत नाहीं असें लो. टिळकांचें मत आहे. ते म्हणतातः–

तुलनात्मक भाषाशास्त्राच्या प्रमाणांवरील लो. टिळकांचें मत

‘ उच्च संस्कृति असलेल्या मानवजातीचे लोक रानटी दशेप्रत पोंचतील ही गोष्ट सामान्यतः संभवनीय नाहीं. परंतु एखाद्या लोकसमूहाची जलप्रलयकाला-पूर्वीची ( Ante-diluvian ) संस्कृति व जलप्रलयकालानंतरची ( Post-diluvian ) संस्कृति यांच्या बाबतींत हा नियम लागू करतां येणार नाहीं. पहिली गोष्ट अशी कीं, जलप्रलयासारख्या संकटांतून फारच थोडे लोक वांचले असले पाहिजेत, आणि जे वांचले त्यांना मूळ प्रदेशांतील सर्व सुधारणा नेऊन त्या नव्या वसाहतींत अमलांत आणणें अशक्य झालें असलें पाहिजे; कारण अनार्य लोकांनीं व्यापलेल्या उत्तर युरोप आणि मध्य आशियांतील प्रदेशांत मूळ सुधारणा आचरणांत आणण्यास परिस्थिति अत्यंत प्रतिकूल होती. या नवीन प्रदेशांतील हवामान सध्यां नेमस्त असलें तरी हिमवृष्टि

* Dr. N. K. Dutt–Arctic Home in the Rgveda–Journal of the Department of Letters, Vol. XVII. Calcutta, 1928.

झाल्यानंतरच्या काळांत तेथील हवा अतिशय थंड झाली असली पाहिजे हीहि गोष्ट आपण ध्यानांत घेतली पाहिजे. या नवीन प्रदेशांत रहावयास आलेल्या लोकांच्या वंशजांना रानटी स्थितींत दिवस काढावे लागल्यानें त्यांनीं आपल्या पूर्वजांच्या मूलस्थानांतील संस्कृतीचे त्रुटित अवशेष आपल्या जवळ राखून ठेवले असले पाहिजेत " (Arctic Home in the Vedas p. 434 ). म्हणून इंडो–युरोपियनांच्या मूळ संस्कृतीचा जो दर्जा हल्लीं सामान्यतः समजण्यांत येतो त्याहून तो निःसंशय उच्च असला पाहिजे असें लो. टिळकांचें म्हणणें आहे. परंतु तें बरोबर वाटत नाहीं. कितीहि व कसलींहि संकटें आलीं तरी जोंपर्यंत मनुष्य जिवंत आहे तोंपर्यंत त्याची भाषाहि जिवंत असते. इंडो–युरोपियन लोक जरी हिमवृष्टीमुळें खालीं आले तरी त्यांनीं तेथील भाषा आपल्याबरोबर आणली असली पाहिजे, ही गोष्ट निःसंशय आहे. म्हणून त्यांनीं आणलेल्या भाषेवरून म्हणजेच प्रचलित इंडो–युरोपियन भाषांवरून त्यांच्या संस्कृतीची कल्पना बांधण्यास हरकत नाहीं. कारण भाषा ही संस्कृतीची वाहक असते. आतां नवीन प्रदेशांत ज्या रानटी लोकांशीं त्यांचा संबंध आला त्या रानटी लोकांची भाषा या लोकांनीं उचलली असणें शक्य नाहीं. कारण सामान्यतः जिंकणाऱ्या लोकांच्या भाषेचा परिणाम जित लोकांच्या भाषेवर होतो; जितांच्या भाषेचा परिणाम जेत्यांच्या भाषेवर फारसा होऊं शकत नाहीं व जरी झाला तरी त्या भाषेंतील केवळ शब्दच फार तर या भाषेंत येतील; जेत्यांची भाषा नष्ट होण्याचें कारण नाहीं. या दृष्टीनेंहि भाषांवरून संस्कृतीची कल्पना करण्यास हरकत दिसत नाहीं. शिवाय या ठिकाणीं एकवंशतेच्या कल्पनेवर आक्षेप उत्पन्न होतो. लो. टिळकांच्या मताप्रमाणें हिमप्रलयानंतर जे लोक उत्तर युरोप व मध्य आशियाच्या मैदानांत उतरले त्यांना तेथील रानटी लोकांच्या संसर्गामुळें मूळ संस्कृति जर आचरणांत आणतां आली नाहीं, तर त्याच रानटी लोकांच्या संसर्गांत त्यांचा वंश शुद्ध राहिला असेल ही गोष्ट कितपत शक्य आहे ? जे लोक मूलस्थानांतून खालीं उतरले त्यांना आपल्या कुटुंबासह येणें कितपत शक्य झालें असेल ? पुष्कळ लोकांच्या स्थानांतरांमध्यें ( Migrations ) लहानसहान संकटामुळेंहि त्यांचीं बायकामुलें त्यांच्याबरोबर जाऊं शकलीं नाहींत असें आपण पाहतों; मग हिमप्रलयासारख्या प्रचंड संकटांतून लोक आपल्या परिवारासह बाहेर पडले असतील ही गोष्ट शक्य आहे

काय ? नवीन वसाहतींत त्यांचा वंश शुद्ध राहिला असणें मुळींच शक्य नाहीं. असो.

मानवी प्रगतीचे कालखण्ड

पुरातत्त्वशास्त्रवेत्त्यांनीं मानवी प्रगतीचीं तीन युगें कल्पिलीं आहेत. ( १ ) अश्मयुग ( Stone age ) ( २ ) ब्राँझयुग किंवा ताम्रयुग ( Bronze or Copper age ) आणि ( ३ ) लोहयुग ( Iron age ). अश्मयुगाचे पुनः दोन भाग पडतात. ( १ ) पूर्वाश्मयुग ( Palaeolithic age ) आणि ( २ ) उत्तराश्मयुग ( Neolithic age ). पूर्वाश्मयुगांत मनुष्य खडकांतील गुहांमध्यें राही. गुरें चारणें, शेती करणें किंवा वस्तु निर्माण करणें यांपैकीं कशाचेंहि ज्ञान त्याला नव्हतें. अरण्यांत शिकार करून त्यावर अगर नदींतील माशांवर आणि रानांतील फळांवर तो उपजीविका करीत असे. त्याला खाजगी मालमत्ता नव्हती. धातूंचें ज्ञान नव्हतें; भांडीं तयार करण्याचें ज्ञान नव्हतें. तो आपलीं शस्त्रें लांकूड, दगड व हाडें यांपासून तयार करी. दगडाचे ढलपे काढून मोठ्या परिश्रमानें तो त्यापासून कांहीं ओबडधोबड वस्तु तयार करी. उत्तराश्मयुगांत तो दगडापासून नाना प्रकारच्या चांगल्या वस्तु निर्माण करूं लागला. गुरें पाळण्याचें व धान्य पेरण्याचें ज्ञान त्याला उत्पन्न झालें. गुहांच्या बाहेर तो मोकळेपणानें राहूं लागला. ताम्रयुगांत त्याला तांब्याच्या किंवा ब्राँझच्या धातूचा शोध लागला. तो चांगला मेंढपाळ, शेतकरी व कारागीर बनला. लोहयुगांत त्याला लोखंडाचा शोध लागला व या काळांत त्याची सर्वांगीण प्रगति झाली. इंडो-युरोपियन हे ताम्रयुगांतील होते.

मूळ इंडो-युरोपियन भाषेच्या, संस्कृत, झेंद, ग्रीक, रोमन, टयूटॉनिक, केल्टिक व लेटो-स्लाव्होनिक या ज्या पोटभाषा, त्यांचीं सांप्रतचीं स्वरूपें पुढील नकाशावरून ( पृष्ठ १६ ) समजून येतील.

इंडो-युरोपियन लोक रानटी नव्हते.

या भाषांतील शब्दांच्या तुलनेनें ( Linguistic palaeontology ) इंडो-युरोपियन संस्कृतीचें पुढील स्वरूप स्थूलमानानें समजतें. अग्नि हा सर्व सुधारणांचा जनक समजला जातो. इंडो-युरोपियनांना अग्नि माहीत होता. कारण अग्नि हा शब्द सर्व भाषांत समान आहे. अर्थात् इंडो-युरोपियनांची संस्कृति रानटी नव्हती हें प्रथमदर्शनींच स्पष्ट होतें. गुरेंढोरें पाळून

त्यांवर ते उपजीविका करीत होते; म्हणजे ते पशुपाळ ( Nomads ) होते. तथापि ते शेती करून धान्यहि पिकवीत असत. 'गो' हा शब्द सर्व भाषांत आहे. गाईला असलेल्या या प्राधान्यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं, इंडो-युरोपियन लोक हे फिरणोर नसून एके ठिकाणीं राहिलेले होते. कारण मेंढपाळांच्या मेंढ्यांप्रमाणें गाईला सतत चाल व वारंवार बदलतें हवापाणी हीं सोसत नाहींत. गोष्ठ, गोष्ठी, गोयुयुध, गोत्र, गविष्टि इत्यादि शब्दांवरून त्यांची गुरांवर उपजीविका करण्याची वृत्ति दिसून येते. जमीन नांगरून त्यांत



ते धान्य पिकवीत. नांगर लांकडाच्या फांदीचा असे. भूर्ज ( बर्च ) हा वृक्ष त्यांना माहीत होता. केवळ युरोपीय भाषांची तुलना केली असतां बऱ्याच वृक्षांचीं नांवें सदृश आढळतात. त्यांपैकीं ओक हा मुख्य होय. या वृक्षाला असलेल्या युरोपियन नांवांच्या स्वरांत जरी फरक असला तरी द् आणि र् हीं व्यंजनें त्या सर्वांत आहेत. यावरून अशा प्रकारचें नांव इंडो-युरोपियन काळीं वृक्षाला सामान्यतः लावलें जात असावें असा प्रो. श्रेडर यांचा तर्क आहे.*

त्यांचा आहार

कळप करून रहाणाऱ्या प्राण्यांचें मांस ते खात असत. शिकार केलेल्या प्राण्यांचें मांस खात नसावेत. कच्चें मांस व शिजवलेलें मांस असे दोन्ही प्रकार इंडो-युरोपियन भाषांतून आढळतात. [ कच्चें मांस—क्रव्य ( संस्कृत ), क्रिअस् ( ग्रीक ), कॅरो ( लॅटिन ); शिजविलेलें मांस-मांस ( संस्कृत ), मिस् ( आर्मीनियन ), मेंस ( अर्वाचीन फारसी ), मिएस् ( लिथुआनियन ), मिंझ ( गॉथिक ) ]. शिजविण्याची क्रिया अर्थातच त्यांना माहीत होती. परंतु पच् ( संस्कृत ), पेस्सो ( ग्रीक ), पेक ( प्राचीन सॅक्सन ), केपु ( लिथुआनियन ) या शब्दांचा अर्थ प्रारंभीं भाजणें असा असावा असें प्रो. श्रेडर यांचें मत आहे. पक्ष्यांचा उपयोग खाण्याकडे करीत नव्हते, यावरून पक्षी माणसाळलेले नव्हते असें दिसतें. मध खात असत. दूध आणि यव यांचाहि आहारांत समावेश होता. पिकें विळयानें कापून त्यांची बैलाच्या पायांखालीं मळणी करीत. अशा रीतीनें काढलेलें धान्य भाजून खात, किंवा दगडांच्या ओबडधोबड जात्यानें दळून अगर वरवंट्यानें कुटून त्याचें पीठ करीत व त्याची भाकरी भाजून खात. कुटणें आणि दळणें या दोन्ही क्रियांचे वाचक शब्द इंडो-युरोपियन भाषांतून सारखे आहेत. [ कुटणें-भ्रस्ज् ( संस्कृत ), फ्रुगो ( ग्रीक ), फ्रियो ( लॅटिन ); दळणें-पिष् ( संस्कृत ), पिस्सो ( ग्रीक ), पिन्सो ( लॅटिन ) ]. मीठ हा पदार्थ त्यांना माहीत नव्हता. कारण मीठवाचक शब्द इंडो-युरोपियन भाषांत निरनिराळे आहेत. दुधाचा उपयोग विशेष प्रमाणांत होत नसावा.

मूलस्थानांतील लोकांना माहीत असलेल्या प्राण्यांच्या बाबतींत पुढील शब्द निरनिराळ्या भाषांतून आढळतातः—

---

* Prof. Schrader—Prehistoric Antiquities of Indo-Aryans.

कुत्रा–श्वा ( संस्कृत ), स्पा ( झेंद ), शुन् ( आर्मीनियन ), कॅनिस् (लॅटिन ), हुंड्स् ( गॉथिक ), हाऊंड ( इंग्लिश ).

लांडगा–वृक ( संस्कृत ), वेह्र्क ( झेंद ), गेल ( आर्मीनियन ), लुपुस् (लॅटिन ), व्हुल्फ्स् ( गॉथिक ).

अस्वल—ऋक्ष ( संस्कृत ), अर्ज् ( आर्मीनियन ), उर्सुस् ( लॅटिन ),

उंदीर—मूष ( संस्कृत ), मूस ( अर्वाचीन फारसी ), मूस ( लॅटिन ), मुक्न ( आर्मीनियन ).

ससा—शश ( संस्कृत ), हसो ( अर्वाचीन उच्च जर्मन ).

त्यांना माहीत असलेले प्राणी

याखेरीज घोडा, गाढव, बैल, शेळी, मेंढी, उंट, डुक्कर, सर्प या प्राण्यांना निरनिराळ्या भाषांत ज्या संज्ञा आहेत, त्यांच्यांतील ध्वनिसादृश्यावरून होहि प्राणी त्या लोकांना माहीत होते असें दिसतें. इंडो–युरोपियन लोक जनावरांचे कळप पाळीत असत ही गोष्ट कळप या अर्थी असलेल्या शर्ध(संस्कृत), हेर्ड ( गॉथिक ), हर्डस् ( इंग्लिश ) या तुल्य शब्दांवरून स्पष्ट होते. संस्कृत भाषेंतील उलूक, कृकवाकु, कोकिला, तित्तिरि, हंस, सुपर्ण या पक्ष्यांना लॅटिन, ग्रीक, आर्मीनियन वगैरे भाषांतून जीं नांवें आहेत, त्यांतील ध्वनिसादृश्य त्या त्या पक्ष्यांच्या ध्वनींशीं मिळतें. पक्ष्यांच्या गमनाच्या दिशांवरून शकुन पहात असत.

वस्त्रें वापरीत असत

वस्त्रें वापरण्याचें ज्ञान त्यांना होतें. वेश्–पांघरणें या सामान्य धातूपासुन बनलेले जे सदृश शब्द निरनिराळ्या भाषांत प्रचारांत आहेत, त्यांवरून ही गोष्ट सिद्ध होते. [ वसन ( संस्कृत ), वङ्हन ( झेंद ), एस्सुमि, एइम, एस्थीस ( ग्रीक ), व्हेस्तिस् , व्हेस्टिओ ( लॅटिन ), गवस्जन ( गॉथिक )]. नग्नतावाचक शब्दहि बऱ्याच भाषांत सदृश आहेत. [ नग्न ( संस्कृत ), नागु ( प्राचीन सॅक्सन ), नुगस् ( लिथुआनियन ), नुड्स् ( लॅटिन ]. परंतु नग्नतेची कल्पना वस्त्राच्छादन रूढ झाल्यानंतरच येणार हें उघड आहे. गुरांचीं कातडीं पांघरीत असत. उपनयनप्रसंगीं नवीनच घालावयाच्या यज्ञोपवीताला मृगचर्माचा तुकडा लावतात हा वरील रूढीचाच अवशेष आहे. बुरणुसासारखें जाडेंभरडें कापडहि ते विणीत व वापरीत असत. दोरी वळणें,

टोपल्या विणणें, चटया तयार करणें या कलाहि त्यांना माहीत असाव्यात. चा-विणणें हा धातु अनेक इंडो-युरोपियन भाषांतील शब्दांत आढळतो. [ ओतु-आडवे धागे ( संस्कृत ), नीत्रोन-उभे धागे, इत्रान-चाती ( ग्रीक ), वोरस-कांतीण ( लिथुआनियन ), वात-वस्त्र ( प्राचीन उच्च जर्मन ), वेलम-वस्त्र ( लॅटिन ), ऊर्णवाभि-लोंकर विणणारा ( संस्कृत ), उब्द-विणलेला ( झेंद ), वाफ-विणणें ( पामीर ), वेफ-विणणें ( नॉर्वेजियन ) वेफ्त-बारीक धागा ( अँग्लो-सॅक्सन ), विफ्त-बारीक धागा ( मध्य उच्च जर्मन )]. एकंदरींत विणण्याच्या कलेंत बरीच प्रगति झाली होती. स्था या धातूच्या अस्तित्वावरून त्या काळचे माग उभे राहून कापड विणण्याचे असावेत. [ स्तामेन ( लॅटिन ), स्ताक्लेस ( लिंथुआनियन ), वेफ्स्ताद्र ( प्राचीन नॉर्वेजियन ), स्थवि ( संस्कृत ) ]. ताग आणि लोंकर यांपासून कापड तयार करीत असत. एकच वस्त्र अंगाभोंवतीं गुंडाळीत. शिवण्याची कला अस्तित्वांत नव्हती.

**धातुज्ञान वगैरे**

सोनें व तांबें हे धातु त्यांना माहीत होते. अयस् हा शब्द मूलसंस्कृतींत ब्रॉंझवाची आहे कीं ताम्रवाची आहे हें निश्चित नाहीं. धातूंचीं कामें ते करीत असत. प्रसंगविशेषीं तरी ते हजामत करीत असत असें दिसतें. कारण क्षुर हा शब्द ग्रीक भाषेंत आहे. तांब्याचे ओबडधोबड दागिने ते घडवीत होते. धनुष्यबाण, भाले व तरवारी हीं त्यांचीं आयुधें होतीं. लांकूड वांकवून त्याचें धनुष्य तयार केलेलें असे. तरवारी, बाणांचे व भाल्यांचे फाळ तांब्याचे असत. धातूच्या ऐवजीं घासलेल्या दगडांचाहि उपयोग ते केव्हां केव्हां करीत असत. भांडीं धातूचीं होतीं. कांहीं दगडाचींहि असत. कुंभाराच्या चाकावर मातीचींहि भांडीं तयार करीत. झाडांचे बुंधे कुऱ्हाडीनें तोडून ते पोंखरून त्यांच्या नावा तयार करीत असत व त्या नद्या आणि सरोवरें यांत चालवीत. समुद्र त्यांना माहीत नव्हता. नौ हा शब्द सर्व भाषांत एक आहे. झाडांच्या बुंध्यापासून गाड्या तयार करीत होते. दोन चाकें व मधला कणा हीं एकाच लांकडाचीं असत. दोन्ही बाजूंला उंच, भरीव व गोल चाकें ठेवून मधला भाग पोंखरून काढलेला असे. गाड्यांना बैल जोडीत. गाडीच्या निरनिराळ्या भागांचे शब्द बहुतेक इंडो-युरोपियन भाषांत सारखे आहेत. [ चाक-रोटा ( लॅटिन ), राट्स् ( लिथुआनियन ), राड् ( प्राचीन उच्च जर्मन ), रथ

( गाडी–संस्कृत ); चक्र ( संस्कृत ), कुक्लॉस् ( ग्रीक ), कोलो ( प्राचीन सॅक्सन ); आंस–अक्ष ( संस्कृत ), ॲक्झिस् ( लॅटिन ), अहस् ( प्राचीन उच्च जर्मन ), ॲास्झस् ( लिथुआनियन ); तुंबा–नाभि ( संस्कृत ), नफु ( अँग्लो–सॅक्सन ), नब ( प्राचीन उच्च जर्मन ), नभिस् ( प्राचीन फारसी)]. घरें बांधलीं जात. [ दम ( संस्कृत ), तुन् ( आर्मीनियन ), डोमॉस् ( ग्रीक ), डोमस् ( लॅटिन ), डोमु ( प्राचीन सॅक्सन ); शाला( संस्कृत ), कलिआ ( ग्रीक ), सेला ( लॅटिन ), हल्ला ( टयूटॉनिक ) ]. प्रत्यक्ष वस्तूंच्या देवघेवीनें विनिमय चालत असे. स्वित्सर्लंडमध्यें प्रागैतिहासिक काळांतील 'सरोगृहें' ( Lake dwellings ) सांपडलीं आहेत. त्यांतील संस्कृतीशीं इंडो-युरोपियन संस्कृतीचें साम्य दाखविण्यांत येतें.

कफविकार, वमन, विष, जखम यांचे वाचक शब्द इंडो–युरोपियन भाषांत समान आहेत. यांवरून त्यांच्यामध्यें कांहीं रोग प्रचलित होते व त्यांवर कांहीं औषधें त्यांनीं शोधून काढलीं होतीं असें दिसतें.

कालविभाग वगैरे

वर्षाचे दोन विभाग करीत असत. हिंवाळा हा शब्द इंडो-युरोपियन भाषांतून प्रामुख्यानें आढळतो. [ हायन–वर्ष ( संस्कृत ), झयनो–हिंवाळा ( झेंद ), क्सिओन् बर्फ ( ग्रीक ), हाएम्स्–हिंवाळा ( लॅटिन ) ]. उन्हाळ्याचे वाचक शब्दहि बऱ्याच भाषांत समान आहेत. [ वसंत ( संस्कृत ), वध्रि ( झेंद ), वेस्न ( प्राचीन सॅक्सन ), वेर ( लॅटिन ), एर ( ग्रीक ), वसर ( लिथुआनियन ) ]. या दोन ऋतूंचें वर्ष होत असे. [ समा–वर्ष ( संस्कृत ), हम ( झेंद ), अमर्न ( आर्मीनियन ), सम, समरद् ( इटालियन ), समर ( प्राचीन उच्च जर्मन ]. इंडो–युरोपियनांच्या मानसिक सामर्थ्याच्या आणि भाषेच्या प्रगतीचें उत्कृष्ट गमक म्हणजे दशांशपद्धति त्यांनीं शोधून काढली हें होय. शंभरापर्यंत ते मोजीत असत. हजाराचा आंकडा त्यांना माहीत नव्हता. पण एवढ्यावरून त्यांना हजार या संख्येची कल्पना नव्हती किंवा हजारांनीं एकत्र जमलेला समुदाय त्यांनीं पाहिला नव्हता असें अनुमान काढतां यावयाचें नाहीं. कारण दहा शंभर अशा पद्धतीनेंहि ते हजाराचें काम भागवीत असले पाहिजेत. ( अजूनसुद्धां आपण कधीं कधीं असा प्रयोग करतों. ) त्यांच्या समकालीन इतर रानटी लोक बोटांनीं तीन किंवा पांचपर्यंत मोजूं शकत. राज्यव्यवस्थेची

कांहींशी कल्पना त्यांना असावी. कारण राजा व राणी यांचे वाचक शब्द सर्व भाषांत एक आहेत.

इंडो–युरोपियनांच्या कुटुंबव्यवस्थेची कल्पना करण्यास खालील शब्द उपयोगीं पडतातः—

आप्तबंधु

पिता–पितर् ( संस्कृत ), पितर् ( झेंद ), हेअर् ( आर्मीनियन ), पतिर् ( ग्रीक ) पेटर् ( लॅटिन ), आथिर् ( फारशी ), फॅडर् ( गॉथिक ), फादर् ( इंग्लिश ). माता–मातर् ( संस्कृत ), मातर् ( झेंद ), मइर् ( आर्मीनियन ), मातिर् , ( ग्रीक ), मेटर् (लॅटिन), मथिर् ( फारशी ) मुओटर ( प्राचीन उच्च जर्मन ) मदर ( इंग्लिश ).

पुत्र–सूनु ( संस्कृत ), हुनु ( झेंद ), सुनुस् ( गॉथिक ), सनुस् ( लिथुआनियन ), सिनु ( प्राचीन सॅक्सन ), सन् ( इंग्लिश. )

कन्या–दुहितर् ( संस्कृत ), दुघधर् ( झेंद ), दुस्त्र ( आर्मीनियन ), डॉटर ( इंग्लिश ), टोख्टेर ( जर्मन ).

बंधु–भ्रातर् ( संस्कृत ), ब्रातर् ( झेंद ), फ्रॉतिर् ( ग्रीक ), फ्रॅटेर् ( लॅटिन), ब्राथिर् ( पार्शियन ), ब्रोथर् ( गॉथिक ), ब्रॉटेरोलिस् ( लिथुआनियन ), ब्रुडेर् ( जर्मन ), ब्रदर् ( इंग्लिश ).

भगिनी–स्वसर् ( संस्कृत ), हडहर् ( झेंद ), सोरोर् ( लॅटिन ), झिडर् ( पर्शियन ), स्वेस्त्र ( प्राचीन सॅक्सन ), श्वेस्टेर ( जर्मन ), सिस्टर ( इंग्लिश ).

दूरच्या नातलगांत इतकें साम्य आढळत नाहीं. मात्र चुलतावाचक शब्दांत बरेंच साम्य दिसून येतें. [ पितृव्य ( संस्कृत ), तुइर्यो ( झेंद ), पत्रोस् ( ग्रीक ), पेतृउस् ( लॅटिन ), फॅतुरेओ ( प्राचीन उच्च जर्मन ), फिडेरा ( अँग्लो–सॅक्सन ) ]. तसेंच

नपात् ( संस्कृत व झेंद ), नेपोट् ( लॅटिन ), नेव्ह्यू ( इंग्लिश ).

सून—स्नुषा ( संस्कृत ), सुना ( उत्तर फारसी ), नु ( आर्मीनियन ), नुऑस् ( ग्रीक ), नुरुस् ( लॅटिन ), स्नुरा ( प्राचीन उच्च जर्मन ), स्नुचा ( प्राचीन सॅक्सन ).

जांवई—जामातर् ( संस्कृत ), झामातर् ( झेंद ), स्लॅझेन्तस् ( लिथुआनियन ).

या साम्यावरून कुटुंबसंस्था दृढमूल झाली असल्याचें दिसून येतें. सासूसासरा यांचे वाचक शब्दहि सदृश आढळतात. याहून इतर दूरच्या

आप्तांच्या नांवांमध्यें सादृश्य आढळत नाहीं. कुटुंब या अर्थीं 'विश्' हा शब्द अस्तित्वांत होता. [ विष्पति-वीश्पतिस्, विष्पत्नी-वीश्पत्नी-लिथुआनियन ]. विशेष सांगण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, विधवा ( Widow ) हा शब्द सर्व भाषांत आढळतो. त्याअर्थीं मूळस्थानांत सतीची चाल नव्हती ही गोष्ट स्पष्ट होते. कुटुंब हा समाजाचा घटक होता. गुलाम ठेवण्याची चाल होती. बहुपत्नीकत्व प्रचारांत होतें. स्त्रिया पळवून किंवा विकत घेऊन लग्नें होत असत. कुटुंबांतील संपत्तीची वांटणी होत नसे. थोरल्या मुलाकडे सर्व मालमत्तेचें स्वामित्व जाई. त्या काळीं जमीन व गुरेंढोरें मुबलक असल्याकारणानें वांटण्या करण्याची आवश्यकता भासत नव्हती.

देवकल्पना होती.

"निसर्गांतील कांहीं चमत्कृतींवरून देवतासंबंधींच्या कल्पना व कथा त्यांनीं बसविल्या होत्या. मूलस्थान सोडल्यावर ज्याप्रमाणें भाषा बदलली त्याप्रमाणें त्यांच्या सर्वसामान्य पुराणशास्त्रांतहि बदलेल्या परिस्थितींत निरनिराळ्या कारणांनीं फरक झाला. मूलस्थान सोडलेल्या लोकांच्या मनावर ज्या प्रमाणांत इतर संस्कारांचे ठसे उमटले, त्या प्रमाणांत त्यांच्या पुराणशास्त्रांत फेरबदल झाले. म्हणून ज्याप्रमाणें वैदिक संस्कृत भाषा आणि प्राचीन ग्रीक भाषा यांच्यामध्यें अत्यंत फरक पडला, त्याप्रमाणें वैदिक पुराणशास्त्र व ग्रीक पुराणशास्त्र यांत पुष्कळ अंतर आहे, यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. तथापि आजच्या इंडो-युरोपियन राष्ट्रांत मूळ इंडो-युरोपियन पुराणशास्त्रांतील कांहीं कल्पना साहाजिकच सांपडतात. त्याबरोबरच या धार्मिक कल्पना इंडो-युरोपियन राष्ट्रांच्या अर्वाचीन वाङ्मयापेक्षा प्राचीन वाङ्मयांत अधिक स्पष्ट दिसणें हेंहि साहाजिकच आहे. वेदांतील पुराण शास्त्र हें होमर आणि हेसियडच्या ग्रीक पुराणशास्त्राशीं कांहीं अशीं जुळतें आहे. या प्राचीन ग्रंथांतील धार्मिक कल्पनांचें परस्पर साम्य हें मागाहूनच्या हिंदु आणि ग्रीक देवतासमूहांतील साम्यापेक्षां अधिक आहे. सांगण्याचा आशय असा कीं, वेदोत्तरकालांतील पुराणकल्पनांपेक्षां वेदकालांतील देवतासंबंधींच्या कल्पना ग्रीक पुराणशास्त्राशीं अधिक जुळतात. त्याबरोबर हेंहि ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, ग्रीक देवतांशीं जुळणाऱ्या अशा कांहीं कल्पना वेदोत्तरकालांत आढळतात कीं, ज्या वेदांमध्यें सांपडत नाहींत. या कल्पना निसर्गाच्या प्रत्येक विभागाचा व मानवी जीविताचा दैवी नियन्ता निर्माण करण्याच्या नैसर्गिक बुद्धीमुळें उत्पन्न झाल्या असतील किंवा कदाचित्

आपल्या प्राचीन पुराणकल्पनांना पूर्णत्व आणण्याच्या हेतूनें त्यांत फेरबदल करण्याच्या किंवा अधिक भर टाकण्याच्या नवीन प्रेरणेमुळें उत्पन्न झाल्या असतील. वेदोत्तरकालीन हिंदु देवतांचें ग्रीक देवतांशीं आढळणारें साम्य हें आकस्मिक रीतीनें उत्पन्न झालेलें नव्हे. समान स्वभावविशेष असणारीं राष्ट्रें एकाच पद्धतीनें आपल्या धार्मिक कल्पना बसवीत असतात याचें हें उदाहरण आहे परंतु प्राचीन ग्रीक आणि वैदिक वाङ्मयांतील देवतासाम्य हें या प्रकारचें नव्हे. हे निःसंशयपणें मूळ इंडो-युरोपियन पुराणशास्त्राचे अवशेष आहेत. कारण या देवतांचे वाचक शब्द आणि त्या देवतांचीं कार्यें या दोन्हीं बाबतींत ग्रीक आणि वैदिक देवतांचें साम्य आहे. "*

हीच गोष्ट इतर इंडो-युरोपियन राष्ट्रांच्या बाबतींत लागू आहे. आतां इतर राष्ट्रांतील देवतांचें वैदिक देवतांशीं साम्य ग्रीकांच्या देवतापेक्षां कमी आहे ही गोष्ट खरी; परंतु त्यामुळें इंडो-युरोपियनांना मूलस्थानीं देवताविषयक कांहीं कल्पना होत्या या विधानास बाध येत नाहीं. मूलस्थानांत द्यौ [झीअस (ग्रीक) द्यौष्पितर्-झीअसपाटेर (ग्रीक), ज्युपिटर (लॅटिन) टयू (अँग्लो-सॅक्सन)], वरुण (ओरनोस-ग्रीक), अग्नि [इग्निस (लॅटिन) ओग्नि (स्लाव्ह)], सूर्य [सोल (लॅटिन), हेलिअस (ग्रीक)] व उषस् [ऑरोरा (लॅटिन), ईऑस् (ग्रीक), ईअँस् (अँग्लो सॅक्सन) औस्झर (लिथुआनियन), अस्रुस्ट्रो (टयूटॉनिक)] यांना देव, तात्व निश्चितपणें प्राप्त झालें होतें. वृत्रहन् किंवा इंद्र ही देवता वास्तविक आर्क्टिक प्रदेशांतील आहे; परंतु तिचा उल्लेख ग्रीक, लॅटिन इ. युरोपियन भाषांत आढळत नाहीं, हें आश्चर्य आहे. फक्त अवेस्त्यांमध्यें तिचा उल्लेख 'वेरेथ्रेघ्न' या नांवानें कांहीं ठिकाणीं आढळतो. अश्विनौ ही देवता वास्तविक आर्क्टिक प्रदेशांतील आहे, परंतु तिला त्या ठिकाणीं इतरांइतकें महत्त्व नसावेंसें दिसतें. यामुळें मूलस्थानांतून निघाल्यानंतर अनेक भिन्नभिन्न परिस्थितींतून जात असतां युरोपियन लोक ती विसरले असावेत. या कारणानें युरोपीय वाङ्मयांत तिचा उल्लेख सांपडत नाहीं. फक्त ग्रीक वाङ्मयांत, डायोस्कुरोई या कांहींशा भिन्न नांवांत ती आढळते. टयूटानिक भाषेंतहि अश्विनौशीं तुल्य असा एक शब्द आहे. याशिवाय देवतावाचक पुष्कळ शब्दांचीं साम्यें आढळतात. [भग (बोगु स्लाव्हिक), सरमा (सेलेन

* Dr. J. Muir-Original Sanskrit Texts Vol. V.

हेर्मेस ), त्रित ( त्रितन-ग्रीक; थ्रएतोना-झेंद ), वात ( वोतन-ओदिन ), पर्जन्य ( पेर्कुना-लिथुआनियन; फिओग्यु ), सरण्यु ( एरिन्निस ) मनु ( मिनॉस्-ग्रीक ); मन्नुस–टयूटानिक ), ब्राह्मण ( फ्लामेन. )]. परंतु या शब्दांना देवतात्व प्राप्त झालेलें दिसत नाहीं. पाश्चिमात्य भाषाशास्त्रज्ञांनीं इंडो-युरोपियन भाषांचा जो अभ्यास केला आहे त्यावरून वर संक्षिप्त स्वरूपांत दिलेली माहिती उपलब्ध होते. एकंदरींत इंडो-युरोपियनांनीं मूलस्थानांत कांहीं देवता कल्पिल्या होत्या व त्याप्रीत्यर्थ ते यज्ञयाग करीत असत ही गोष्ट स्पष्ट आहे.

## मूलभूमीचा त्याग

स्वस्थान सोडलें

अशा प्रकारच्या संस्कृतींत इंडो–युरोपियन लोक उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत राहिले असतां तेथील भौगोलिक परिस्थिति पालटली. त्या प्रदेशांत जोराची हिमवृष्टि सुरू झाली. थंडीचें प्रमाण अतिशय वाढल्यामुळें लोकांना तेथें जगणें अशक्य झालें. आपलीं घरेंदारें सोडून निरनिराळ्या टोळ्या करून ते वाट फुटेल तिकडे चालूं लागले. जेवढी चीजवस्त बरोबर घेण्यासारखी होती तेवढी घेऊन त्यांनीं आपली वसति सोडली. एक भाषा व एक संस्कृति असणाऱ्या लोकांची अशा आकस्मिक रीतीनें कायमची पांगापांग झाली. ही हिमवृष्टि होण्यास कोणतीं कारणें घडलीं याबद्दल भूगर्भशास्त्रज्ञांत मतभेद आहेत. पृथ्वीचें दीर्घवर्तुळ हल्लीं जवळजवळ गोलाकार आहे; परंतु त्यावेळीं तें बरेंच लांबट होतें. त्यामुळें तेथील समशीतोष्ण हवामान बदलून तें अतिशय शीत झालें; हें डॉ. क्रोल यांनीं दिलेलें ज्योतिषविषयक कारण त्यांतल्यात्यांत सयुक्तिक दिसतें.

कोणीकडे आणि कसकसे गेले

उत्तरध्रुवाच्या प्रदेशांतून निघालेल्या लोकांचे दोन मुख्य भाग पडले. कांहीं लोक दक्षिणेकडे निघाले व कांहींनीं पश्चिम दिशा धरली. दक्षिणेकडे जे लोक निघाले ते सर्व एकदमच निघाले असले पाहिजेत; कारण ते वंशानेंहि एक होते. हेच इंडो–इराणी लोक होत. यांच्या एकवंशीयत्वाबद्दलचीं प्रमाणें अशीं आहेत—

( १ ) ज्या भाषेंत पारशी लोकांचा अवेस्ता हा ग्रंथ लिहिलेला आहे ती झेंद भाषा व संस्कृत यांमध्यें अतिशय साम्य आहे. तें इतकें कीं झेंद

भाषेतील कांहीं सबंध मंत्र थोडासा फरक केला असतां संस्कृतांत रूपांतरित होतात.

( २ ) दोन्ही भाषा बोलणारे लोक आपल्या प्राचीन वाङ्मयांत आपणांस आर्य ( ऐर्य-झेंद ) म्हणवितात.

( ३ ) दोघांच्या धार्मिक आणि पौराणिक कल्पनांमध्यें आतिशय साम्य आहे.

पश्चिमेकडे जे लोक निघाले ते मात्र एकाच टोळीनें निघाले नव्हते. आर्क्टिक प्रदेशांतील त्यांच्या वसतिस्थानांच्या कमीअधिक अंतराप्रमाणें व प्रवासाच्या गत्यनुसार त्यांच्या अनेक टोळ्या बनल्या. जे लोक उत्तरध्रुवापासून दूर होते आणि धाडसी होते ते सर्वांत पुढें गेले असतील व उत्तरध्रुवाच्या आसपास रहाणारे त्यांच्या मागोमाग गेले असतील. हिमवृष्टीच्या प्रदेशांतून बाहेर पडल्यानंतर पुढच्या टोळ्या तशाच पुढें गेल्या असतील व आज त्या ज्या प्रदेशांत आहेत तेथें येऊन थांबल्या असतील; आणि ज्या मागाहून आल्या त्या क्रमानें मागील प्रदेशांत राहिल्या असतील. किंवा कदाचित् असेंहि झालें असेल कीं, पहिल्या टोळ्यांनीं हिमवृष्टीचा प्रदेश संपल्याबरोबर आपला प्रवास संपविला असेल व ज्या टोळ्या मागाहून आल्या त्यांना तेथें रहाणें शक्य नसल्याकारणानें नवीन प्रदेश हुडकण्याकरितां त्या पुढें निघाल्या असतील. एकंदरींत, आर्क्टिक प्रदेशांतील कोणत्या प्रांतातले लोक कोणत्या नवीन प्रांतांत वसाहत करून राहिले हें सांगण्याला केवळ पोकळ तर्काशिवाय दुसरा आधार नाहीं. या टोळ्यांची वाटेंत ठिकठिकाणीं रानटी लोकांशीं गांठ पडली असेल व त्यांच्याशीं त्यांना झगडावें लागलें असेल. याकरितां प्रत्येक टोळी जुटीनें निघाली असेल. कारण सर्वच प्रदेश त्यांना नवीन असल्यामुळें कोण्त्या प्रदेशांत कसे व किती लोक आहेत हें त्यांना माहीत असणें शक्य नव्हतें. थोडथोडे लोक पुढें गेले असते तर त्यांच्या जीवाला धोका पोंचण्याचा संभव होता. याकरितां प्रत्येक टोळी एकत्र रीतीनें प्रवास करीत असेल. प्रवासांत असतां जे प्रदेश त्या टोळ्यांना नैसर्गिक अनुकूल हवामानाचे व उपजीविकेच्या साधनांनीं परिपूर्ण असे वाटले, त्या प्रदेशांत त्यांनीं आपली वसति केली. अशा रीतीनें हिमवृष्टीमुळें रहाण्यास अयोग्य झालेला स्वदेश सोडून नवीन वसतिस्थानें शोधण्याकरितां वर्षानुवर्ष अनेक प्रदेशांतून प्रवास

करून इंडो-युरोपियन लोकांनीं सोईस्कर अशा प्रदेशांत वसाहती केल्या व ग्रीक, रोमन, जर्मन, स्लाव्ह व केल्ट या भाषा बोलणाऱ्या आजच्या लोकांचे अतिप्राचीन काळचे पूर्वज त्या त्या प्रदेशांत वसाहती करून राहिले.

इंडो-इराणी लोक दक्षिणेकडे निघाले ते प्रवास करीत करीत मध्य-आशियांत येऊन पोहोंचले व तो प्रदेश त्यांना अनुकूल वाटल्याकारणानें त्यांनीं तेथें कांहीं काळपर्यंत मुक्काम केला. पुढें मध्य आशियां तून मुक्काम हलविण्यास त्यांना काय कारण घडलें तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. तथापि लोकसंख्या वाढल्यामुळें त्यांना उपजीविकेचीं साधनें त्या मानानें कमी पडूं लागलीं असावींत हें कारण संभवनीय आहे. मध्य आशियांतील दीर्घकालीन मुक्कामानंतर इंडो-इराणी लोक कित्येक वर्षें प्रवास करीत पर्शियांतून अफगाणिस्थानच्या डोंगराळ मुलुखांत येऊन पोहोंचले, व खैबर घाटाच्या मार्गानें हिंदुस्थानांत उतरले. पंजाबांत त्यांचा प्रवेश होण्यापूर्वीं तेथें कोण-कोण लोक होते, ते कसे होते इत्यादि परिस्थितीचें अवलोकन पुढील विभागांत करूं.

---

# विभाग दुसरा

# आर्य-आक्रमणापूर्वींचा हिंदुस्थान

## ऑस्ट्रिक व द्राविडियन लोक

हिंदुस्थानांतले प्राचीनतम रहिवासी-ऑस्ट्रिक व द्राविडियन लोक

अतिप्राचीन काळीं हिंदुस्थानांत मनुष्यप्राण्याची वसति नव्हती. ज्या ज्या वंशाचे व भाषेचे लोक आज हिंदुस्थानांत दिसतात ते सर्व भिन्न भिन्न काळीं बाहेरून आले. हिंदुस्थानांत प्रथमतः आलेले रानटी लोक ऑस्ट्रिक वंशाचे व भाषेचे होत. ते वायव्य दिशेकडून आले. ते केव्हां आले हें समजण्यास मार्ग नाहीं. या ऑस्ट्रो-एशियाटिक वंशाचा जगांतील बहुतेक सर्व प्रागैतिहासिक जनसमूहाशीं संबंध आहे. ऑस्ट्रिक भाषा हिंदुस्थानाबाहेरच्या सर्व प्रदेशांत प्रचारांत असलेली आढळून येते. हिंदुस्थानच्या आजूबाजूंपुरतें पहावयाचें तर 'उत्तरेकडील तिबेटो-ब्रह्मी व पूर्वेकडील थाई, मोन्-ख्मेर आणि मुंडा हे भाषासमूह ( Linguistic Families ) ऑस्ट्रिक म्हणून सांगतां येतील. तिबेटो-ब्रम्ही भाषासमूह हा सामान्यतः थाई व चिनी भाषासमूहांशीं जुळता आहे. तसेंच खासी भाषेचा दुवा जोडला असतां मुंडा ( किंवा कोल ) भाषासमूह मोन्-ख्मेर व मलाया द्वीपकल्पांतील अनेक पोटभाषा यांच्याशीं जुळता आहे. नुकतेंच असेंहि जवळजवळ सिद्ध झालेलें आहे कीं, मोन्-ख्मेर, खासी आणि मुंडा हे भाषासमूह सिनो-तिबेटी भाषासमूहाशीं संबद्ध आहेत. फादर श्मीट यांनीं दिलेल्या संज्ञेप्रमाणें या सर्व ऑस्ट्रो-एशियाटिक भाषा आहेत.'*

द्राविडियन भाषा.

हे ऑस्ट्रिक लोक शरीरानें कसे होते, त्यांची संस्कृति कशी होती यासंबंधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. ते पूर्वाश्मयुगांतील होते यावरून अशी कल्पना करतां येते कीं, ते खडकांच्या गुहांतून रहात असत व कच्चा मांसाहार करीत असत. दगडाचीं ओबडधोबड हत्यारें ते तयार करीत असत. शरीरानें बुटके, पिंगट काळसर वर्णाचे व मोठ्या आणि जाड नाकाचे

---

* Dr. P. C. Bagchi—Pre-Aryan and Pre-Dravidian India, 1929.

असे ते लोक असावेत. दगडाच्या कुऱ्हाडीनें ते झाडें तोडीत. खेडेगांवासारखे लहानलहान समूह करून ते रहात असत. त्यांची वसति वायव्य सरहद्द-प्रांत, पंजाब व संयुक्तप्रांत एवढ्या भागांत होती. कालांतरानें दुसऱ्या एका वंशाचे–मेडिटरेनियन–लोक पर्शिया बलुचिस्थान या मार्गानें हिंदुस्थानांत आले. हे लोक मूळचे पूर्व आफ्रिकेंतील होत असें एक मत आहे × व ते उत्तर आशियाच्या किंवा उत्तर यूरोपच्या मैदानांतून आले असें दुसरें मत आहे.* प्रो. रॅपसन यांच्या मतें ते पश्चिम आशियांतून आले.s मेडिटरेनियन लोकांची संस्कृति अगोदर आलेल्या ऑस्ट्रिक लोकांच्या संस्कृतींत मिसळली व त्यापासून द्राविडियन संस्कृति तयार झाली. ज्या ठिकाणीं द्राविडियन असा शब्दप्रयोग वंशदृष्ट्या केला असेल त्या ठिकाणीं तो केवळ सोईसाठीं करण्यांत आलेला आहे. वंशदृष्ट्या द्राविडियन ही मिश्र जात आहे. द्राविडियन भाषा बोलणारे पहिले लोक हे फक्त बाहेरून आलेले होते. वसतीला विशेष लायक अशा प्रदेशांत द्राविडियन जातींचे मूळ दोन जनक वंश मिश्रित झाले. मेडि-टरेनियन लोक येण्यापूर्वीं जे ऑस्ट्रिक लोक दूरदूरच्या प्रदेशांत रहावयास गेले, त्यांचे वंशज अद्यापि त्या ठिकाणीं असलेले दिसतात. कोल, संताळ, मुंडा वगैरे जातींचे आजचे लोक हे अशा प्रकारें दूर राहिलेल्या ऑस्ट्रिक लोकांचे वंशज होत. प्रचंड कालातिक्रमामुळें या लोकांची मूळची भाषा नाहींशी झाली व द्राविडियन लोकांची भाषा त्यांनीं उचलली. हिंदुस्थानांत पहिली भाषा ऑस्ट्रिक होती. त्यानंतर द्राविडियन भाषा आली. त्यामुळें ऑस्ट्रिक भाषा प्रचारांतून गेली; परंतु लोकांच्या संमिश्रणामुळें ऑस्ट्रिक भाषेंतील पुष्कळ शब्द द्राविडियन भाषेंत आले व आजतागायत तींत ते असलेले आढळून येतात.

द्राविडियन भाषा

मूळ द्राविडियन भाषेच्या तामीळ, तेलगु, कानडी, मल्याळी, तुळु, तोड, कोटा, गोंड व खोंड किंवा कुंड अशा नऊ पोटभाषा बनल्या आहेत. त्यांपैकीं तामीळ भाषा ही मूळ द्राविडियन भाषेची प्रतिनिधि समजली जाते. "व्याकरणरचनेच्या दृष्टीनें

× G. Elliot Smith—Migrations of Early culture.

* Dr. Caldwell--Comparative grammar of Dravidian Languages.

s Cambridge History of India Vol. I part II.

पाहिलें असतां द्राविडियन भाषा संस्कृतापासून अगदीं भिन्न आहेत हें स्पष्टपणें दिसतें. याच व्याकरणविषयक तुलनेनें द्राविडियन भाषा या 'सिथियन' भाषासमूहांतील आहेत हेंहि समजून येतें. मध्य आणि उत्तर आशियांतील सिथियन भाषासमूहाच्या व्याकरणाशीं द्राविडियन भाषांचें व्याकरण जुळतें आहे. प्रो. रास्क यांनीं उपयोजिल्याप्रमाणें 'सिथियन' या शब्दाचा या ठिकाणीं व्यापक अर्थ आहे. या भाषासमूहांत फिनिश, टर्किश, मोंगोलियन आणि टुंगुशियन हे भाषासमूह अंतर्भूत आहेत. (यांतील प्रत्येक भाषेच्या पुन: अनेक पोटभाषा आहेत.) या सर्व भाषा एकाच व्याकरणपद्धतीनें बनलेल्या आहेत आणि त्यांतील सामान्य नियम एकच आहेत. या भाषासमूहाला टार्टर, फिनिश, उराल-अल्टिक, मोंगोलियन, तुरानियन अशीं अनेक नांवें निरनिराळ्या ग्रंथकारांनीं दिलेलीं आहेत; परंतु सिथियन हें एकच नांव उपपन्न व सर्वांत सोईस्कर असें आहे. कारण उत्तर आशियांतील आणि युरोपांतील अज्ञातमूल अशा अनेक रानटी जातींचा संदिग्ध वाचक असा हा एकच शब्द आहे. द्राविडियन भाषांचा सिथियन भाषासमूहाशीं संबंध प्रथम प्रो. रास्क यांनींच दाखविला. द्राविडियन भाषासमूह जरी सिथियन भाषासमूहापैकीं असला तरी त्यामध्यें त्याला स्वतंत्र अस्तित्व आहे. कारण सिथियन भाषांसमूहांतील इतर भाषासमूहांहून द्राविडियन भाषासमूह भिन्न आहे."*

द्राविडियन लोक कोणीकडून आले ?

'द्राविडियन लोकांची उंची सामान्य प्रमाणापेक्षां थोडी कमी होती. त्यांचा रंग जवळजवळ काळा होता. अंगावर केंस पुष्कळ होते व ते बहुधा कुरळे होते. डोळे काळे आणि डोकें लांबट होतें. नाक रुंदट आणि बसकें होतें.'$ 'हे द्राविडियन लोक कोठून आले या प्रश्नाचा विचार करतांना बलुचिस्तानांतील ब्राहुई भाषेचा प्रश्न अगोदर ध्यानांत घेतला पाहिजे. कारण ब्राहुई भाषा ही मूळची द्राविडियन आहे. ही ब्राहुई भाषा, द्राविडियन लोक पश्चिमेच्या बाजूनें हिंदुस्थानांत आले याची निदर्शक

* Dr. Caldwell-Comparative grammar of Dravidian languages).

$ Sir Herbert Risley--Indian census Report 1901.

आहे किंवा द्राविडियन लोक बलुचिस्तानापर्यंत पसरले होते याची द्योतक आहे ? दोन्ही बाजूंचें समर्थन निरनिराळ्या लेखकांनीं केलें आहे. परंतु पहिलाच तर्क संभवनीय वाटतो. निरनिराळ्या लोकांच्या स्थलविषयक हालचाली ( Movements ) बाहेरून हिंदुस्थानांत झालेल्या आहेत, हिंदुस्थानांतून बाहेर झालेल्या नाहींत. द्राविडियन लोकांनीं हिंदुस्थानांतून मुद्दाम जाऊन त्या डोंगराळ प्रदेशांत वसाहती केल्या असतील ही कल्पना अशक्य वाटते, आणि त्याचबरोबर, पश्चिमेकडून हिंदुस्थानांत येत असतांना त्यांच्यापैकींच कांहींनीं वाटेंत वसति केली असेल हेंच ज्यास्त शक्य वाटतें. तेव्हां द्राविडियन लोक पश्चिमेकडून बलुचिस्तानांतून हिंदुस्थानांत आले असाच बलुचिस्तानांतील द्राविडियन ब्राहुई भाषेच्या अस्तित्वाचा अर्थ करणें सयुक्तिक आहे. हें विधान सर्वमान्य न झाल्याचें कारण असें आहे कीं, हे ब्राहुई लोक वंशानें हल्लीं सामान्यतः इराणी आहेत. तेव्हां वंश एक आणि भाषा दुसरी हें कसें काय शक्य आहे, अशी शंका साहाजिकच उत्पन्न होते. परंतु या शंकेचें निरसन सहजीं होऊं शकतें. सध्यां ज्या भागांत द्राविडियन ब्राहुई भाषा बोलली जाते त्या भागांत तुर्को-इराणी लोकांची वसति आहे; आणि ब्राहुई जातीचा विशेष असा आहे कां, त्यांच्यामधील विवाह सजातीयांतच होतात असें नाहीं; तर विजातीयांचेंहि मिश्रण त्यांच्यामध्यें होतें. त्यामुळें वंशदृष्ट्या आजचे तुर्को–इराणी लोक मूळ द्राविडियन लोकांहून भिन्न आहेत. तेव्हां वंशभिन्नत्वाचा प्रश्न वरील विधानाच्या आड येत नाहीं. अशारीतीनें बलुचिस्तानांतील ब्राहुई या द्राविडियन भाषेच्या अस्तित्वावरून असें सिद्ध होतें कीं, द्राविडियन लोक प्रागैतिहासिक काळांत बलुचिस्तानाच्या मार्गानें हिंदुस्थानांत आले.

या द्राविडियन लोकांची संस्कृति, त्यांचा धर्म इत्यादि संबंधींचा प्रश्न अतिशय गुंतागुंतीचा होऊन बसलेला आहे. पुढील विवेचनाच्या ओघांत तो आपोआप सुटेल. तेव्हां तत्संबंधीं विचार येथें न करतां तदनुषंगी इतर प्रश्नांचा विचार अगोदर करावयाचा आहे. विवेचनाच्या सोईसाठीं आर्य हिंदुस्थानांत आले व पंजाबांत वसति करून राहिले हा इतिहास या ठिकाणीं गृहीत धरून चाललें पाहिजे.

---

* Cambridge History of India Vol. I Part II.

## सुमेरियन संस्कृति

टैग्रिस आणि युफ्राटिस नद्यांच्या दुआबांत प्राचीन काळीं सुमेरिया नांवाचें सुसंस्कृत असें एक राष्ट्र वसलेलें होतें. इ. पू. ५००० वर्षें हा त्याचा काल होय. निप्पुर ही सुमेरियाची राजधानी होती. त्यांतील लोक सुमेरियन मानववंशाचे होते म्हणून त्यांच्या संस्कृतीस 'सुमेरियन' संस्कृति म्हणण्यांत येतें. पुढें दक्षिण इराणांतील एका जातीच्या लोकांनीं या दुआबाच्या उत्तर भागांत स्वारी करून तेथें आपली राजधानी स्थापन केली व तिला 'अक्कड' असें नांव दिलें. म्हणून या लोकांस 'अक्कडियन' असें म्हणतात. त्यांच्या भाषेत 'अक्कड' म्हणजे डोंगर असा अर्थ आहे; यावरून हे लोक डोंगराळ मुलुखांत रहाणारे होते असें दिसतें. हीं निरनिराळीं दोन राष्ट्रें तीनशें वर्षेंपर्यंत अस्तित्वांत होतीं. पुढें या दोन संस्कृति एकरूप झाल्या. या एकरूप संस्कृतीस 'सुमेरियन' किंवा 'खाल्डियन' संस्कृति म्हणतात.

सुमेरियन आणि अक्कडियन

सुमेरियन लोक शहरें वसवून रहात असत. जगाच्या इतिहासांत शहरांतील वसति पहिली सुमेरियन लोकांचीच आहे. जमिनीची लागवड करून तींतून ते चांगलीं पिकें काढीत. हे लोक चांगले साक्षर आणि कलासंपन्न होते. त्यांचें वाङ्मय उच्च दर्जाचें होतें व भौतिक शास्त्रांतहि त्यांनीं चांगली प्रगति केली होती. भाजलेल्या विटांवर किंवा पॅपिरस् नांवाच्या लव्हाळ्याच्या पानांवर ते लिहीत असत. त्यांची लिपि ईजिप्शियन लोकांप्रमाणें चित्रांची होती. विटांवर खिळ्यांनीं कोरून ते लिहीत असत; म्हणून त्यांच्या लिपीला 'कीललिपि' म्हणतात. गणित आणि ज्योतिषशास्त्र यांत त्यांनीं चांगली प्रगति केली होती. राशी या खाल्डियन लोकांनींच शोधून काढल्या. सोनें, रुपें, तांबें, कांसें हे धातु व रत्नें हीं त्यांना माहीत होतीं; एवढेंच नव्हे तर यांचे कलाकौशल्याचे उत्तम पदार्थ ते तयार करीत असत. चलनामध्यें धातूचा उपयोग केला जात असे. पारदर्शक कांच ते तयार करीत असत. विणकाम आणि भरतकाम उत्कृष्ट प्रतीचें करण्यांत येई. त्यांचा अंतर्गत आणि बाह्य जगाशीं व्यापार मोठ्या प्रमाणावर चालत असे. नद्यांतून व कालव्यांतून नावा चालत असल्याकारणानें देशांतला व्यापार जोरांत चाले व इराणी आखातांत नौकानयन चालू अस-

सुमेरियांतील संस्कृति

त्यानें बाह्य देशाशींहि त्यांचा व्यापार चालत असे. व्यापाराचीं केंद्रें अनेक होतीं. त्यांची शिल्पकला पुष्कळ सुधारलेली होती. सूर्यप्रकाशानें वाळलेल्या आणि भाजलेल्या अशा दोन प्रकारच्या मातीच्या विटा तयार करीत असत. इमारतींचें बांधकाम चांगलें पुढारलेलें होतें; त्यांत सर्वत्र विटांचा उपयोग केला जात असे. उंच देवळें व नक्षीकाम केलेले मोठमोठे राजवाडे ते बांधीत असत. शहरें पुष्कळ होतीं आणि तीं विस्तृत होतीं. गणितशास्त्राचा शोध लागल्यानें व्यापार व शिल्पकला यांस त्याची चांगली मदत होत होती, व ज्योतिषशास्त्राच्या शोधामुळें नौकानयन निर्धास्तपणें चालू होतें. कौटुंबिक आणि खाजगी मालमत्तेचे कायदे त्यांनीं तयार केलेले होते.

बॅबिलोनिया

इ. पू. ४००० वर्षें या कालांत अरबस्थानांतील सेमेटिक मानववंशाच्या लोकांनीं या सर्व प्रदेशांवर स्वारी करून तो जिंकला. त्यामुळें सेमेटिक वंश व सुमेरियन वंश यांचें संमिश्रण झालें. बॅबिलोन ही या राष्ट्राची राजधानी करण्यांत आली. तेव्हांपासून सुमेरियास बॅबिलोनिया हें नांव पडलें. बॅबिलोन अक्कडच्या नैऋत्येस व निप्पूरच्या वायव्य दिशेस आहे. या सेमेटिक बॅबिलोनियन लोकांमध्यें इ. पू. २७५० या कालांत ' सार्गन ' नांवाचा सुप्रसिद्ध योद्धा होऊन गेला. त्यानें इराणच्या आखातापासून भूमध्यसमुद्रापर्यंत मोठें साम्राज्य स्थापन केलें. त्यानें आपल्या राज्यांत सुमेरियन लिपि व भाषा सुरू केली व मूळच्या सुमेरियन लोकांची संस्कृति जशीच्या तशीच उचलण्याचा प्रयत्न केला. त्याचें साम्राज्य लौकरच नष्ट झालें. यानंतर अमोराइट् नांवाच्या सेमेटिक लोकांनींच सुमेरियावर वर्चस्व स्थापलें.

बॅबिलोनियांतील प्रगति

ईजिप्तची संस्कृति सर्वांत प्राचीन आहे. इ. पू. ५००४ या वर्षीं ईजिप्तमध्यें ' मेनिस् ' हा पहिला राजा होऊन गेला. ' सार्गन ' राजानंतर बॅबिलोनियावर ज्या सेमेटिक लोकांनीं स्वारी केली, त्यांच्यापैकींच कांहींनीं ईजिप्त जिंकून तेथें ' हिक्सॉस ' राजवंश सुरू केला. ॲसिरियन, फोनीशियन आणि हिब्रू हीं सेमेटिक वंशाचीं राष्ट्रें याच काळांत उदयास आलीं. दगडाचा उपयोग प्रथम फोनीशियन लोकांनीं केला; व दगडाच्या पक्क्या सडका जगांत प्रथम त्यांनींच बांधल्या. या काळांत बॅबिलोनियन साम्राज्य पुष्कळ पसरलें. त्याची संस्कृति

सेमेटिक आक्रमणापूर्वीच्या संस्कृतीहूनहि उच्च बनली. बॅबिलोनियन लोक शहरांतून विटांचे पक्के रस्ते करीत असत. एका गांवाहून दुसऱ्या गांवास जाण्याकरितां लांब सडका त्यांनीं बांधल्या होत्या. ईजिप्त, अरबस्थान वगैरे देशांशीं त्यांचा समुद्रांतून व्यापार चालत असे. मोठमोठीं लांकडीं जहाजें ते बांधीत असत; त्यावरून जनावरेंहि नेण्यांत येत. त्यांच्या शहरांना चौफेर तटबंदी असे. देवळांचीं शिखरें उंच बांधलेलीं असत. एकंदरींत सर्व दृष्टींनीं त्यांची संस्कृति इसवी सनाच्या अठराव्या शतकांतल्या संस्कृतीइतकी परिपूर्ण बनली असें सामान्यतः समजण्यास हरकत नाहीं.

‘ हम्मुरब्बीचें कोड ’

हम्मुरब्बी हा बॅबिलोनियांतील एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. ( इ. पू. २१०० ) त्यानें कायद्यांचा एक संग्रह तयार केला होता. त्यास ‘ हम्मुरब्बीचें कोड ’ म्हणतात. हें कोड बॅबिलोनियाची समाजरचना उत्तम रीतीनें व्यक्त करतें. आधुनिक कायद्याप्रमाणें न्यायदानाच्या व समाजव्यवस्थेच्या सर्व गोष्टी या संग्रहांत आढळतात. जमिनीची विभागणी, कालवे, टपालखातें, व्यापाराच्या सवलती मालक व चाकर यांमधील संबंध, कुटुंबांतील माणसांचे हक्क व मालमत्तेची विल्हेवाट या सर्वांविषयीं कायद्याचीं कलमें हम्मुरब्बीच्या कायदेसंग्रहांत मोठ्या मुत्सद्दीपणानें घातलीं आहेत.

पुढील इतिहास

पुढें इ. पू. ११०० या कालांत सेमेटिक ॲसिरियन लोकांनीं बॅबिलोनियन साम्राज्यावर स्वारी करून त्याचा विध्वंस केला व निनिवे ही राजधानी स्थापन केली. हें शहर अगदीं उत्तरेकडे आहे. त्यांचें राज्य दोनशें वर्षें चालल्यानंतर मीड्स् व पर्शियन् लोकांनीं या ॲसीरियन लोकांना जिंकलें. पुढें त्यांनाहि इ. पू. ३२५ सालीं ग्रीक बादशहा अलेक्झांडरनें जिंकलें. असा हा मेसोपोटेमियांतील एकंदर इतिहास आहे.

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील दळणवळण

आतां ईजिप्शियन, बॅबिलोनियन, फोनीशियन आणि हिब्रू लोकांचा हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर व्यापार चालत असे, ही गोष्ट अनेक प्रमाणांवरून सिद्ध झालेली आहे—

( १ ) खाल्डियन किंवा सुमेरियन ( सेमेटिक आक्रमणापूर्वीचे ) लोकांचें ‘ मिना ’ हें सुवर्णचलन होतें. त्याचा उल्लेख ऋग्वेदांत ( ‘ सचा मना हिरण्यया. ’—ऋ. सं. ८. ७८. २ ) आढळतो.

(२) सेमेटिक बॅबिलोनियन लोकांच्या कपड्यांच्या यादींत ‘ सिंधु ’ शब्द आढळतो. हिंदुस्थानांत तयार होणारी मलमल बॅबिलोनियांत जात असे. त्यामुळें ‘ सिंधु ’ शब्द बॅबिलोनियांत, ग्रीक भाषेंत आणि बायबलमध्यें ( Old Testament ) मलमलीचा वाचक आहे.

( ३ ) बॅबिलोनियन लोकांचा पहिला राजा ‘ उर्–ईआ ’ किंवा ‘ उर्-बगश् ’ याचें ‘ मुघीर ’ हें शहर उत्खननांत सांपडलें. त्यांतील अवशेषांत मलबारांतील सागवानाचें लांकूड सांपडलें आहे.

( ४ ) हिब्रू राजा ‘ सॉलोमन ’ याच्या व्यापारी जहाजांतून चंदनाचें लांकूड ( तामीळ-मल्याळम् Aghil; हिब्रू Abalim, Ahaloth ), हस्तिदंत ( संस्कृत-इभ; हिब्रू–Habbim ), मोर ( तामील-मल्याळम् Tokei ; हिब्रू–Tuki ), वानर ( तामीळ–Valgu; हिब्रू almug; संस्कृत- कपि; हिब्रू–Koph ईजिप्शिन–Kafu ) या वस्तु व त्यांजबरोबरच त्यांचीं नांवें मलबारच्या किनाऱ्यावरून हिब्रू लोकांत गेलीं.

( ५ ) खाल्डियन लोकांच्या मंत्रतंत्रांतील तैमात, उरुगूल, किमिदिन् हे शब्द अथर्ववेदांत आढळतात. अप्सुजित्, अप्सुक्षित् इत्यादि वैदिक शब्दांतील अप्सु ( Abzu ) हा शब्द मूळ बॅबिलोनियन आहे; तसेंच उरु ( उरुगाय, उरुक्रम, उरुक्षय इ. ) व इतु ( तुर्फरीतु ) हे शब्द बॅबिलोनियन आहेत.

उलटपक्षीं Jehovah हा शब्द मूळचा वैदिक होता ( यह्, यव्ही, यव्हत्, यव्हती, इ. ). तेथून तो हिब्रू लोकांच्या द्वारें बायबलमध्यें गेला.ऽ

( ६ ) मलबारांतून मसाल्याचे जिन्नस* चिंचेचें लांकूड वगैरे जिन्नस ईजिप्तमध्यें जात होते.× इ. पू. १००० वर्षांपूर्वीं मलबारांतून दक्षिण अरबस्थानांत तांदुळाचा व्यापार चालत असे.+ ( तांदूळ–तामीळ Arisi; अरबी–Aurz )

शतपथब्राह्मणांतील मनूची जलप्रलय-कथा बॅबिलोनियन वाङ्मयांतून घेतलेली आहे असें कांहीं ग्रंथकार म्हणतात, परंतु तें बरोबर नाहीं. निरनिराळ्या लोकांमध्यें सदृश कथा उत्पन्न होऊं शकतात. शिवाय आर्यांच्या जवळ

ऽ Tilak–Bhandarkar Commemorative Volume.

* Rev. Foulkes–Indian Antiquary VIII.

× Wilkinson–Ancient Egyptians II. p. 237.

+ Prof. Dunker–History of Artiquity Vol. VI p. 156.

कथावाङ्मय इतकें विपुल होतें कीं इतरांच्याकडून तें उसनें घेण्याची त्यांना जरूरी नव्हती.¶

हे द्राविडियन लोक चालवीत होते.

हिंदुस्थानांत हें व्यापारी दळणवळण द्राविडियन लोक चालवीत होते. यावरून त्यांची संस्कृति उच्च होती हें एकदम दिसून येतें. त्यांची भाषा समृद्ध होती. बाह्य प्रदेशांशीं त्यांचा व्यापार चालत असे, यावरून त्यांचा अंतर्गत व्यापार आपोआपच सिद्ध होतो. ते समुद्रयान करीत असत. एकंदरींत सुसंस्कृत देशांशी दळणवळण ठेवण्याइतकी द्राविडियनांची संस्कृति उच्च होती. सिंधु, यव्ह हे वैदिक शब्द बॅबिलोनियन आणि हिब्रू वाङ्मयांत आढळतात व मना, उरु, अप्सु, आलिगी, विलिगी, सिनीवाली, किमिदिन्, तुर्फरीतु हे सुमेरियन आणि बॅबिलोनियन शब्द ऋग्वेदांत आणि अथर्ववेदांत आढळतात. ही शब्दांची देवघेव व्यापारी दळणवळणामुळें झाली. परंतु हिंदुस्थानांतील आर्य हे स्वतः बॅबिलोनियन लोकांशीं व्यापारी देवघेव करीत होते असें अद्यापि सिद्ध झालेलें नाहीं. अर्थात् द्राविडियन लोकांच्या मध्यस्थीनें ही देवघेव झाली असली पाहिजे. ऋग्वेदकाळीं किंवा अथर्ववेदकाळीं आर्य दक्षिणेस राजपुतान्याच्या खालीं उतरलेले नव्हते. तेव्हां पंजाबांतील आर्यांची वसति आणि अरबी समुद्र यांच्यामध्यें द्राविडियन लोकांची वसति ऋग्वेदकाळीं असली पाहिजे. ( ऋग्वेदकाळापूर्वीं ते कदाचित् जास्त विस्तृत प्रदेशांत वसलेले असतील )

मलबारचा किनारा

बॅबिलोनियन व हिब्रू लोकांचा हिंदुस्थानाशीं व्यापार मलबार प्रांतांत चालू होता. हा व्यापार द्राविडियन लोकच चालवीत होते. ऋग्वेदकाळापूर्वीं व खुद्द ऋग्वेदकाळीं द्राविडियनांची वसति सिंध व राजपुताना या भागांत होती व सिंधु नदीच्या मुखाच्या आसपासच्या समुद्रकिनाऱ्यावर त्यांचें परप्रांतांशीं दळणवळण चाले. परंतु त्यांच्या वसतीच्या प्रदेशांवर ऋग्वेदकाळानतर आर्यांनीं आक्रमण केल्यामुळें त्यांच्यापैकीं जे आर्यांत सामील झाले नाहींत ते खालीं दक्षिण हिंदुस्थानाकडे सरकले व मग त्यांचें दळणवळण मलबारच्या समुद्रकिनाऱ्यावर चालत असे. सध्यां द्राविडियन लोकांची वसति दक्षिण हिंदु-

---

¶ Hopkins–Religions of India p. 543.

स्थानांतच आहे. ऋग्वेदकाळापर्यंत त्यांची वसति कोणत्या प्रदेशांत होती हें पहावयाचें आहे.

## मोहेंजो-दारो व हरप्पा

उत्खननाची पूर्वपीठिका

हिंदुस्थान सरकारचे आर्किऑलॉजिकल सुपरिंटेंडंट रायबहादुर दयाराम सहानी यांना १९२१ सालीं पंजाबांत माँटगोमेरी जिल्ह्यांतील हरप्पा या गांवीं जुन्या मुद्रा ( Seals ) व कांहीं रंगीत भांडीं सांपडलीं त्यानंतर लौकरच पश्चिम विभागाचे आर्किऑलॉजिकल सुपरिंटेंडंट आर्. डी. बानर्जी यांना सिंधप्रांतांत लारखाना जिल्ह्यांतील मोहेंजो-दारो या गांवांत बुद्ध स्तूपाचे अवशेष आढळले. तेथें खणून पाहतां त्याच्याखालीं त्याचप्रकारचें बांधकाम केलेलें आढळलें. तेव्हां हिंदुस्थान सरकारचे आर्किऑलॉजिकल डायरेक्टर सर जॉन मार्शल यांच्या देखरेखीखालीं दोन्ही ठिकाणीं उत्खननाचें काम १९२२ सालीं सुरू झालें; तें १९२७ पर्यंत चालू होतें. या उत्खननासंबंधींचा प्रचंड ग्रंथ ( Mohenjo-Daro and Indus valley Civilization ) सर जॉन मार्शल यांनीं तयार केला. तो इंग्लंडमधील प्रसिद्ध प्रकाशक आर्थर प्रोब्स्टाइन यांनीं तीन भागांत १९३१ सालीं प्रकाशित केला. त्याच्यावरून मोहेंजो-दारोच्या संस्कृतीसंबंधीं संपूर्ण माहिती मिळते. ( हरप्पा येथील संशोधनहि पुरें झालें असून तेथील संस्कृति मोहेंजो-दारो येथील संस्कृतीशीं पूर्णांशानें जुळती आहे. ) त्यांतील संक्षिप्त वर्णन खालील-प्रमाणें आहेः—

मोहेंजो-दारो येथील संस्कृतीचे कालविभाग

सिंधमधील या संस्कृतीमध्यें सोनें, रुपें व तांबें या धातूंबरोबर दगडाचाहि उपयोग केलेला आहे. म्हणून या संस्कृतीच्या काळास 'मिश्रयुग' ( Chalcolithic Age ) म्हणतात. मोहेंजो-दारोच्या प्रदेशांत बांधकामाचे सात थर सांपडले आहेत. वरचे पाहिले तीन थर अर्वाचीन काळचे ( Late Period ) त्याच्या खालचे तीन मध्यकाळांतले ( Intermediate Period ) व सर्वांत खालचा थर प्राचीन काळांतला ( Early Period ) असा कालक्रम ठरविण्यांत आला आहे. हे तीन काल अनुक्रमें इ. पू. २७५०, इ. पू. ३००० व इ. पू. ३२५० असे निश्चित करण्यांत आले आहेत. कांहीं

वस्तूंचा काल तर इ. पू. ४००० वर्षें ठरविण्यांत आला आहे. सिंधु नदी या गांवाच्या जवळून वहाते, म्हणून या संस्कृतीस 'सिंधु नदीच्या खोऱ्यांतील संस्कृति' ( Indus Valley Civilization ) म्हणतात. निरनिराळ्या रंगांचीं अनेक भांडीं तेथें सांपडलीं आहेत. येथील भांडीं वगैरे वस्तूंचें प्राचीन सुमेरियांतील उर्, अल्-उबैद, किश्, जमदेत-नस्र इत्यादि शहरांच्या अवशेषांतील त्या त्या वस्तूंशीं पूर्ण साम्य आहे. या साम्याचे सात प्रकार कल्पिले आहेत.

मोहेंजो-दारोची शहर-रचना वगैरे

शहररचनेसंबंधीं त्या लोकांना पूर्ण माहिती होती. सुधारलेले लोक शहरांतून रहात असत. मोहेंजो-दारो हें एक शहरच आहे. त्यांतील रस्ते अत्यंत रेखीव, प्रशस्त व बरोबर पूर्वाभिमुख असे आहेत. त्यांची रुंदी तेरा ते तीस फुटांपर्यंत निरनिराळी आहे. मोठमोठीं घरें व सार्वजनिक इमारती रस्त्यांशीं बरोबर काटकोन करून बांधलेल्या आहेत. घरांच्यामध्यें साडेतीन ते सात फूट रुंदीचे बोळ आहेत. कांहीं रस्त्यांचे कोपरे थोडेसे गोल केलेले आहेत. घरांचीं बाह्यांगें अगदीं साधीं दिसतात. बाहेरून घर सुंदर केल्यास त्या घराच्या मालकाच्या जवळ बरीच संपत्ति असली पाहिजे अशी कल्पना होऊन कर जास्त लादण्यांत येईल या भीतीनें बाहेरील बाजू साध्या ठेवल्या जात असाव्यात. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस नाले आहेत. स्वयंपाकगृहें व स्नानगृहें रस्त्यालगतच बांधलेलीं आहेत. त्यामुळें वापरलेलें पाणी तावडतोब नाल्यांत जातें. सर्व नाले जेथें एकत्र मिळतात तेथील मोठ्या मोऱ्यांची रचना प्रशस्त व अत्यंत परिश्रमानें केलेली आहे; यावरून त्या काळांत तेथें पाऊस पुष्कळ पडत असावा. घराच्या बांधकामांत कमानी बांधलेल्या दिसत नाहींत. ईजिप्त आणि बॅबिलोनियामध्यें कमानी बांधण्यांत येत असत. पवनचक्कीनें विहिरींतून पाणी काढीत असावेत. घरांना खिडक्या फार थोड्या आहेत; बहुतेक प्रत्येक घरांत एक स्नानगृह आहे. चोवीस खांब असलेला एक प्रशस्त दिवाणखाना मोहेंजो-दारो येथें सांपडलेला आहे. त्याचे खांब चार ओळींत आहेत. प्रचंड स्नानगृह ( Great Bath ) हा मोहेंजो-दारोंतील एक महत्त्वाचा विशेष आहे. १८० फूट × १०८ फूट इतका त्याचा घेर आहे; त्यांत ३९ फूट × २३ फूट एवढें पोहण्याचें तळें असून त्याच्या चारी बाजूंनीं मोठ्या ओसऱ्या ( Verandahs ) आहेत.

तळें आठ फूट खोल आहे व त्यास एका बाजूनें पायऱ्या आहेत. स्नान करणारांच्या सोईकरितां प्रत्येक पायरी भरपूर लांबरुंद केलेली आहे. ओसऱ्यांच्या मागच्या बाजूस अनेक खोल्या व सज्जे आहेत. एका विहिरींतून त्या तळ्यांत पाणी सोडलें जात असे व तळ्यांतलें अस्वच्छ झालेलें पाणी एका झांकलेल्या नळावाटे बाहेर नेण्यांत येत असे. तळ्यांतून पाणी बिलकूल झिरपत नसे. बांधकाम भाजलेल्या विटांचें आहे व त्याला चुन्याचा गिलावा केलेला आहे. एके ठिकाणीं उष्णतास्नानाचीहि (Sun-Bath) व्यवस्था केलेली आहे.

शिक्के व ताम्रपट

सुमारें सहाशें मुद्रा अगर शिक्के (Seals) तेथें सांपडले आहेत; असले शिक्के हिंदुस्थानांत इतरत्र कोठेंहि सांपडलेले नाहींत. प्रत्येक शिक्यावर चित्रलिपीच्या एक दोन ओळी व एक प्राणी असे काढलेले आहेत. या शिक्क्यांचे दहा प्रकार करण्यांत आले आहेत; पुष्कळशा शिक्क्यांवर एक पुंलिंगी, एका शिंगाचा, प्रचंड हरिणासारखा किंवा झुबकेदार शेंपटी असलेल्या बैलासारखा प्राणी काढलेला आहे. इतर शिक्क्यांवर रेडा, गेंडा, हत्ती, वाघ, मासा खाणारी सुसर, काळवीट, पौराणिक मानुष अगर अर्धमानुष आकृति, बकरा आणि विंचू अशा प्राण्यांच्या आकृति आहेत. कांहींवर पिंपळ किंवा बाभुळ हीं झाडें काढलेलीं आहेत. चौकोनी, तिकोनी, गोल व भांड्यांच्या आकाराचे असे शिक्क्यांचे चार प्रकार आहेत. तांब्याच्या पत्र्यांवर एका बाजूस प्राण्यांची आकृति व दुसऱ्या बाजूस लेख किंवा दोन्ही बाजूंस लेख असे काढलेले आहेत. त्यावरील प्राणी शिक्क्याप्रमाणेंच आहेत. लेखांच्या लिपीमध्यें निरनिराळ्या प्रकारचीं चित्रें आहेत. त्याचबरोबर कांहीं अक्षरेंहि आहेत. ते लेख म्हणजे कांहीं नांवें आहेत, आणि तीं संस्कृत भाषेंतील आहेत. मोहेंजो दारोंतील लिपिविभागाचे संशोधक प्रो. लँग्डन यांचें यावरून असें मत बनलें आहे कीं, जीपासून हिंदुस्थानांतील देवनागरी वगैरे लिपि निघाल्या ती मूळ ब्राह्मी लिपि या लिपीपासून निघाली. सुमेरियन लिपि व ही लिपि या एकच होत असेंहि त्यांचें ठाम मत आहे.

पृथ्वीदेवतेचीं चित्रें

सिंधुनदाच्या खोऱ्यांतील लोकांच्या धर्माची माहिती देणारी एकहि वस्तु तेथें सांपडलेली नाहीं. मातीचीं (Terracotta) कांहीं स्त्रीचित्रें सांपडलीं आहेत. त्या स्त्रीच्या कमरे-

भोंवतीं एक वस्त्र गुंडाळलें आहे. तिची केशररचना बरीच क्लिष्ट आहे आणि गळ्याभोंवतीं कांहीं तरी अलंकार आहेत. हीं पृथ्वीदेवतेचीं चित्रें होत. अशा प्रकारचीं चित्रें आशियाखंडाच्या पश्चिमभागांत पुष्कळ सांपडलीं आहेत. या मूर्ति नवस फेडण्याकरितां दान करीत असावेत किंवा घरांतून त्यांची पूजा केली जात असावी. पश्चिम आशियांत ज्या मातृप्रधान कुटुंबपद्धतीमुळें ( Matriarchal State of Society ) पृथ्वीदेवता उत्पन्न झाली त्याच पद्धतीमुळें येथें हा धार्मिक संप्रदाय रूढ झाला असावा. हरप्पा येथील एका शिक्क्यावरून पृथ्वीदेवतेला मनुष्यबलि देण्यांत येत असल्याचें दिसून येतें.

योगासन घातलेली शिवमूर्ति

एका शिक्क्यावर लहानशा सिंहासनावर बसलेली शिवाची मूर्ति काढलेली आहे. तिला तीन तोंडें आहेत व ती योगाच्या एका विशिष्ट स्थितींत आहे. तिनें मांडी घातलेली असून पायाचीं बोटें खालीं वळलेलीं आहेत. हात ताट करून त्यांचे आंगठे गुढघ्यास लावलेले आहेत. डोक्यावरील वस्त्रावर दोन शिंगें एकत्र मिळविलेलीं आहेत. यावरून मोहेंजो-दारो येथील धर्मात योगाला बरेंच महत्त्व असावें व त्या लोकांनीं कांहीं आध्यात्मिक कल्पना बसविल्या असाव्यात असें दिसतें. हत्ती, वाघ, रेडा आणि गेंडा हे प्राणी शिक्क्यावर काढलेले आहेत. सिंहासनाखालीं दोन हरिणें आहेत. सात अक्षरांचा एक लेख वरच्या बाजूस लिहिलेला आहे.

लिंगपूजा, प्राणी

मोहेंजो-दारो येथील लोकांत लिंगपूजा प्रचलित होती. दोन लिंग-मूर्ति मोहेंजो-दारो व हरप्पा येथें सांपडल्या आहेत. वृक्षपूजाहि प्रचलित होती. एक पिंपळासारखें झाड एका मुद्रेवर कोरलेलें आहे. ज्ञानवृक्ष ( Tree of Knowledge ) अशी कल्पना त्यांना होती कीं नाहीं हें समजत नाहीं. तथापि तें झाड ते पवित्र मानीत असत. आणखी दोन वृक्ष मुद्रांवर आढळतात. पौराणिक, नैसर्गिक आणि संदिग्ध असे तीन प्रकारचे प्राणी मुद्रांवर काढलेले आहेत. या प्राण्यांच्या दगडी मूर्तींची पूजा करीत असत. मुद्रांवर न काढलेले परंतु तांब्याच्या पत्र्यांवर कोरलेले असे प्राणी म्हणजे डुक्कर, कुत्रा, वानर, ससा, खार, पोपट व इतर कांहीं न ओळखणारे प्राणी हे होत. कांहीं प्राणी खेळणीं म्हणून केलेले होते व कांहीं पवित्र मानले जात.

लोंकर आणि सूत कांतलें जात असे व त्याचीं वस्त्रें विणीत असत. श्रीमंत

आणि गरीब दोघेहि चरखे फिरवीत असत. जांभळा रंग त्यांना माहीत होता. स्त्रिया आणि पुरुष दोघेहि दागिने वापरीत असत. कांहीं दागिने दोघांना समान होते व कांहीं फक्त स्त्रियाच वापरीत. श्रीमंत लोकांचे दागिने सोन्याचांदीचे व हस्तिदंताचे असत. गरीबांचे तांब्याचे, शिंपल्यांचे, हाडांचे वगैरे असत. घरांतील भांडीं अनेक आकारांचीं असून तीं तांब्याचीं असत. सुया, हस्तिदंताच्या फण्या, सळया वगैरे हाडांच्या अगर शिंपल्यांच्या असत. कुऱ्हाडी, करवंती, वस्तरे वगैरे हत्यारें ब्राँझचीं असत. मातीचीं खेळणीं अनेक तऱ्हांचीं आहेत. गोट्या व फांसे तेथें सांपडले आहेत. लहानमोठीं वजनेंहि आढळलीं आहेत. लहान वजनें करड्या रंगाच्या स्लेटचीं आहेत व मोठीं वजनें दगडाचीं असून त्यांना गोल कड्या घातलेल्या आहेत किंवा वरच्या बाजूस आंत दोर घालण्याकरितां भोकें पाडलेलीं आहेत. मेसापोटेमिया किंवा एलम (पार्शीया) येथील वजनांपेक्षां हीं वजनें जास्त प्रमाणशीर आहेत. कुऱ्हाड, भाला, धनुष्य, बाण, गदा, गोंफण व कट्यार हीं त्यांचीं आयुधें आहेत. शिरस्त्राण, चिलखत, ढाल व तरवार हीं आढळलीं नाहींत.

अलंकार, आयुधें

गहूं आणि यव (Barley) हीं धान्यें पेरीत असत. मोहेंजो-दारो येथें सांपडलेला गहूं पंजाबांतल्या गव्हासारखा आहे आणि यव हें धान्य ईजिप्तमधील अतिप्राचीन (Pre-dynastic) अवशेषांत सांपडलेल्या धान्याप्रमाणें आहे. यांशिवाय त्यांच्या आहारांत गाईचें, बकऱ्याचें व इतर कांहीं प्राण्यांचें मांस, अंडीं, समुद्रांतील वाळविलेले मासे, नदींतील मासे वगैरे असत हें तेथें सांपडलेल्या अर्धवट जळलेल्या हाडांवरून दिसून येतें.

आहार

प्रेताची व्यवस्था तीन प्रकारांनीं लावलेली आढळते. (१) सर्व देह पुरणें (२) कांहीं भाग पुरणें व (३) जाळल्यानंतर उरलेला भाग पुरणें. तेथें सांपडलेल्या मानवी देहांच्या अवशेषांवरून चार निरनिराळ्या मानववंशांचे लोक [(1) Proto-Austroloid, (2) Mediterranean (3) Mongolian branch of the Alpine stock, (4) Alpine] तेथें असावेत असें कपालमितिशास्त्रानुसार (Craniology) समजतें.

प्रेतव्यवस्था

अशा प्रकारची संस्कृति मोहेंजो–दारो व हरप्पा येथें सांपडलेली आहे.

मोहेंजो-दारोचे लोक कोण होते ?

हिचे मूळ उत्पादक कोण असावेत यासंबंधीं अजून निश्चित एकमत झालेलें नाहीं. ही संस्कृति वैदिक आर्यांची खास नव्हे ही गोष्ट सर्वसंमत आहे. वैदिक संस्कृतीसंबंधीं विचार करतांना ही गोष्ट स्पष्ट होईलच. सुमेरियन संस्कृतीशीं ही संस्कृति बव्हंशीं जुळती आहे एवढेंच नव्हे, तर कांहीं बाबतींत तिच्यापेक्षां सरस आहे. घरांची रचना, विहिरी, स्नानगृहें, गटारांची व्यवस्था इत्यादि बाबतींत हे लोक जगांतील त्या वेळच्या कोणत्याहि लोकांपेक्षां जास्त प्रगत होते. यांचें मूर्तिकाम, नक्षीकाम व कोरींव काम हीं सुमेरियन लोकांपेक्षां सरस आहेत.

ते द्राविडियन होते.

सिंधुनदाच्या खोऱ्यांतील ही संस्कृति द्राविडियन आहे व द्राविडियन आणि सुमेरियन ( सेमेटिक-आक्रमणापूर्वींचे ) लोक वंशानें एक होते असें माझें मत आहे. ज्या चार मानववंशांचे अवशेष तेथें सांपडले आहेत, त्यांत ऑस्ट्रिक व मेडिटरेनियन असे दोन वंश आहेत. द्राविडियन लोक याच दोन वंशांच्या मिश्रणापासून बनलेले आहेत. तेव्हां हे दोन वंश तेथें स्वतंत्र असे आढळणें अगदीं शक्य आहे. आतां दुसरे जे दोन वंश राहिले त्या मोंगोलियन व अल्पाईन वंशांचे लोक तिबेट व चीनच्या भागांतून हिमालय पर्वताच्या मार्गानें व वायव्य दिशेकडून प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत येत होते आणि पंजाब, संयुक्त प्रांत व सिंध या भागांत पसरलेल्या द्राविडियन लोकांशीं त्यांचा संबंध येणें अत्यंत साहजिक होतें. यामुळें मोहेंजो-दारोसारख्या शहरच्या वस्तींत त्यांचे अवशेष सांपडले यांत अनैसर्गिक असें कांहींच दिसत नाहीं.

कशावरून ?

हिंदुस्थानांत आलेल्या आर्यांना द्राविडियन लोक भेटले, व त्यांच्याशीं त्यांच्या लढाया होत असत. दस्यु हे लिंगोपासक होते असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. मोहेंजो-दारोच्या वसतींत लिंगमूर्ति सांपडलेल्या आहेत. यावरून वरील विधानासच दुजोरा मिळतो. द्राविडियन लोकांचा व बॅबिलोनियन लोकांचा समुद्रांत व्यापार चालू होता. बॅबिलोनियासारख्या राष्ट्रांशीं दळणवळण ठेवण्यास द्राविडियन लोकहि सामान्यतः तितक्याच उच्च संस्कृतीचे असावयास पाहिजे होते. मोहेंजो-दारोच्या संस्कृतीचे उत्पादक निःसंशय त्या योग्यतेचे होते.

यावरूनहि तेच द्राविडियन असावेत. ऋग्वेदकालीं वैदिक आर्यांची वसति मुख्यत्वेंकरून पंजाब व संयुक्तप्रांत या प्रदेशांत होती. त्यांचा 'सिंधु' शब्द बॅबिलोनियन वाङ्मयांत आढळतो व बॅबिलोनियन 'मिना' शब्द ऋग्वेदांत आढळतो. अर्थात् दोघांचा कांहीं तरी संबंध असावा असें ओघानें प्राप्त होतें. परंतु आर्यांचे बॅबिलोनियाशीं प्रत्यक्ष दळणवळण सिद्ध झालेलें नाहीं. मग या दोघांचा संबंध आला कसा? तर द्राविडियन लोकांच्या मार्फत ही शब्दांची देवघेव झाली असें आपण मागें पाहिलेंच आहे. तेव्हां आर्यांची वसति आणि व्यापाराचा मार्ग यांच्यामध्यें सुधारलेल्या द्राविडियन लोकांची वसति असणें जरूर होतें. मोहेंजो-दारोचें भौगोलिक स्थान या दृष्टीनें अगदीं योग्य आहे. यावरून वरील विधानासच पुष्टि मिळते. अतिप्राचीन काळापासून हिंदुस्थानांत दीर्घकाळपर्यंत स्वतंत्र वसाहती ऑस्ट्रिक द्राविडियन आणि वैदिक आर्य या तीनच लोकांनीं केल्या. यांपैकीं आर्यांची ही संस्कृति खास नव्हे हें निखालस सत्य आहे. ऑस्ट्रिक लोक इतके सुधारलेले नव्हते हेंहि निश्चित आहे. अर्थात् उरलेल्या द्राविडियन लोकांचीच ही संस्कृति होय हें क्रमानेंच येतें.

**द्राविडियन आणि सुमेरियन एकच होत**

द्राविडियन आणि सुमेरियन लोक हे एकच होत, असे मानण्यास पहिला पुरावा वंशशास्त्राचा आहे. दोन्ही लोकांची कपालमिति व शरीरयष्टि एकच आहे हें विधान बहुमान्य आहे.ऽ द्राविडियन हे दोन वंशांपासून बनलेले आहेत; तसेंच सुमेरियनहि त्याच वंशांपासून बनले असले पाहिजेत. ते दोन्ही वंश आशियाखंडांत सर्वत्र पसरलेले होते. दुसरा पुरावा लिपीचा. मोहेंजो-दारो येथील लिपि व सुमेरियांतील लिपि या एकच आहेत. हें लिपिसाम्य एवढ्या दोन देशांवरच थांबत नाहीं. दक्षिण हिंदुस्थान, एलम् (पर्शिया), ईजिप्त, क्रीट, उत्तर इटली या ठिकाणींहि हीच लिपि सांपडली आहे. बनारस हिंदु विश्वविद्यालयांतील डॉ. प्राणनाथ यांनीं नुकताच ही लिपि वाचण्याचा प्रयत्न केला आहे.× ब्राह्मी लिपि या लिपीपासून निघाली व या लिपींतील लेख संस्कृत भाषेंतील आहेत, तेव्हां ही संस्कृति आर्यांची आहे असें त्यांचें म्हणणें आहे.

---

ऽ Cambridge History of India Vol. I Part II.

×Indian Historical Quarterly, Calcutta, December 1931.

वर उल्लेख केलेल्या इतर राष्ट्रांतील लिप्या या लिपीहून थोड्या भिन्न आहेत. तेव्हां त्या मोहेंजो-दारो येथील लिपीच्या पोटलिपि असाव्यात व त्या लिप्या लिहिणारे लोक तेथून तिकडे गेले असावेत, असेंहि ते म्हणतात. ( पुणें भांडारकर इन्स्टिटयूटमध्यें भांडारकर स्मृतिदिनानिमित्त झालेलें व्याख्यान, आगष्ट १९३३ ) परंतु त्यांच्या प्रमाणांच्या मानानें त्यांनीं काढलेला सिद्धांत फार मोठा आहे. पहिली गोष्ट म्हणजे त्यांचें लिपिवाचन कितपत निर्दोष आहे हें पाहिलें पाहिजे. तें निर्दोष आहे असें गृहीत धरून चाललें तरी त्या लेखांत उल्लेखिलेल्या नुसत्या संस्कृत नांवांवरून ही संस्कृति आर्यांची आहे असें म्हणतां येणार नाहीं. संस्कृत धातु, व्याकरण इत्यादींचा उपयोग एकाहि शिक्क्यांत सांपडत नाहीं. तेव्हां त्या लोकांची भाषा संस्कृत होती आणि म्हणून ते आर्य होते असें म्हणतां यावयाचें नाहीं. शिक्क्यांवर संस्कृत नांवें आहेत, एवढ्यावरून संपूर्ण भाषाशास्त्राचा आधार त्यांच्या सिद्धान्ताला मिळूं शकत नाहीं. तसेंच, कपालमितिशास्त्र, पुराणशास्त्र वगैरे शास्त्रांचीं प्रमाणें व मोहेंजो-दारोच्या संस्कृतीशीं वैदिक आर्य संस्कृतीची तुलना यांचाहि त्यांच्या विधानास आधार मिळत नाहीं.

डॉ. प्राणनाथांचें लिपिवाचन

त्यांचें दुसरें विधान असें कीं, बाहेरील राष्ट्रांच्या लिपि मोहेंजो-दारोच्या लिपीहून थोड्या भिन्न आहेत, तेव्हां त्या लिप्या लिहिणारे लोक हिंदुस्थानांतून तिकडे गेले. परंतु मोहेंजो-दारोची लिपि ही मूळ लिपि व बाकीच्या तिच्या पोटलिप्या असें मानण्यास काय पुरावा आहे ? हे सर्व लोक मूळ एके ठिकाणचे होते एवढेंच फक्त यावरून म्हणतां येईल. एकंदरींत त्यांच्या लिपिवाचनावरून, द्राविडियन लोक हेच सिंधुनदाच्या संस्कृतीचे उत्पादक होते या विधानावर कोणत्याहि तऱ्हेचा आक्षेप उत्पन्न होऊं शकत नाहीं. मात्र द्राविडियन व सुमेरियन एकच आहेत असें म्हणण्यास एक प्रमाण एवढाच लिपीच्या एकत्वाचा उपयोग होतो. द्राविडियन आणि सुमेरियन यांच्या एकत्वाचा बाबतींत तिसरें प्रमाण संस्कृतीचें आहे. दोन्हीं संस्कृतींत साम्य कसें आहे याचें विवेचन मागें झालेंच आहे. तसेंच भाषाविषयक प्रमाणहि उपलब्ध होत आहे. शब्दकोश आणि व्याकरण या बाबतींत दोन्हीं भाषांमध्यें दिवसानुदिवस अधिकाधिक साम्य आढळून येत आहे.*

---

* A. S. Tyagaraju—Sumerio-Dravidian Affinities—Quarterly Journal of the Mythic Society, Bangalore October 1932 & etc.

या प्रमाणांवरून द्राविडियन व सुमेरियन लोक एकच असावेत असें माझें मत बनलें आहे मोहेंजो-दारोचा शोध लागण्यापूर्वी कित्येक वर्षें, एकोणिसाव्या शतकाच्या अंतापासून रॅगोझिन ( Vedic India ) वगैरे ग्रंथकारांचें हें मत बनलें होतें. डॉ. हॉल ( Ancient History of the near East ) डॉ. अविनाशचंद्र दास, श्री. चिं. वि. वैद्य इत्यादि लेखकांचें मत असेंच आहे. तथापि या दोन लोकांच्या एकत्वाचें कारण श्री. चिं. वि. वैद्य यांनीं निराळें दिलें आहे. 'सुमेरियन लोकांनीं मेसोपोटेमियांतून इकडे येऊन वसाहती केल्या' असें त्यांनीं म्हटलें आहे.× ते मात्र बरोबर वाटत नाहीं. सुमेरियन व द्राविडियन लोकांचें वंशदृष्ट्या आणि संस्कृतिदृष्ट्या साम्य असण्याला द्राविडियन लोक या सुमेरियनांच्या वसाहतीच असल्या पाहिजेत असें नाहीं. पश्चिम आशियांतील कांहीं लोक मेसोपोटोमियाकडे गेले व कांहीं हिंदुस्थानांत आले; अशा परिस्थितींतहि संस्कृति समान होऊं शकेल. शिवाय या दोन संस्कृतींत जो थोडासा फरक आहे त्याचें समर्थन याच विधानामुळें योग्य रीतीनें होऊं शकतें. सुमेरियांतले लोक इकडे आले असें मानलें तर ते इकडे आले याला प्रमाण काय, त्यांना तसे येण्यास काय कारणें घडलीं तीं दाखविण्याची जबाबदारी येते. तशीं निश्चित कारणें दाखवितां येत नाहींत. तेव्हां द्राविडियन लोक म्हणजे सुमेरियन वसाहती असें मानतां येत नाहीं.

इतर लेखकाचेंहि मत तसेंच आहे.

प्रो. वाडेल यांनीं " Indo-Sumerian Seals Deciphered" म्हणून एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं मोहेंजो-दारो व हरप्पा येथील लिपि वाचण्याचा प्रयत्न केला असून त्यावरून असा सिद्धांत काढला आहे कीं सुमेरियन लोक हे वैदिक आर्य होत. त्यांनीं अरबी समुद्राच्या मार्गानें येऊन इ. पू. ३१०० वर्षें या काळांत सिंधप्रांतांत वसति केली. 'हेच सुमेरियांतले वैदिक आर्य मेसापोटेमियांतून पर्शियामार्गानें हिंदुस्थानांत आले व इ. पू. ७०० वर्षें या कालांत त्यांनीं पंजाबांत व गंगा नदीच्या तीरांवर वसति केली; यालाच आपण आर्यांचें हिंदुस्थानांतील आक्रमण असें म्हणतों.'

प्रो. वाडेल यांचीं विधानें व त्यांचें खण्डन

× History of Sanskrit literature Vol. I. Sec. I. p. 217.

( पृष्ठ ९ ). सुमेरियन आणि वैदिक नांवांतील साम्य हा प्रो. वाडेल यांचा प्रमुख पुरावा आहे. परंतु नांवांतील नुसत्या उच्चारसाम्यामुळें त्यांचें एकत्व सिद्ध होऊं शकत नाहीं. आणि ज्या ठिकाणीं इतर अनेक गोष्टी अशा साम्याच्या विरुद्ध असतात तेथें तें साम्य त्याज्यच समजलें पाहिजे. या मुद्दयाचा विस्तारपूर्वक विचार करण्याचें कारण नाहीं. वंशशास्त्राप्रमाणें सुमेरियन लोक, मोहेंजो–दारोचे लोक व वैदिक आर्य हे एक होऊं शकत नाहींत. नांवांच्या उच्चारसाम्यामुळें त्यांच्या भाषांमध्यें साम्य प्रस्थापित होऊं शकत नाहीं. त्यांच्या पुराणकल्पनांत सादृश्य नाहीं. त्यांच्या संस्कृति भिन्न आहेत. शिवाय वैदिक आर्य मेसोपोटेमियांतून पर्शियामार्गे आले याल पुरावा नाहीं. वैदिक आर्यांच्या आगमनाचा इ. पू. ७०० वर्षें हा जो काळ त्यांनीं ठरविला आहे त्यालाहि कांहींच आधार नाहीं. एकंदरींत प्रो. वाडेल यांचें मत कमकुवत पायावर आधारलेलें आहे.

श्री. दा. ना. आपटे यांचा सिद्धान्त

बडोदें येथील श्री. दाजी नागेश आपटे यांनीं 'हिंदी–सुमेरियन संस्कृति' नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यांनीं असें मत मांडलें आहे कीं, सुमेरियन लोक आणि वैदिक आर्य हे एकाच आर्यवंशाचे होत. मूळ आर्क्टिक प्रदेशांतून कांहीं आर्य मेसोपोटेमियांत गेले व कांहीं हिंदुस्थानांत आले. धार्मिक आणि पौराणिक कल्पना व शब्दसाम्य हें त्यांचें मुख्य प्रमाण आहे. ज्योतिषविषयक उल्लेखावरून ऋग्वेदरचना जो काल ठरतो तोच काल सुमेरियांतील गिल्गमेश पुराणाच्या ज्योतिषविषयक रूपकावरून ठरतो. ज्या इंद्रवृत्रकथेवरून आर्यांचें आद्यस्थान ठरविण्यास मदत होते, ती कथा सुमेरियन वाङ्मयांत तशीच आहे. मर्डूक ( इंद्र ) हा तैमात ( वृत्र ) चा वध करतो अशी त्यांची कथा आहे. वृत्राप्रमाणें तैमातासहि सर्प म्हटलें आहे. जलप्रलयाची कथा, युगकल्पना, सप्तग्रह इत्यादि बाबतींत सुमेरियन व आर्य वाङ्मयांचें साम्य आहे. राशिकल्पना मूळ सुमेरियन लोकांच्याच होत. सृष्ट्युत्पत्तीच्या कल्पना दोघांच्याहि एकच आहेत. शम्स् आणि सूर्य, सिन् आणि चंद्र, रम्मान् आणि वरुण या देवताकल्पना दोघांच्याहि एक आहेत. तम्मूझ म्हणजे आर्क्टिक प्रदेशांत क्षितिजाखालीं जाणारा सूर्य होय. त्याला इश्तरा देवी पाताळांतून बाहेर काढते. याशिवाय रामायणांतील कांहीं व्यक्तींचीं साम्यें सुमेरियांत आढळतात. दुसरें प्रमाण शारीरिक साम्याचें. सुमेरियांत

सांपडलेले पुतळे आर्य हिंदूसारखे दिसतात. पुतळ्यांतील स्त्रीपुरुषांचे पोषाख वैदिक आर्यांसारखे दिसतात. कपालमिति, नासांक (Nasal Index) व केसांचे आकार यांच्या तुलनेवरून सुमेरियन आणि आर्य यांचें एकत्व दिसून येतें.

अशीं प्रमाणें देऊन श्री. आपटे यांनीं आपलें मत मांडलें आहे. परंतु त्यांचीं प्रमाणें अल्प आणि सदोष आहेत. पहिली गोष्ट अशी कीं, केवळ पौराणिक कल्पनांचें आणि देवतांच्या कार्यांचें साम्य हें वंश आणि संस्कृति यांचें ऐक्य सिद्ध करण्यास खात्रीनें पुरें पडूं शकत नाहीं. कारण धार्मिक कथा आणि देवता या निसर्गाच्या विविध स्वरूपांवर उभारलेल्या असतात, असें जगांतील सर्व लोकांच्या इतिहासावरून दिसून येतें. निसर्गाच्या एकाद्या अंगाचें स्वरूप सिद्ध करण्याकरितां कोणत्याहि प्रकारचा संबंध नसलेले निरनिराळे लोक एकाच प्रकारच्या कथा निर्माण करतात. कांहीं वेळां असें होतें कीं एका लोकांच्या कथा व्यापारी संबंधामुळें किंवा नुसत्या कर्णोपकर्णीं दुसऱ्या लोकांमध्यें जातात. शिवाय देवतांच्या कार्यांत थोडेसें साम्य दिसत असलें तरी त्यांच्या नांवांच्या उच्चारांमध्यें मुळींच साम्य नाहीं, ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे.

त्याचें खण्डन

रामायणांतील नायक राम ऐतिहासिक असला तरी ती कथा पौराणिक आहे, वैदिक नाहीं; त्यांतील साम्यावरून भिन्न लोकांचें कल्पनासाम्य फक्त सिद्ध होईल; जलप्रलयाची कथा सुमेरियन लोकांकडून घेतलेली नाहीं हें मागें पाहिलेंच आहे; युगाच्या आणि राशींच्या कल्पना अलेक्झांडरच्या काळांत हिंदुस्थानांत आल्या. शिवाय वैदिक आर्यांची नक्षत्रकल्पना सुमेरियन लोकांत आढळत नाहीं.[§]

भाषेचें प्रमाण श्री. आपटे यांच्या अगदीं विरुद्ध आहे. सुमेरियन आणि संस्कृत भाषांचा कांहींएक संबंध नाहीं. इतर वैदिक देवता सुमेरियन वाङ्मयांत आढळत नाहींत. सुमेरियन शिक्क्यांवर सर्वत्र महिष काढलेले आहेत. ऋग्वेदांत त्यांचा उल्लेखहि नाहीं. उलट ऋग्वेदांतील गाईचा अवशेषहि

---

§ C. V. Vaidya–History of Sanskrit Literature Vol. I pp. 217-24.

सुमेरियन संस्कृतींत नाहीं. सुमेरियन व मोहेंजो-दारोच्या लोकांचा वंशदृष्ट्या आणि संस्कृतिदृष्ट्या संबंध बहुमान्य आहे. त्याचप्रमाणें वैदिक आर्य व मोहेंजो-दारो येथील लोक यांचा वंशदृष्ट्या आणि संस्कृतिदृष्ट्या विरोध हाहि बहुमान्य आहे. या दोन्ही सिद्धान्तांशीं श्री. आपटे यांच्या विधानाचा विरोध आहे. अर्थात् त्यांचें मत अग्राह्य आहे.

विवेचनाचा सारांश

आतांपर्यंतच्या एकंदर विवेचनाचा सारांश असा काढतां येईल कीं, हिंदुस्थानांत आर्य लोक येण्यापूर्वीं तेथें प्रथम ऑस्ट्रिक लोक वायव्य दिशेकडून आले. त्यानंतर पश्चिम आशियांतील एका वंशाचे व सिथियन भाषासमूहापैकीं भाषा बोलणारे लोक बलुचिस्तानाच्या मार्गानें आले; व या दोहोंच्या मिश्रणानें द्राविडियन लोक बनले. मोहेंजो-दारो व हरप्पा येथील संस्कृति त्यांचीच होती. सुमेरियन व द्राविडियन हे एकच होत. बॅबिलोनिया, ईजिप्त वगैरे देशांशीं ते समुद्रांतून व्यापार करीत असत. या सर्व कालांत मोंगोलियन वगैरे इतर वंशाचे लोक हिमालय पर्वताच्या पलीकडल्या प्रदेशांतून हिंदुस्थानांत येत होते. अशा परिस्थितींत वैदिक आर्य हिंदुस्थानांत आले.

## आर्येतरांचा आर्यांवरील परिणाम

आर्य-संस्कृतींतील अनार्य भाग

मागें लिहिल्याप्रमाणें द्राविडियन लोकांसंबंधींची सर्व माहिती विवेचनाच्या ओघांत मिळालीच आहे. आतां ऑस्ट्रिक, द्राविडियन आणि बॅबिलोनियन या लोकांच्या धर्मांचा आणि संस्कृतींचा आर्यांच्या धर्मावर आणि संस्कृतीवर कोणता परिणाम झाला याचें या ठिकाणींच संकलित स्वरूपांत अवलोकन करून हा विभाग संपवावयाचा आहे.

ऑस्ट्रिक भाषेंतील शब्द

ऑस्ट्रिक भाषेचा परिणाम द्राविडियन भाषेवर होऊन तिच्यांतील कांहीं शब्द द्राविडियन भाषेंत आले असें मागें सांगितलेंच आहे. हिंदुस्थानांत प्रवेश केल्याबरोबर आर्यांना प्रथम ऑस्ट्रिक लोक भेटले. नवीन प्रदेशांत आल्यामुळें तेथील वनस्पति, प्राणी व इतर अज्ञात वस्तु यांना आर्यांच्या भाषेंत साहाजिकपणेंच नांवें नव्हतीं. त्यामुळें हीं नवीन नांवें त्यांनीं ऑस्ट्रिक भाषेंतून घेतली असलीं पाहिजेत असा तर्क होतो.

" जीन पृझिलुस्की यांनीं ' आर्य संस्कृतींतील अनार्य भाग ' ( Non-Aryan Loans in Indo-Aryan ) या लेखांत म्हटलें आहे कीं, लांगल ( नांगर ) आणि लिंग हे शब्द मूळ ऑस्ट्रो-एशियाटिक आहेत, आणि त्यांची व्युत्पत्ति पाहिली असतां दोन्ही शब्दांचा एकच अर्थ निघतो. लिंग हा शब्द पूर्वेकडील अनार्य भाषांत सांपडतो. परंतु इंडो-युरोपियन भाषांत सांपडत नाहीं."* तेव्हां लिंगपूजा आणि लिंग शब्द हीं दोन्ही मूळ ऑस्ट्रिक आहेत; त्यांच्यांतून तीं द्राविडियन लोकांत गेलीं व द्राविडियन लोकांतून आर्यांमध्यें आलीं. पुढें लिंगपूजा ही शिवपूजेंत मिसळून गेली.

ऑस्ट्रिक भाषेचें ऋण घेतलेल्या द्राविडियन भाषेचा आर्यांच्या संस्कृत भाषेवर परिणाम झाला. द्राविडियन भाषेंतील कांहीं मूळ द्राविडियन शब्द व तिच्यामध्यें आलेले कांहीं ऑस्ट्रिक शब्द आर्यांच्या भाषेंत घुसले. संस्कृत भाषेंत जे ऑस्ट्रिक शब्द आले ते स्वतंत्र रीतीनें आले, कीं द्राविडियन भाषेच्या मध्यस्थीनें आले हें समजण्यास मार्ग नाहीं.

भाषायुद्धाची प्रक्रिया द्राविडियन भाषेचा परिणाम

द्राविडियन भाषेचा आर्यभाषेवर परिणाम झाला व आर्यांच्या प्रदेशापुरती ती भाषा मृत झाली. द्राविडियन भाषेंतील कांहीं अक्षरें वैदिक भाषेंत नवीन आलीं. कारण तीं अक्षरें झेंद व इतर इंडो-युरोपियन भाषांत नाहींत. ' जेव्हां आर्यभाषेचा दुसऱ्या असंस्कृत अनार्य भाषेशीं संबंध येतो, तेव्हां अनार्य भाषा नष्ट होते. आर्यलोक ती भाषा बोलण्याचा प्रयत्न करीत नाहींत; परंतु अनार्यांना त्यांच्याशीं संबंध ठेवण्याचा प्रसंग येतो आणि ते आर्य भाषा मोडक्यातोडक्या स्वरूपांत बोलूं लागतात. पिढ्यानुपिढ्या असा प्रकार चालूं राहिला म्हणजे ती मोडकीतोडकी भाषा हळूहळु पूर्ण आर्य बनूं लागते आणि कालगतीनें मूळ अनार्यभाषा नैसर्गिक रीत्या विसरली जाऊन मृत होते. या भाषेच्या उत्क्रांतीच्या पायऱ्या आजसुद्धां आपणांस दिसतात. फक्त दक्षिण हिंदुस्थानांत आपणांस असें दिसून येतें कीं, द्राविडियन भाषा त्या लोकांच्या संस्कृतीबरोबर टिकून राहिलेल्या आहेत. अनार्य भाषेच्या संसर्गानें आर्यभाषा मृत झाल्याचें एकहि उदाहरण नाहीं. ' ऽ

---

* ( Atulkumar Sur-Beginnings of Linga Cult in India, Annals of B. O. R. I. Vol. XIII 1931-32 )

ऽ Imperial Gazettier Vol. I. pp. 351-2.

" परंतु या भाषायुद्धांत टिकून राहिलेल्या भाषेवर मृत भाषेचा परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. त्या भाषेच्या प्रगतीच्या प्रत्येक पायरीवर मृत-भाषेचे संस्कार दिसून येतात. हे संस्कार निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळ्या व भिन्नभिन्न प्रमाणांत होतात. उत्तरोत्तर कालांत हे संस्कार जास्त प्रमाणांत होतात व जसजशी त्या भाषेची प्रगति होत जाईल तसतसा तिच्या मूळ स्वरूपांत अधिकाधिक बदल होतो. याप्रमाणें त्या भाषेचीं भिन्नभिन्न प्रदेशांत भिन्नभिन्न स्वरूपें होतात, आणि त्या स्वरूपांची कालक्रमानें वृद्धि झाली असतां त्या मूळभाषेहून भिन्न होतात आणि त्या स्वरूपांच्या क्रमानुसार परस्परांपासून भिन्न होतात."*

इतर द्राविडियन भाग

ज्याप्रमाणें आर्यांच्या भाषेत द्राविडियन भाषा मिसळली, त्याप्रमाणें त्यांच्या वंशांतहि द्राविडियन वंश मिसळला. लिंग-पूजेबरोबर नागपूजा आणि वृक्षपूजा यांचाहि अंत-र्भाव आर्यधर्मांत झाला. आर्यांची कुटुंबपद्धति पितृप्रधान ( Patriarchal ) होती. द्राविडियनांची मातृप्रधान कुटुंबपद्धति आर्यांना नवीन म्हणून अनु-करणीय वाटली. आर्यांमध्यें एकाच गांवांतील वधूवरांचे विवाह होत असत. द्राविडियनांच्या उपरिनिर्दिष्ट कुटुंबपद्धतीमुळें त्यांच्यामध्यें सग्राम विवाह न करण्याची रूढि ( Exogamy ) अस्तित्वांत होती; तिचा थोडासा परिणाम आर्यांच्या विवाहपद्धतीवर झाला. मंत्रतंत्राच्या कल्पना मूळ आर्यांमध्यें होत्या ही गोष्ट खरी असली तरी यासंबंधींच्या कांहीं कल्पना त्यानीं द्रावि-डियनापासून घेतल्या असल्या पाहिजेत.× अशा रीतीनें द्राविडियन लोक आपली भाषा व संस्कृति यांसह आर्यांच्या उत्तरहिंदुस्थानांतील समुदायांत विलीन झाले; परंतु दक्षिण हिंदुस्थानांत उतरल्यानंतर त्यांनीं आपलें स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवलें.

बॅबिलोनियन भाग

मागें पाहिल्याप्रमाणें बॅबिलोनियन लोकांच्या भाषेतील फक्त कांहीं शब्द वैदिक आर्यांच्या भाषेमध्यें आले. प्रत्यक्ष संबंध न आल्यामुळें किंवा आर्यसंस्कृति तितकी परि-

* Cambridge History of India Vol I. Part II.

× Gilbert Slater–Dravidian Elements in Indian culture, 1924.

पूर्ण असल्यामळें बॅबिलोनियन लोकांचा दुसऱ्या कोणत्याहि स्वरूपाचा परिणाम आर्यांवर झाला नाहीं. ‘पर्शियामध्यें आर्यांचा बॅबिलोनियन लोकांशीं संबंध आला व त्यांच्यापासून धातुकाम, ग्रहज्योतिष व फल-ज्योतिष आर्य शिकले’ असें श्री. व्ही. एस्. दलाल यांनीं लिहिलें आहे * परंतु पर्शियामध्यें आर्यांचा बॅबिलोनियन लोकांशीं संबंध आला याला पुरावा उपलब्ध नाहीं. द्राविडियन लोकांच्या द्वारें समुद्रांतील व्यापारी दळण-वळणाच्या निमित्तानें त्यांचा बॅबिलोनियन लोकांशीं अप्रत्यक्ष संबंध आला. सोनें व तांबें हे धातु त्यांना उत्तरध्रुवाच्या प्रदेशांतच माहित होते व ते त्यांचा उपयोग दागिने व इतर वस्तु करण्यांत करीत असत. यज्ञयागादि क्रियांकरितां आर्यांनीं नक्षत्रज्योतिष स्वतंत्र रीतीनें शोधून काढलें होतें; तें बॅबिलोनियन लोकांत नाहीं. उलट खाल्डियन लोकांनीं शोधून काढलेल्या राशि हिंदुस्थानांत अलेक्झांडरच्या स्वारीबरोबर आल्या. मग आणखी कोणतें ज्योतिष आर्यांनीं बॅबिलोनियनांपासून घेतलें ? आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ श्री. दलाल लिहितात कीं, सर्वांत मोठ्या दिवसाचा अवधि, तीनशें-साठ दिवसांचें सौर वर्ष व अधिक मास या गोष्टी दोन्ही लोकांमध्यें समान आहेत व ऋग्वेदांत नक्षत्रांचा आणि ज्योतिष पहाणाराचा उल्लेख नाहीं. ज्योतिषविषयक कल्पनांत साम्य आहे म्हणून एकापासून त्या दुसऱ्यानें घेतल्या असेंच कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं. एकच कल्पना दोन ठिकाणीं स्वतंत्रपणें उत्पन्न होऊं शकतील. ज्योतिष पहाणाराचा अनुल्लेख हें प्रमाणहि निरर्थक आहे. ऋग्वेदांत नक्षत्रें नाहींत हें विधानहि चूक आहे. ऋग्वेदांत कोणतीं नक्षत्रें आहेत तीं योग्य ठिकाणीं सांगण्यांत येतीलच.

---

* V. S. Dalal–History of India, Bombay 1914.

# विभाग तिसरा

# आर्यांचें आर्यावर्तावरील आक्रमण

## दोन मतें

मागील विभागांत वर्णन केल्याप्रमाणें आर्यावर्तांतील परिस्थिति असतां मध्य आशियांतील मुक्काम हलवून स्थानांतरें करीत करीत आर्यांनीं ( इंडो-इराणी ) हिंदुस्थानांत प्रवेश केला. त्यांच्या अनेक टोळ्या एकामागून एक व वायव्यदिशेकडील एकाच मार्गानें आल्या. या आगमनाच्या बाबतींत डॉ. हॉर्नले यांनीं एक निराळा सिद्धांत काढला आहे.* पंजाबांतील सरहिंद जिल्ह्याच्या पूर्वेकडील म्हणजे सामान्यतः पंजाबांतील लोकांहून पश्चिमेकडील म्हणजे सामान्यतः संयुक्त-प्रांतांतील लोक वंशदृष्ट्या भिन्न आहेत. तेव्हां आर्यांचा पहिला समूह वायव्ये-कडून पंजाबप्रांतांत येऊन स्थिर झाल्यानंतर आर्यांची दुसरी लाट हिमालयां-तील गिल्गिट, चित्रळ या मार्गानें खालीं उतरली आणि प्रथम आलेल्या आर्यांना पूर्व, दक्षिण व पश्चिम दिशांना घालवून गंगायमुनांच्या तीरावर त्या लोकांनीं वसति केली. हिमालयाच्या डोंगराळ प्रदेशांतून त्यांना आपल्या कुटुंबांसह येणें साहजिकच शक्य नव्हतें. या नवीन प्रदेशांतील द्राविडि-यन लोकांशीं त्यांचा संबंध आल्यामुळें या दोन वंशांचें त्या प्रदेशांत मिश्रण झालें. म्हणून पंजाब आणि संयुक्तप्रांत यांतील लोकांत फरक दिसतो. हें अनुमान कपालमितिशास्त्रावरून काढण्यांत आलें होतें. इ. स. १९०१ च्या खानेसुमारीच्या वेळेस सर हर्बर्ट रिस्ले यांनीं पंजाब, राजपुताना व संयुक्तप्रांत यांतील लोकांच्या डोक्यांचीं मापें घेतलीं. त्यावेळीं लोकां-मध्यें दोन भेद असल्याचें आढळून आलें. पंजाब व राजपुताना यांतील लोक लंबशीर्ष ( Dolicho-Cephalic headed ) व संयुक्तप्रांतांतील लोक पृथुशीर्ष ( Brachy-cephalic headed ) असल्याचें दिसून आलें. त्याच-

आर्यांच्या आगमनाच्या बाबतींत कपालमिति व भाषाशास्त्र यांवरून काढलेली अनुमानें

---

* Dr. Hoernle, Cencus Report 1911

प्रमाणें एकंदर देहयष्टि, नाक, कपाळ, चेहरा या बाबतींतहि फरक दिसून आला. या अनुमानाला भाषाविषयक प्रमाण डॉ. ग्रीयर्सन यांनीं असें दाखवून दिलें कीं हल्लीं बोलल्या जाणाऱ्या ज्या भाषा संस्कृतापासून निघालेल्या आहेत त्यांचे दोन मुख्य भेद पडतात. पहिला प्रकार संयुक्तप्रांतांतील प्रदेशांत-' मध्य ' देशांत-आढळतो व दुसरा त्याच्या तिन्ही बाजूंस काश्मीर, पंजाब, सिंध, महाराष्ट्र, मध्यप्रांत, बहार-ओरिसा, बंगाल आणि आसाम या प्रदेशांत दृष्टीस पडतो. या बाह्य वर्तुळापैकीं फक्त गुजराथी भाषा ही पहिल्या प्रकारांत मोडते. पूर्व भागांतील हिंदी आणि पश्चिम भागांतील हिंदी असे हिंदी भाषेचेहि दोन भाग पडतात.¶

**सूर्यवंशीय आणि चंद्रवंशीय आर्य**

कपालमितिशास्त्र व भाषाशास्त्र यांवरून काढलेल्या वरील अनुमानावर एक पौराणिक कल्पना बसाविण्यांत आली आहे. " पुराणांमध्यें सूर्यवंशीय आणि चंद्रवंशीय असे आर्यांचे दोन भेद आहेत. ते दोन मार्गांनीं आलेल्या आर्यांशीं बरोबर जमतात. प्रथम आलेले व तीन बाजूंस पसरलेले लोक सूर्यवंशीय होत; व मागाहून येऊन गंगायमुनांच्या प्रदेशात वसलेले चंद्रवंशीय होत. पंजाबांतील मद्र, केकय आणि अयोध्येचें रघुकुल हीं सूर्यवंशीय कुलें होत. प्रयाग हा चंद्रवंशीय कुलांचा मध्यबिंदु होता. मगध, चेदि, शूरसेन, मत्स्य, कुरुपांचाल हीं चंद्रवंशीय कुलें होत. या उपपत्तीला ऋग्वेदाचाहि आधार मिळतो. चंद्रवंशाची वंशावळ पुरुरवस्, नहुष व ययाति यांच्यापासून सुरू होते व हीं तिन्ही नांवें ऋग्वेदांत आलीं आहेत. ययातीच्या पांच मुलांचीं नांवें एका मंत्रांत ( ऋ. १. १०१. ८ ) आलीं आहेत. पौराणिक कथेप्रमाणें यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु, पुरु यांपैकीं यदु व तुर्वश हे ययातीला देवयानीपासून झालेले मुलगे होते; व अनु, द्रुह्यु आणि पुरु हे शर्मिष्ठेपासून झालेले होते. यदु व तुर्वश यांचीं नांवें त्या मंत्रांत एकत्र असून बाकीचीं पुढें घातलीं आहेत; हीहि गोष्ट विशेष ध्यानांत येण्यासारखी आहे." *

या उपपत्तीचा कांहीं लेखकांनीं स्वीकार केला आहे, परंतु बहुमताला

---

¶ Dr.Grierson–Imperial Gazettier Vol. IV p. 358.

* C. V. Vaidya– History of Sanskrit Literature Vol. I. Sec. I. pp. 91–93

उपपत्ति असंभवनीय आहे.

ती अमान्य आहे. मला स्वतःला ती ग्राह्य वाटत नाहीं. पहिली गोष्ट अशी कीं, चित्रळ आणि गिल्गिटचा मार्ग हा अत्यंत दुर्गम आहे. या मार्गानें लोक आलेले असणें शक्य नाहीं. आर्यजाति एकच होती व मध्य आशियाच्या स्थानांतून ती खालीं आली ही गोष्ट निर्विवाद आहे. या उपपत्तीप्रमाणें कांहीं लोक वायव्य दिशेनें हिंदुस्थानांत आले व बाकीचे मध्य आशियांतच राहिले व कांहीं कालानंतर गिल्गिटच्या मार्गें आले असें मानावें लागतें. परंतु यावर असा आक्षेप उत्पन्न होतो कीं, कांहीं लोक स्थान सोडून गेल्यानंतर बाकीचे तेथें कां राहिले? बरें, कांहीं कारणानें राहिले असें मानलें तरी, ज्यावेळीं तेथून ते निघाले त्यावेळीं प्रथम गेलेल्या लोकांच्या मार्गाचें अनुकरण न करतां दुसऱ्याच मार्गानें प्रवास करण्याची जरूरी त्यांना कां भासली? ज्या दिशेनें त्यांचे सहचर गेले त्याच मार्गानें उरलेले बाकीचे लोकहि गेलेले असणें हेंच निसर्गप्राप्त आहे. या निसर्गाचें उल्लंघन करण्यास त्यांना काय कारण पडलें?

कपालमितीवरून तसें सिद्ध होत नाहीं.

कपालमितिशास्त्राचें जें प्रमाण मांडण्यांत आलें आहे, त्यावरूनहि कांहीं आर्य दुसऱ्या मार्गानें आले असें मानण्याची आवश्यकता उत्पन्न होत नाहीं. वायव्य सरहद्द प्रांतांतून जेव्हां आर्य पंजाबांत आले, तेव्हां त्यांना द्राविडियन लोक भेटले व त्यांच्याशीं त्यांचीं युद्धें झालीं. युद्धांत साहाजिकच त्या अनार्यांचा पराजय होत असे; त्यामुळें द्राविडियन लोक पंजाबांतून पूर्वेकडे सरकत संयुक्तप्रांतांत आले. आर्यांपैकीं जे लोक पंजाबांतून संयुक्तप्रांतांत आले त्यांचें व द्राविडियन लोकांचें मिश्रण झालें, व पंजाबांत वसति करून राहिलेले आर्य द्राविडियन मिश्रणापासून अलिप्त राहिले. अशी परिस्थिति घडून आलेली असणें अगदीं साहाजिक आहे. कपालमितिशास्त्राचा फरक या कारणामुळें दिसतो. तेव्हां दोन्ही प्रदेशांतील कपालमितीच्या भेदावरून त्यांतील लोकांच्या आगमनाचे दोन भिन्नपथ मानण्याचें कारण नाहीं.

भाषाशास्त्राचा आधार अशा रीतीनें घेतां येत नाहीं.

डॉ. ग्रीयर्सन यांचें भाषाविषयक प्रमाणाहि या सिद्धांतास पोषक होत नाहीं. त्यांचें प्रमाण आजच्या चालू भाषांवर बसविलेलें आहे. आजचा काळ आणि आर्यांच्या प्रत्यक्ष आगमनाचा काळ यांत सहा हजार वर्षांचा काळ लोटला आहे. या प्रचंड काळांत संस्कृत भाषेवर व

पुढें तिच्या पोटभाषांवर भिन्नाभिन्न परिस्थितींमध्यें जे संस्कार झाले, त्यांच्यावरून काढलेलें अनुमान आरंभींच्या वैदिक संस्कृत भाषेवर लादणें चुकीचें होईल. मागील विभागांत पाहिल्याप्रमाणें संस्कृत भाषेच्या मिश्रणपूर्वक स्थित्यंतरांची प्रक्रिया ध्यानांत ठेवली पाहिजे. भिन्न भिन्न काळीं आणि भिन्न भिन्न स्थळीं संस्कृत भाषेवर द्राविडियन इत्यादि भाषांचे परिणाम झाले आणि पुढें संस्कृत भाषेच्या ज्या पोटभाषा बनल्या, त्यांचीं स्वरूपें यामुळें संस्कृतापासून आणि परस्परांपासून भिन्न बनलीं. अशा स्थितींत कमजास्त प्रमाणांत मिश्र आणि भिन्न बनलेल्या भाषांचें वर्गीकरण करून त्यापासून काढलेलें अनुमान हें मूळ वैदिक भाषेच्या बाबतींत लागू करतां येणार नाहीं. तेव्हां कपालमितिशास्त्र व भाषाशास्त्र हीं दोन्ही प्रमाणें या उपपत्तीस पुरेशीं होत नसल्यामुळें ती स्वीकारतां येत नाहीं.

सूर्यवंशीय आणि चंद्रवंशीय आर्य हीं केवळ पौराणिक कल्पना आहे.

सूर्यवंशी आणि चंद्रवंशी आर्य या पौराणिक कल्पनेचें वरील आर्यभेदांशीं जें सादृश्य दाखविण्यांत आलें आहे तें या आर्यभेदाचें प्रमाण होऊं शकत नाहीं. त्या विधानावर ही कल्पना बसविलेली आहे. अर्थात् विधानाबरोबर त्यावरील कल्पनाहि त्याज्यच ठरते. चंद्रवंशीय आर्य सूर्यवंशीय आर्यांमध्यें पाचरीप्रमाणें घुसले व त्यांना त्यांनीं हुसकून लाविलें ही कल्पना केवळ कल्पनाच आहे. सत्यसृष्टींत ती उतरणें शक्य वाटत नाहीं. नव्या आणि जुन्या आर्यांच्या राजकुलांशीं चंद्रवंशी आणि सूर्यवंशी कुलें जमतात, व चंद्रवंशीय तीन राजांचा व ययातीच्या पांच पुत्रांचा उल्लेख ऋग्वेदांत आहे, या गोष्टी सहज जमून आलेल्या आहेत. यदुतुर्वशांचीं नांवें छंदोरचनेकरितां सहजीं एकत्र आलेलीं आहेत; त्यावर इतका अर्थ लादणें चुकीचें होईल.

## दस्यूंशीं झगडे

दस्यु म्हणजे पर्शियन नव्हेत.

आर्य हिंदुस्थानांत प्रवेश करीत असतांना त्यांना जे लोक भेटले व ज्यांच्याशीं त्यांचीं अनेकवार व अनेक ठिकाणीं युद्धें झालीं, त्यांना दस्यु असें नांव ऋग्वेदांत आहे. दस्यु आणि असुर हे शब्द पर्शियन लोकांचे वाचक आहेत असें एक मत आहे. दस्यु शब्द एकवचनी आला असतां झरथुष्ट्राचा वाचक व बहुवचनी आला असतां पर्शियन लोकांचा वाचक आहे; 'जरूथ' हा

शब्द ऋग्वेदांत आला आहे (ऋ.७.१.७, ९.६, १०.८०.३). त्यांत जरूथचा मृत्यु अग्नीमुळें झाला असेंहि म्हटलें आहे. पार्शीयन वाङ्मयांतहि झरथुष्ट्र अग्निद्वारा मृत झाल्याचा उल्लेख आहे; असा आधार वरील मताच्या समर्थनार्थ देण्यांत येतो. परंतु दस्यु शब्दाचा पार्शीयन वाचक अर्थ फक्त कांहीं ठिकाणीं निघूं शकेल. सामान्यतः दस्यूंचें वर्णन पार्शीयन लोकांस लागूं होणारें नाहीं. असुर शब्दाचा अर्थ लावण्याचेहि अनेक प्रयत्न करण्यांत आले आहेत.

दस्यूंचें वर्णन

आर्यांना पाहिले शत्रु म्हणून ऑस्ट्रिक लोक भेटले कीं द्राविडियन भेटले हें निश्चित समजण्यास मार्ग नाहीं. जरी कदाचित् ऑस्ट्रिक लोक प्रथम भेटले असले तरी कांहीं कालानंतर त्यांचा द्राविडियन लोकांशीं संबंध आला हें निःसंशय! दस्यूंचें जें वर्णन ऋग्वेदांत तुटक रीतीनें आलें आहे तें ऑस्ट्रिक लोकांचें आहे, कीं द्राविडियनांचें आहे हेंहि निश्चित ठरवितां येत नाहीं. देव न मानणारे (अदेवयुः–ऋ.८.७०.११) यज्ञयाग न करणारे (अयज्वन्, अयज्युः–ऋ. ७.६.३, ८.७०.११) देवपूजन न करणारे (अव्रताः–ऋ. १.५१.८, १७५.३, ६.१४.३, ९.४१.२; अकर्मन्–ऋ. १०.२२.८), अन्य देवतांची उपासना करणारे (अन्यव्रताः–ऋ. ८.७०.११, १०.२२.८; मूरदेवाः-ऋ.१०.८७.२), नाक नसलेले (अनासः–ऋ ५.२९.१०), कृष्णवर्णीय (पिशङ्गभृष्टि–ऋ. १.१३३.५) अज्ञेय भाषा बोलणारे (मृध्रवाचः–ऋ. १.१७४.२ इ.; विवाचः–ऋ. ३.३४.१० इ.; ध्रोघवाचः–ऋ. ७.१०४.१४), लिंगपूजक (शिश्नदेवाः–ऋ. ७.२१.५, १०.९९.३), कच्चें मांस खाणारे (क्रव्यादः–ऋ. १०.८७.२) दास, राक्षस, अग्निपूजा न करणारे, अशा विशेषणांनीं त्यांचें वर्णन ऋग्वेदांत केलें आहे.

'शिश्नदेवाः' या शब्दाचा अर्थ काय ?

'शिश्नदेवाः' या पदाचा लिंगपूजक असा अर्थ अर्वाचीन विद्वानांकडून केला जातो. यास्कादि टीकाकारांच्या मतानें 'अब्रह्मचर्याः' (निरुक्त ४. १९) असा त्याचा अर्थ आहे. 'शिश्नेन दीव्यंति इति' असा अर्थ सायणाचार्य करतात. आणि त्याचाच अनुवाद प्रि. विधुशेखर भट्टाचार्य यांनीं केला आहे.*

---

* Proceedings of the Sixth Oriental Conference, Patna 1930; Indian Historical Quarterly, March 1933.

त्यांचें म्हणणें असें कीं प्राचीन संस्कृतांत ' देव ' हा शब्द दुसऱ्या शब्दाशीं जोडला असतां त्याचा अर्थ ' पूजक ' असा होत नाहीं; तर ' तत्पर ' असा होतो. उ. मातृदेव, पितृदेव इ. ' स्त्रीदेव ' असा एक शब्द त्यांना पुराणांत आढळला आहे; त्याचा अर्थ स्त्रीपरायण असा आहे. याप्रमाणें ' शिश्नदेवाः ' याचा अर्थ ' शिश्नपरायण ' असा केला पाहिजे असें ते म्हणतात. परंतु एक तर मातृदेव इत्यादि शब्दांतील ' देव ' शब्दाचा ' तत्पर ' असाच अर्थ केला पाहिजे, ' पूजक ' असा किंवा बहुव्रीहि समासानें प्राप्त होणारा अर्थ करतां कामा नये, असा निर्बंध घालतां येत नाहीं; व दुसरी गोष्ट अशी कीं ' तत्पर ' हा अर्थ, ज्या मंत्रांत ' शिश्नदेवाः ' असा शब्द आला आहे त्या मंत्राच्या अर्थाशीं जुळत नाहीं. हा शब्द ऋग्वेदांत दोन ठिकाणीं आला आहे.

न यातव इंद्र जूजुवुर्नो न वंदना शविष्ठ वेद्याभिः ।
स शर्धदर्यो विषुणस्य जंतोर्मा शिश्नदेवा अभि गुर्ऋतं नः ॥
ऋ. ७.२१.५

या मंत्राच्या पहिल्या तीन पादांशीं ' शिश्नदेवाः ' या शब्दाचा कांहीं संबंध नाहीं. शेवटच्या पादाचा अर्थ असा आहे कीं ' लिंगपूजक आमच्या यज्ञांत न येवोत. ' हा अर्थ न घेतां ' शिश्नपरायण किंवा कामुक लोक आमच्या यज्ञांत न येवोत ' असा जर त्या वाक्याचा अर्थ केला तर त्यापासून काय बोध होतो ? कामुक लोक यज्ञांत न येवोत या म्हणण्याचा अर्थ काय ? तसेंच

स वाजं यातापदुष्पदा यन्त्स्वर्षाता परि षदत्सनिष्यन् ।
अनर्वा यच्छतदुरस्य वेदो घ्नञ्छिश्नदेवा अभि वर्पसा भूत् ॥
ऋ. १०.९९.३

या मंत्राचा अर्थ पुढीलप्रमाणें आहे:—

' संग्रामांत जाणारा इंद्र शत्रूंचीं धनें लुटतो. शंभर द्वारें असलेल्या शत्रुपुरांतील लिंगपूजकांना ठार करीत अप्रतिहत असा इंद्र शत्रूंच्या नगरांतील धन बलात्कारानें जिंकतो. '

' शिश्नदेवाः ' याचा अर्थ ' अब्रह्मचर्याः ' असा करून अब्रह्मचारी लोकांना इंद्र ठार करतो असा जर त्या वाक्याचा अर्थ केला तर त्यांतून काय निष्पन्न होतें ? कामुक लोकांना इंद्र ठार करतो असें कोठें सांगितलें आहे ? असें म्हणण्यांत तात्पर्य काय ? शिवाय हे दोन्ही मंत्र इंद्र या राष्ट्रदेवतेला उद्देशून

असलेल्या सूक्तांतले आहेत, ही विशेष गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे.

'आचार्यदेव' इत्यादि शब्दांचा 'आचार्यपरायण' इत्यादि प्रकारचा अर्थ होतो म्हणून 'शिश्नदेवाः' या शब्दाचा अर्थ तसाच केला पाहिजे, या मुद्यालाहि योग्य उत्तर देतां येईल. 'मूरदेवाः' असें एक दस्यूंचें विशेषण ऋ. १०.८७.२ यांत आलें आहे. 'पितृदेव' इत्यादि उपनिषदांतील शब्दांपेक्षां 'मूरदेवाः' या ऋग्वेदांतील शब्दाच्या अर्थानुसार 'शिश्नदेवाः' या शब्दाचा अर्थ करणें हें केव्हांहि युक्ततर होय. 'मूरदेवाः' याचें 'मूढपरायण' असें भाषांतर केल्यानें अर्थप्राप्ति काय होते ? त्याला कांहीं अर्थच नाहीं. 'ज्यांचे देव मूढ आहेत ते' असाच अर्थ करावयास पाहिजे. त्याचप्रमाणें 'शिश्नदेवाः' याचा अर्थ 'लिंग हा ज्यांचा देव आहे ते' असाच केला पाहिजे.

'शिश्नदेवाः' म्हणजे शिश्नपरायण नव्हे.

अशा प्रकारें शारीर, धर्म, भाषा, संस्कृति इत्यादि सर्वच बाबतींत आर्य व दस्यु यांच्यामध्यें वैधर्म्य होतें. यामुळें त्यांच्यामध्यें युद्धें होत असत. आर्यांच्या सुधारलेल्या शस्त्रांपुढें दस्यूंच्या म्हणजे द्राविडियन लोकांच्या हत्यारांचें कांहीं चालत नसे. ऋग्वेदांत आर्यांच्या शस्त्रांचा पुढीलप्रमाणें उल्लेख आहेः—

धनुष्यबाण, भाला ( ऋ. ५.५२.६, ५४.११ ), खंजीर ( ऋ.५.५७.२ ), तरवार ( पवीरव—ऋ. १०.६०.३ ), परशु हीं त्यांचीं आयुधें होतीं. ते लांकडी सोट्याचाहि उपयोग करीत असत. ( द्रुघण—ऋ. १०.१०२.९ ). बाण दोन प्रकारचे असत. (१) टोकांना शिंगें लावलेले व ( २ ) लोखंडाचीं किंवा तांब्याचीं पातीं असलेले. बाणाच्या फाळांना विष लावण्यांत येत असे. बाणांचीं टोकें तीक्ष्ण असत ( ऋ.६.४६. ११ ) व वेग येण्याकरितां त्यांना मागें पिसें लावलेलीं असत. बाणांचे भाते वापरीत होते ( निषंग—ऋ. ३.३०.१५; इषुधि—१.३३.३; ६.७५.५; १०. ९५.३ ). योद्धे अंगांत चिलखत घालीत असत ( ऋ. ४.३९ ४ ५३.२, ६.७५.१ ). शिरस्त्राण वापरण्यांत येई ( ऋ. २.३४.३ ). धनुष्याच्या दोरीपासून डाव्या हाताचें संरक्षण व्हावें म्हणून 'हस्तघ्न' वापरीत ( ऋ. ६.७५.१४ ). धनुष्याच्या दोरीचें एक टोंक नेहमीं मोकळें सोडलेलें असे व युद्धांत उपयोग करण्याच्या वेळीं तें बांधण्यांत येई. 'भूरिज' असा एक

आर्यांचीं शस्त्रें

शब्द ऋग्वेदांत दोनचार ठिकाणीं आला आहे; त्याचा अर्थ प्रो. रोथ यांनीं कात्री असा केला आहे. युद्धामध्यें आर्यांबरोबर त्यांचा ध्वज असे. ( ऋ. ७.८५.२; १०.१०३.११ ). आयुधांचें आणि युद्धाचें वर्णन या दृष्टीनें ऋग्वेदांतील ६.७५ हें सूक्त वाचनीय आहे.

आक्रमणाचें स्वरूप

आर्यांच्या आक्रमणाचें स्वरूप सामान्यतः असें सांगतां येईलः–दस्यु हे आपल्या प्रदेशांत उपजीविका करून रहात असतां आर्य त्या बाजूला आले म्हणजे त्यांचीं उच्च प्रकारचीं शस्त्रें पाहून ते घाबरून जात व आपापलीं घरेंदारें शेतें वगैरे सोडून आसपासच्या प्रदेशांत पळून जात. आर्य त्यांच्या शेतांत व गांवांत वसति करीत. त्यांच्यावर सूड उगविण्याकरितां दस्यु संधि पहात असत व ते बेसावध असतां एकदम त्यांजवर हल्ला चढवीत, त्यांचीं गुरेंढोरें पळवीत अगर त्यांच्या धार्मिक कार्यांत अडथळा आणीत असत. अशा वेळीं आर्यांना त्यांचा प्रतिकार करावा लागे. कांहीं मार्ग चालल्यानंतर आर्य मुक्काम करीत असत, त्या प्रदेशांतील अरण्य तोडून जमिनीची लागवड करीत असत व मुलुख पादाक्रांत करीत असत. अशा वेळीं दस्यु हे जवळपास असत. पंजाबांतील पुष्कळसा प्रदेश आक्रमिल्यानंतर दस्यु हे त्यांच्यापासून अत्यंत दूरच्या प्रदेशांत तरी गेले किंवा त्यांच्यामध्येंच सर्वांत कनिष्ठ वर्ग होऊन राहिले. हें आक्रमण कित्येक शतकें चाललें असलें पाहिजे. अशा वेळीं ऋग्वेदांतील ज्या सूक्तांची रचना झाली त्यांत दस्यूंच्यापासून आर्यांचें रक्षण व्हावें आणि दस्यूंचा नाश व्हावा म्हणून केलेल्या प्रार्थना सर्वत्र आहेत. दस्यु किंवा दास हे आर्यांच्यामध्यें कनिष्ठ सेवकवर्ग म्हणून समाविष्ट झाल्याकारणानें पुढील संस्कृत वाङ्मयांत 'दास' हा शब्द चाकर या अर्थीं रूढ झाला. ज्याप्रमाणें जर्मन लोकांनीं स्लाव्ह लोकांना जिंकल्यानंतर स्लाव्ह किंवा स्लेव्ह हा शब्द गुलाम या अर्थीं रूढ केला तसाच प्रकार येथेंहि झाला. आर्यांनीं दस्यूंच्या स्त्रियांशीं विवाह केल्यामुळें 'दासी' हा शब्द स्त्रीचाकर या अर्थीं विशेष रीतीनें रूढ झाला.

मंत्ररचनेला सुरवात कोठें झाली ?

सरहद्द प्रांतांतून मार्ग क्रमीत, दस्यूंचा नाश करीत किंवा त्यांना आपल्यामध्यें समाविष्ट करून घेत, अरण्यें तोडून जमिनीची लागवड करीत, कित्येक शतकांनंतर आर्य आपल्या परिवारासह पंजाबांत येऊन पोंचले. या

ठिकाणीं त्यांनीं मंत्ररचना करण्यास सुरवात केली. ऋग्वेदाच्या बहुतेक भागाची रचना येथें आल्यानंतर झाली. अफगाणिस्थानांत आल्यापासून मंत्ररचनेस प्रारंभ झाला असला पाहिजे. कारण अफगाणिस्थानांतील कांहीं भौगोलिक विशेष मंत्रांत उल्लेखलेले आढळतात. ऋग्वेदरचना याच्याहि पूर्वीच्या प्रदेशांत झाली असा कांहींचा समज आहे; परंतु तो निराधार आहे. बहुतेक मंत्ररचना पंजाबांतच झाली असें समजण्यास काय कारणें आहेत तीं आर्यांचा भौगोलिक विस्तार पहाण्याच्या वेळीं आपोआपच समजून येतील.

## ऋग्वेद-काल

'संस्कृत वाङ्मयाचा संपूर्ण विस्तार ध्यानांत घेतला असतां ऋग्वेदापूर्वीं कांहीं असेल अशी कल्पना करतां येत नाहीं. उलटपक्षीं हिंदु वाङ्मय आणि जीवन यांना ऋग्वेदाच्या पूर्वकालीन अस्तित्वाची आवश्यकता आहे.'*

ऋग्वेदकाल ठरविण्याची प्रो. मॅक्समुल्लर यांची पद्धति

ऋग्वेदाचें पद्यस्वरूप हें जगांतील सर्व वाङ्मयांच्या आदिकालीन इतिहासास धरूनच आहे. "प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा कालक्रम ठरविण्याचा पहिला प्रयत्न प्रो. मॅक्समुल्लर यांनीं 'प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा इतिहास' या पुस्तकांत १८५९ सालीं केला. अलेक्झांडरची स्वारी व बौद्ध धर्माचा उदय या दोन गोष्टींचा काल निश्चित असल्याकारणानें तेथून पुढें त्यांनीं पुढीलप्रमाणें तर्क चालविला. बौद्धधर्म हा आर्यधर्माला प्रतिक्रिया म्हणून उत्पन्न झाला; तेव्हां संपूर्ण वैदिक वाङ्मयाची निर्मिति बौद्धकालापूर्वीं झाली असली पाहिजे. सूत्रवाङ्मय हें बौद्धधर्माच्या उदयाच्या आणि प्रथम विस्ताराच्या समकालीन असावें. त्यामुळें त्यांचा काल इ. पू. ६०० ते इ. पू. २०० हा असावा. ब्राह्मणग्रंथ हे सूत्रकालापूर्वींचे आहेत व त्यांची रचना होण्यास सूत्रग्रंथाच्या रचनेपूर्वीं दोनशें वर्षें तरी लागलीं असलीं पाहिजेत. तेव्हां ब्राह्मणरचनेचा काल इ. पू. ८०० ते इ. पू. ६०० असा ठरतो. ब्राह्मणग्रंथांपूर्वीं वेदांची रचना झाली व त्यास कमींत कमी दोनशें वर्षें तरी लागलीं असलीं पाहिजेत म्हणून इ. पू. १००० ते इ. पू. ८०० हा संहिताकाल निश्चित होतो. मंत्रांचें संहितीकरण होण्या-

---

* Alfred Ludwig—The Rgveda.

पूर्वीं कित्येक वर्षें मंत्रांची रचना झाली होती व त्यांना धार्मिक स्वरूप प्राप्त झालें होतें. तेव्हां मंत्ररचनेचा काल इ. पू. १२०० ते इ. पू. १००० असा समजला पाहिजे. संस्कृत वाङ्मयाच्या भाषावृद्धीच्या दृष्टीनें भिन्नभिन्न पायऱ्या कल्पून त्यावरून वरील प्रकारचा रचनाकालक्रम प्रो. मॅक्समुल्लर यांनीं ठरविला आहे. प्रत्येक भाषाभेदाला दोनशें वर्षें हा जो काल त्यांनीं ठरविला आहे तो केवळ स्वतःच्या कल्पनेनें बसविला आहे हें स्पष्ट आहे. इ. पू. १२०० वर्षें ते इ. पू. १००० हा काल निश्चित म्हणून सांगतां येणार नाहीं; इतकेंच नव्हे तर दुसरा कोणताहि काल ऋग्वेदकाल म्हणून निश्चित सांगतां येणार नाहीं असें त्यांनीं स्पष्टपणें म्हटलें होतें. तथापि इ. पू. १२००–१००० हाच ऋग्वेदकाल होय असें सर्वत्र समजण्यांत येऊं लागलें. प्रो. श्रेडर सारखे लेखक भीतभीतच इ. पू. १५०० किंवहुना इ. पू. २००० हा ऋग्वेदरचनाकाल म्हणून सांगू लागले आणि जेव्हां प्रो याकोबी यांनीं ज्योतिषविषयक उल्लेखांवरून इ. पू. ४००० हा मंत्ररचनाकाल म्हणून ठरविला तेव्हां युरोपीय विद्वानांनीं त्यांच्याविरुद्ध मोठी ओरड केली आणि वेदकालासंबंधीं एवढें अतिशयोक्त मत दिल्याबद्दल आश्चर्य प्रगट केलें. जें मत ते सिद्ध म्हणून समजत होते, तें अनिश्चित म्हणून प्रथमपासूनच ठरविण्यांत आलें होतें ही गोष्ट ते विसरले. ''*

**डॉ. दासांची भूस्तरशास्त्रीय पद्धति**

याप्रमाणें एका पक्षानें ऋग्वेदकाल अगदीं अलीकडे ओढला, तर दुसऱ्या पक्षानें तो कित्येक हजार वर्षें मागें नेला. डॉ. अविनाशचंद्र दास यांनीं ऋग्वेदकाल इ. पू. २५००० वर्षें असा ठरविला आहे.+ " सरस्वती नदी समुद्रास मिळते असा उल्लेख ऋग्वेदांत ( ७.९५.२ ) आहे. सरस्वती आणि शुतुद्रि (सतलज ) समुद्रास मिळतात असाहि उल्लेख आहे ( ऋ.३.३३.२). हल्लीं सरस्वती नदी वाळवंटांत गडप झाली आहे आणि सतलज नदी सिंधूस मिळते. तेव्हां ऋग्वेदकालीं राजपुतान्याचे जागीं समुद्र असावा. त्यामुळें साहाजिकच सरस्वती आणि शुतुद्रि समुद्राला मिळत असत. भूस्तरशास्त्रदृष्ट्या जमिनीच्या जागीं पाणी व पाण्याच्या जागीं जमीन असे प्रकार कालांतरानें

* Winternitz--History of Indian Literature Vol. I. pp. 292–4.

+ Dr. A. C. Das-Rgvedic India.

होत असतात. पंजाबची हवा तेव्हां अतिशय थंड होती. वरीलप्रमाणें जमीन व पाणी यांची विभागणी आणि पंजाबची अति थंड हवा या गोष्टी भूस्तर-शास्त्रज्ञांच्या मतें ‘ Pleistocene period ’ मधील आहेत. हा काल इ. पू. ५०००० ते इ. पू. २५००० वर्षांचा होय. तेव्हां ऋग्वेदकाल कमींत कमी इ. पू. २५००० हा धरला पाहिजे, ” असें डॉ. दासांचें मत आहे. परंतु हें भूस्तरशास्त्राचें अनुमान अगदीं काल्पनिक आहे. त्याला इतर कोणत्याहि शास्त्राचा आधार नाहीं. एवढेंच नव्हे तर इतर शास्त्रांनीं काढलेल्या सिद्धांतांशीं त्याचा पूर्ण विरोध आहे. “ भाषांचा किंवा भाषाशास्त्रांचा इतिहास पाहूं गेल्यास आपणांस असें दिसून येईल कीं, हजारों वर्षेंपर्यंत भाषा या न बदलतां रहाणें शक्य नाहीं. हजारों वर्षांच्या कालावधीच्या दृष्टीनें विशेषतः वैदिक आर्यांसारख्या बुद्धिमान् लोकांची संस्कृतिदृष्ट्या केवढी प्रचंड प्रगति व्हावयास पाहिजे होती. वैदिक आणि ब्राह्मण काळांतील संस्कृतीच्या विशेषतः धर्माच्या सातत्याची सांखळी जोडणें यामुळें अशक्य होऊन बसतें. ब्राह्मणग्रंथांच्या भाषेचा आणि वैदिक भाषेचा निकटचा संबंध आहे. तसेंच इ. पू. तिसऱ्या शतकांतील अशोकाच्या लेखांशीं ब्राह्मणग्रंथांची भाषा बव्हंशीं संबद्ध आहे. वेदकाल इतका मागें नेल्यास ब्राह्मणग्रंथांच्या अशोकलेखांशीं असलेल्या संबंधाची उपपत्ति लागणें शक्य नाहीं.”× अशा रीतीनें ऋग्वेदकाल हजारों वर्षें मागें नेल्यास ऋग्वेदकालीन धर्म, संस्कृति व भाषा यांच्या वेदोत्तरकालीन धर्म, संस्कृति व भाषा यांच्याशीं असलेल्या संबंधाची उपपत्ति लागत नाहीं. त्या अनुमानाचा आधार अगदीं लटपटीत आहे. म्हणून तें त्याज्य समजलें पाहिजे.

ज्योतिषविषयक उल्लेखावरून ऋग्वेदकाल ठरविण्याचा प्रयत्न जर्मनींतील बोन युनिव्हार्सिटीचे प्रो. याकोबी यांनीं व लो. टिळकांनीं एकाच वेळीं म्हणजे १८९३ सालीं परंतु अगदीं स्वतंत्रपणें केला. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, दोघांनाही या प्रश्नाचें उत्तर एकच सांपडलें. त्यांपैकीं लो. टिळकांची उपपत्ति संक्षेपतः पुढीलप्रमाणें आहे:—*

---

× Winternitz–History of Indian Literature Vol. I. pp. 308–9

* Orion or the Researches into the Antiquity of the Vedas.

लो. टिळकांची ज्योतिषविषयक पद्धति

सूर्याच्या उदयास्तामुळें दिवस आणि रात्र हीं सर्वांत लहान कालमानें उपलब्ध होतात. पौर्णिमा आणि अमावास्या यांच्यामुळें शुक्ल आणि कृष्ण असे दोन पक्ष किंवा पंधरवडे तयार होतात. ते दोन्ही एकत्र केले असतां एक महिना होतो. दिवस आणि रात्र मिळून एक दिवस मानला असतां एका महिन्याचे तीस दिवस होतात. सूर्याच्या दक्षिणोत्तर गतीमुळें ऋतु तयार होतात व त्यांपासून एक वर्ष बनतें आणि एका सौरवर्षांत सरासरी बारा चांद्रमास होतात. संपातबिंदूच्या उलटगतीमुळें ( Precession of the Equinoxes ) शतकाहून मोठें कालखंड मोजण्याकरितां एक ज्योतिषविषयक वर्तुळ तयार होतें. भूमध्यरेषा ( Equator ) व क्रांतिवृत्त ( Ecliptic ) यांना सांधणाऱ्या बिंदूस ' संपात ( Equinox ) म्हणतात. हे संपात अर्थातच दोन आहेत. एक वसंत-संपात ( Vernal Equinox ) व दुसरा शिशिरसंपात ( Autumnal Equinox ). वसंत-संपाताचें क्रांतिवृत्तावरील एक संपूर्ण वर्तुळ ठोकळमानानें २६००० वर्षांत पूर्ण होतें आणि निरनिराळ्या नक्षत्रांतील त्यांच्या गतीवरून कालगतीचीं लहान प्रमाणें उपलब्ध होतात.

शतपथब्राह्मणकाळीं संपातबिंदु कृत्तिका नक्षत्रांत होता.

संपातबिंदु हे क्रांतिवृत्ताच्या वर्तुळांत उलटगतीनें बदलत असतात. हल्लीं वसंतसंपात उत्तराभाद्रपदा नक्षत्राच्या मागें आहे. एकामागून एक नक्षत्रांतून तो या ठिकाणीं आला आहे; म्हणजे पूर्वी तो उत्तराभाद्रपदा, रेवती, आश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष इत्यादि नक्षत्रांत क्रमवार होता. वसंतसंपात अश्विनी आणि कृत्तिका नक्षत्रांत असल्याचे स्पष्ट उल्लेख संस्कृत वाङ्मयांत आहेत. संपातबिंदूच्या मागेंमागें जाण्यानें ऋतूहि मागेंमागें जात असतात. प्राचीन संस्कृत वाङ्मयाच्या कालापेक्षां सध्यां ऋतु एक महिना मागें सरकले आहेत. आतां वैदिक आर्यांनीं क्रांतिवृत्त सत्तावीस नक्षत्रांत विभागलें आहे. $३६० \div २७ = १३\frac{१}{३}$ अंशांचें प्रत्येक नक्षत्र आहे. संपातबिंदु एक अंश मागें जाण्यास जवळजवळ ७२ वर्षें लागतात. म्हणजे $७२ \times १३\frac{१}{३} = ९६०$ वर्षें सामान्यतः संपातबिंदु एक नक्षत्र मागें जाण्याला लागतात. या साधारण नियमानुसार संपातबिंदूच्या हल्लींच्या स्थितीवरून कृत्तिका ( Pleiades ) नक्षत्रांत संपात-

बिंदु असण्याला किती काळ लागेल तो काढतां येईल. हा काळ सुमारें इ. पू. २५०० हा येतो. ( ९६० × ४ – १९२० = २४०० ) हा शतपथ ब्राह्मणाचा काल होय.* कारण,

एताः ( कृत्तिकाः ) ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते ।
सर्वाणि ह वा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशश्च्यवन्ते ॥

असें शतपथब्राह्मणांत ( २.१.२.३ ) म्हटलें आहे.

आणि ऋग्वेदकाळीं मृगशीर्ष नक्षत्रांत होता.

वसंतसंपात मृगशीर्ष ( Orion ) नक्षत्रांत असल्याचे अनेक संदर्भ टिळकांनीं दाखविले आहेत. तैत्तिरीय संहितेंत असें म्हटलें आहे कीं, ' फल्गुनीपूर्णिमा हें वर्षाचें मुख आहे. ' हेंच विधान पांच ब्राह्मणांमध्यें आलें आहे. अनेक विधानांच्या आधारें टिळकांनीं या विधानाचा असा अर्थ बसविला आहे कीं, त्यावेळीं दक्षिणायनान्त ( Winter Solstice ) फल्गुनी नक्षत्रांत होत असतांना वर्षारंभ होत असे. ज्याअर्थीं त्यावेळीं चंद्र फल्गुनी नक्षत्रांत पूर्ण होता त्याअर्थीं वसंतसंपात मृगशीर्ष नक्षत्रांत असला पाहिजे. त्यामुळें मृगशीर्ष यास साहाजिकपणेंच ' आग्रहायण ' ( वर्षारंभींचें ) असें नांव त्यावेळीं होतें. त्या काळीं नक्षत्रांची यादी याच नक्षत्रांपासून सुरू होत असली पाहिजे. ' आग्रहायण ' हें नांव ' ओरायन ' अशा स्वरूपांत ग्रीक वाङ्मयांत आढळतें. वसंतसंपात मृगशीर्षांत असल्याचे अप्रत्यक्ष परंतु स्पष्ट असे दुसरेहि कांहीं उल्लेख ऋग्वेदांत आहेत. रुद्रानें प्रजापतीचा शिरच्छेद केल्याची व इंद्रानें हरिणरूपी वृत्राचा शीर्षच्छेद केल्याची कथा ऋ. १.५२.१०, ५.३४.२, १०.६१.५–७ या ठिकाणीं आली आहे. ग्रीक वाङ्मयांतहि ' अपोलो 'नें ' ओरायन ' चा शिरच्छेद केल्याची कथा आली आहे. मृगशीर्ष नक्षत्रांतील ताऱ्यांवर या कथांची उभारणी झाली आहे. कृत्तिका नक्षत्रापासून मृगशीर्ष तिसरें आहे. म्हणजे दोन नक्षत्रें अंतर वाढलें. तेव्हां ९६० × २ = १९२० वर्षें मागील इ. पू. २५०० यांत मिळविलीं असतां ठोकळमानानें इ. पू. ४५०० वर्षें हा काल निघतो व हाच ऋग्वेदकाल होय.

आर्यसंस्कृतींतील सर्वांत प्राचीन काळ

टिळक यापुढें म्हणतात कीं, चित्रापूर्णिमेचा जो उल्लेख तैत्तिरीय संहितेंत आहे त्यावरून असें अनुमान निघतें कीं, वसंतसंपात पुनर्वसु नक्षत्रांत असल्याचें एका काळच्या लोकांस माहीत होतें. आदिति ही त्या नक्षत्राची

* शं. बा. दीक्षित—Indian Antiquary, Vol. XXIV 1895.

देवता आहे. सूर्य पुनर्वसु नक्षत्रांतून उत्तरखगोलार्धांत आला व त्यामुळें देवयान सुरू झालें ही वस्तुस्थिति देवमाता आदितीच्या कथेशीं बरोबर जुळते. आर्यसंस्कृतींतील सर्वांत प्राचीन काळ म्हणजे अदितिकाल म्हणतां येईल व तो ठोकळ मानानें इ. पू. ६००० ते ४००० असा सांगतां येईल.

ऋग्वेदकालासंबंधीं अशा प्रकारची उपपत्ति टिळकांनीं बसविली आहे.

ऋग्वेदकालासंबंधीं पाश्चात्यांचे आक्षेप

पाश्चात्य पंडितांचा यावर पहिला मुख्य आक्षेप असा कीं, प्राचीन आर्यांना फक्त चंद्रसंबंधीं नक्षत्रांचें ज्ञान होतें, सूर्याशीं संबद्ध म्हणून नक्षत्रांचें ज्ञान त्यांना नव्हतें. संपातांच्या अवलोकनाबद्दलचा एकहि पुरावा उपलब्ध नाहीं.× दुसरा आक्षेप असा आहे कीं 'न च्यवन्ते' याचा अर्थ, बरोबर पूर्वेस उगवतात असा नव्हे. पूर्वदिशेच्या प्रदेशांत त्या कांहीं काळ प्रत्येक रात्रीं कांहीं तासपर्यंत दिसतात, एवढाच त्याचा अर्थ होईल. तिसरा आक्षेप असा कीं, कृत्तिका पूर्वदिशेवरून हलत नाहींत हें एक पूर्वीचें दृश्य त्या ठिकाणीं लिहिलें आहे.+

त्यांचें निराकरण

पहिल्या आक्षेपाचें उत्तर असें आहे कीं 'सूर्य आणि चंद्र या दोहोंच्याहि गत्यनुसार आर्यांचे यज्ञ चालत असत. पार्वण (पंधरवड्याचे) यज्ञ हे चांद्रमासानुसार व सत्रें हीं सौर वर्षानुसार करण्यांत येत असत. वार्षिक सत्र हें सूर्यगतीप्रमाणें चालत असे व विषुवदिन—ज्या दिवशीं सूर्य वसंत किंवा शिशिरसंपातांत असतो व ज्या दिवशीं दिवस आणि रात्र समान असतात तो दिवस—वार्षिक सत्रांत महत्त्वाचा समजला जात असे.' * दुसऱ्या आक्षेपाचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे—'शतपथ ब्राह्मणांतील उताऱ्याचा अर्थ असा आहे कीं, या कृत्तिका पूर्वदिशेहून च्युत होत नाहींत, इतर सर्व नक्षत्रें पूर्वेपासून च्युत होतात. कृत्तिका पूर्वदिशेच्या रेषेवर उगवतात असा जर 'न च्यवन्ते' या पदाचा अर्थ केला तर उताऱ्यांतील उत्तरार्ध

× Winternitz--History of Indian Literature Vol. I. p. 298.

+ Macdonell—History of Sanskrit Literature.

* C. V. Vaidya-History of Sanskrit Literature Vol. I. Sec. II. p. 18.

अनर्थक ठरतो. कारण विषुववृत्ताच्या उत्तरेस २३° अंशांपर्यंत असणारा कोणताहि तारा उगवल्यानंतर केव्हां तरी पूर्वदिशेच्या रेषेवर आलाच पाहिजे. परंतु इतर सर्व तारे पूर्वदिशेहून ढळतात असें स्पष्ट म्हटलें आहे. त्या अर्थी कृत्तिका बरोबर पूर्वेस उगवतात असाच त्याचा अर्थ घेतला पाहिजे.* तिसऱ्या आक्षेपाचें खंडन असें होतें कीं, कृत्तिका वसंतसंपातांत होत्या हा काळ इ. पू. २५०० हा आहे. हा उतारा म्हणजे एक स्मरण लिहून ठेवलेलें आहे असें म्हणणारांच्या मतें शतपथब्राह्मणाचा जो काल आहे त्या कालांतल्या लेखकानें आकाशांतील ताऱ्यांचा उदय पाहून नवीन स्थितीचें अवलोकन केलें असतें आणि जुनी भूतकालांतली गोष्ट वर्तमानकालीन म्हणून त्यानें मांडलीच नसती. स्मरण म्हणूनच तें लिहिलेलें आहे असें जरी क्षणभर वादाकरितां गृहीत धरलें तरीसुद्धां ती ज्योतिषविषयक स्थिति ज्या कालांतली आहे त्या कालांतल्या लोकांनीं ती प्रत्यक्ष पाहिली होती असें सिद्ध होतें आणि ते लोक तितके प्राचीन ठरतात.†

## आर्यांची फाटाफूट

देवतास्तुति

याप्रमाणें सर्व आक्षेपांचें निरसन झाल्यानंतर इ. पू. ४००० हा ऋग्वेदकाल ठाम होतो. या कालांत कित्येक शतकेंपर्यंत मंत्ररचना चालू होती. उत्तरध्रुवापासून देवतांच्या संबंधीं ज्या अंधुक कल्पना परंपरेनें त्यांच्यामध्यें आल्या व शिल्लक राहिल्या त्या त्यांनीं मंत्ररूपानें व्यक्त केल्या. तसेंच हिंदुस्थानांत आल्यानंतर जे जे निसर्गचमत्कार त्यांना प्रभावी वाटले तेहि देवता कल्पून त्यांवर त्यांनीं स्तोत्रें रचिलीं. हा वेळपावेतों त्यांच्यामध्यें अनेक देवता अस्तित्वांत आल्या.

आर्यांत दोन पक्ष झाले

अशा रीतीनें पंजाबांत येऊन सर्वत्र स्थिरस्थावर झालें असतां व मंत्ररचना चालू असतांना आर्यांच्यामध्यें कांहीं कारणानें फूट पडली व दोन पक्ष निर्माण झाले. हा दुसरा पक्ष इराणी किंवा पारशी लोकांचा होय. टिळकांनीं लिहिल्याप्रमाणें ‘ वैदिक आर्य व इराणी लोक यांची ही फाटाफूट वसंतसंपात

* C. V. Vaidya-History of Sanskrit Literature Sec. II. p. 20. † Sec. I. p. 35.

मृगशीर्षात असतांना झाली. मृगनक्षत्रांत वसंतसंपात असतांना शिशिरसंपात मूळनक्षत्रांत असे व दक्षिणायन भाद्रपद महिन्यांत सुरू होत असे. पारशांचे पितृयाणाचे सहा महिने भाद्रपद महिन्यापासूनच सुरू होतात; आणि पितरांची मेजवानी याच महिन्यांत येते. हिंदूंचा पितृपक्षहि भाद्रपदाचाच कृष्णपक्ष होय. ' ( Orion p. 31 ). वैदिक आणि इराणी आर्यांची फाटाफूट इ. पू. ४००० च्या सुमारास झाली, याला व अप्रत्यक्षपणें ऋग्वेदरचनेच्या काळाला एक नवीन प्रमाण उपलब्ध होत आहे. इराणांत तेहरानचे आग्नेयीस सहा मैलांवर डॉ. श्मीट यांच्या नेतृत्वाखालीं उत्खननाचें काम चालूं आहे. या उत्खननांत कमींत कमी इ. पू. ४००० वर्षांच्या काळच्या इराणांतील अवशेष सांपडतील असा तर्क आहे. या अवशेषांमुळें इराण व मेसोपोटेमिया यांच्या तत्कालीन संबंधांवर नवीन प्रकाश पडेल असें समजण्यांत येत आहे.‡

हे पक्ष पंजाबांत निर्माण झाले; अफगाणिस्तानांत नव्हे.

आर्यांमध्यें पक्षभेद उत्पन्न झाल्याबरोबर इराणी आर्य पश्चिमेकडे परत गेले व इराणांत वसति करून राहिले. आर्यांची वसाहतीची दिशा पूर्व ही होती. तेव्हां त्यांच्यांतून फुटून बाहेर पडूं इच्छिणाऱ्या इराणी आर्यांनीं पश्चिम दिशा सुधारावी हें साहाजिकच होतें. हिंदुस्थानांत प्रवेश करतांना त्यांनीं हा प्रदेश तुडविला असल्यामुळें त्यानां या प्रदेशाची माहिती होतीच. इंडो-इराणी लोक उत्तरेकडून येत असतां अफगाणिस्थानच्या प्रदेशांतच त्यांची फाटाफूट झाली; किंबहुना इराणांतून पूर्वेकडे येत असतां कांहीं आर्य इराणांतच राहिले व बाकीचे अफगाणिस्थानांतून पुढें आले, असें आधुनिक काळांतील जुन्या संशोधकांचें मत होतें परंतु, हिंदुस्थानांत आल्यानंतर इराणी आर्य इराणांत गेले हेंच मत हल्लीं सर्वमान्य झालेलें आहे. याला मुख्य पुरावा भाषेसंबंधींचा आहे. वैदिक संस्कृत आाणि झेंद यांच्यामध्यें व्याकरण आणि शब्दकोश दृष्ट्या अतिशय साम्य आहे. ज्या ज्या बाबतींत झेंद ही उत्तरकालीन ( Classical ) संस्कृताहून भिन्न आहे त्याच बाबतींत वैदिक संस्कृतहि उत्तरकालीन संस्कृताहून भिन्न आहे. वैदिक संस्कृतासंबंधीं नियम सांगतांना पाणिनि ' छन्दसि ' असें म्हणतो व उत्तरकालीन

---

‡ हें उत्खननाचें काम पुरें झालें असून त्यासंबंधींचा ग्रंथहि १९३४ मध्यें प्रसिद्ध झाला आहे—Dr. Schmidt–Excavations at Ctesiphon.

म्हणजे त्याच्या समकालीन भाषेविषयीं बोलतांना ‘ भाषायाम् ’ असें म्हणतो. ‘ झेंद ’ हें ‘ छंदस्’चें ’च अपभ्रष्ट रूप आहे. इराणी लोक हिंदुस्थानांतून इराणांत गेले याला भौगोलिक पुरावाहि अवेस्त्यांत उपलब्ध आहे.*

पारशी लोक इराणांत जाण्यापूर्वीं तेथें रानटी जाती होत्या. त्यांच्याशीं त्यांना लढावें लागलें. या रानटी लोकांना जिंकून गुलाम करण्यांत येत असे व त्यांच्या जमिनी हिसकावून घेण्यांत येत असत. त्यांना व्यापार करण्याची परवानगी देण्यांत येत असे. कारण इराणी लोक शेती करण्यापेक्षां व्यापार करणें हलक्या प्रतीचें समजत असत.

पक्षभेदाचीं कारणें

आर्यांच्यामध्यें फाटाफूट होण्यास काय कारणें घडलीं ? एक कारण असें कीं, अनार्यांशीं युद्धें करीत वर्षानुवर्ष एकसारखें वणवण भटकत राहण्याचा कांहीं लोकांना स्वाभाविकच कंटाळा आला होता. कुठें तरी एके ठिकाणीं स्थिर राहून शांततेंत आणि सुखांत काल कंठावा अशी त्यांना इच्छा होऊं लागली होती. तथापि पर्शियांत जाण्याची इच्छा उत्पन्न होण्यास हें एकच कारण पुरेसें नव्हतें. मुख्य कारण धार्मिक स्वरूपाचें होतें. हिंदुस्थानांत आर्यांचा धर्म अनेकदेवतात्मक होता व पशुबलिपूर्वक यज्ञयागांना विशेष महत्त्व होतें. सृष्टीचे चालक म्हणून अनेक देव मानणें व त्यांना प्रसन्न करून घेण्याकरितां निरपराधी आणि गरीब पशूंचा वध करणें हें कांहीं लोकांच्या बुद्धीस पटेना म्हणून ते त्यांच्यांतून फुटून निघाले व पर्शियांत जाऊन राहिले. अहुरमज्द ही एकच देवता त्यांनीं मानली व यज्ञयागांत पशूंचा बलि देण्याचें वर्ज्य केलें. सोमयाग हा वैदिक आर्यांप्रमाणें त्यांच्यातहि केला जात असे. ‘ असुर ’ शब्द ऋग्वेदांत मूलतः चांगल्या अर्थाचा होता. परंतु त्याला राक्षसादिस्वरूपाचा अर्थ प्राप्त झालेलाहि ऋग्वेदांत आढळतो. या दोन्ही लोकांत धार्मिक भेद झाल्याकारणानें त्यांनीं परस्परांना निंदापूर्वक उल्लेखणें साहाजिकच होय. पारशी वाङ्मयांत देवपूजकांची ( Daeva ) निंदा केलेली आहे, तर वैदिक वाङ्मयांत असुरपूजकांची निंदा केलेली आहे. पारशी ग्रंथांतून ‘ देव ’ हा शब्द असुर किंवा दुष्ट देवता या अर्थी वापरला आहे व ‘ असुर ’ हा शब्द देवतावाचक आहे. ‘ हें धार्मिक वैर इतक्या थराला गेलें कीं, देवपूजक असुरपूजकांवर हल्ले करूं लागले. या हल्ल्यांचे प्रतिकारार्थ पारशी धर्मग्रंथांत मंत्र तयार केले

---

* Vendidad, 1st Fargard.

आहेत. देवपूजकांच्या यशाचें बीज पारशी धर्मग्रंथांच्या मतें त्यांच्या मंत्र-तंत्रास व यज्ञाचीं विविध अंगें यथासांग पार पाडण्याच्या कौशल्यास होतें. त्यामुळें, जरी त्यांना आपला धर्म त्यांच्या धर्माशीं संबद्ध असल्याचें माहीत होतें, तरीसुद्धां ते त्यांच्या धर्माचा द्वेष करूं लागले, आणि आपला धर्म त्यांच्या धर्माहून भिन्न असा तयार करण्याचें धोरण त्यांनीं ठेवलें. ' *

पर्शियन भाषेत ' स ' चा ' ह ' होतो. ' असुरो महो ' असें वरुणाचें वर्णन ऋग्वेदांत ( २.७.६ ) केलें आहे. त्यावरून ' अहुरमज्द ' हा शब्द बनला. अहुरमज्द देवतेची कल्पना पारशी लोकांनीं वरुणदेवतेवरूनच घेतलेली आहे.

**पारशी धर्माची स्थापना कोणीं केली ?**

' अहुरधर्माची स्थापना कोणीं केली असा जर प्रश्न विचारला तर हें काम एका व्यक्तीच्या हातून झालेलें नाहीं असेंच उत्तर द्यावें लागेल. तथापि ही गोष्ट खरी कीं, त्याला विशिष्ट स्वरूप एका विशिष्ट व्यक्तीनें--झरथुष्ट्रानेंच दिलें. झरथुष्ट्रापूर्वी आर्यांच्या ' अथर्वन् ' प्रमाणें जे अग्न्युपासक पुरोहित ( Saoshyanto ) होते, त्यांनीं अहुरधर्माचें स्थूल स्वरूप तयार केलें. देव-धर्माच्या विरुद्ध प्रथम शस्त्र त्यांनीं उचललें म्हणून अहुरधर्माचे मूळ संस्था-पक हे अग्निपूजक पुरोहित होत. असें हें धार्मिक युद्ध कित्येक शतकें चाल-ल्यानंतर झरथुष्ट्र जन्मास आला आणि त्यानें देवताकांडाचा आणि कर्म-कांडाचा पुरता नायनाट केला. पारशी धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, सामाजिक कायदे वगैरे त्यानें अगदीं भिन्न असे तयार केले व त्यांस संपूर्ण स्वरूप दिलें. म्हणून मज्दयस्नियन किंवा पारशी धर्माचा खरा संस्थापक त्यालाच म्हणणें वाजवी आहे. तो स्वतः अग्निपूजक होता. बॅक्ट्रिया ( बाल्हिक ) मध्यें त्याचा जन्म झाला असावा. त्याचा काल इ. स. पू. १००० च्याहि मागचा आहे, किंबहुना ख्रिस्ती शकाच्या आरंभीं तो असणें शक्य असल्याचीं कारणें दाखवितां येतील. '*

**' बोगाझ्कोइ ' च्या विटांवरील आर्य देवतांच्या उल्लेखाचें स्पष्टीकरण**

१९०७ सालीं जर्मन संशोधक ह्यूगो विंक्लेर यांनीं आशियामायनरमध्यें ' बोगाझकोइ ' ( Boghazkoi ) येथें उत्खनन केलें. त्यांत कांहीं मातीच्या विटा सांपडल्या आहेत. त्या विटांवर इ. पू. चौदाव्या शतकांत हिटीट ( Hittite ) लोकांचा राजा आणि मिटानी

* Dr. Martin Haug-Essays on the Parsees.

( Mitani ) लोकांचा राजा यांच्यामध्यें झालेल्या तहाच्या अटी कोरलेल्या आहेत. दोन्ही राज्यांतील देवतांचीं नांवें त्या तहाचीं रक्षक म्हणून त्यांवर कोरलेलीं आहेत. त्यांत बॅबिलोनियन आणि हिटीट देवतांखेरीज मित्र, वरुण, इंद्र आणि नासत्या यांचीं नांवें मिटानीच्या देवतांमध्यें लिहिलीं आहेत. हीं नांवें मिटानी लोकांत कशीं गेलीं, हा विद्वानांमध्यें एक मतभेदाचा प्रश्न आहे. या संबंधांत अनेक संभवनीय उपपत्ति मांडण्यांत आल्या आहेत. हिंदी आर्यांप्रमाणेंच आर्यांची ती एक शाखा आहे, अशी एक कल्पना प्रो. ओल्डेनबर्गनीं केली आहे. इंडो–इराणी काळांतून या देवताकल्पना मिटानी लोकांमध्यें गेल्या अशी दुसरी कल्पना एडवर्ड मेयर, गाइल्स् प्रभृतींकडून मांडण्यांत आली आहे. युरोपमधील मूलस्थानांतून आर्य हिंदुस्थानांत आल्यानंतर त्यांच्यांपैकींच कांहीं लोक पश्चिमेकडे परत गेले असें तिसरें मत हिलेब्रांट् , विंटरनिट्झ् वगैरे पंडितांनीं व्यक्त केलें आहे. इराणी लोक हिंदी आर्यांपासून विभक्त झाल्यानंतर त्यांच्यांतून–अर्थातच अवेस्त्यांतील शब्दोच्चार दृढ होण्यापूर्वीं–हीं नांवें मिटानी लोकांमध्यें गेलीं, असा चौथा तर्क करण्यांत आला आहे.

आतां या एकंदर कल्पनांपैकीं पहिल्या कल्पनेला जरूर तितका आधार मिळत नाहीं. कारण स्वतंत्र शाखेची कल्पना केल्यानंतर त्या शाखेचा इतिहास वांशिक, धार्मिक, भाषिक इत्यादि सर्व दृष्टींनीं मांडतां आला पाहिजे. तसा तो उपलब्ध नाहीं. इंडो–इराणी काळांतून देवतांचीं नांवें गेलीं म्हटलें तर तेंहि अशक्य वाटतें. कारण त्यावेळीं आर्य मध्य--आशियामध्यें होते. तेथून आर्यांची हालचाल पश्चिमेकडे झाली किंवा त्यांचें दळणवळण पश्चिमेकडे सुरू होतें याला ऐतिहासिक प्रमाण नाहीं. तिसरी कल्पनाहि विचारार्ह नाहीं. कारण आर्यांचें मूलगृह युरोपांत होतें हें विधानच मुळांत चुकीचें आहे. क्षणभर तें बरोबर मानलें तरी, किंवा तें सोडून विचार केला तरी, हिंदुस्थानांत आल्यावर तेथील सुपीक प्रदेशांत स्थिर झाल्यानंतर त्यांना इतक्या दूर जाण्याचें कारण काय ? इराणी लोकांच्या द्वारें हें देवतासंक्रमण झालें असावें, ही चौथी कल्पना मात्र संभाव्य वाटते. पंजाबांत आल्यानंतर धार्मिक मतभेद तीव्र झाल्याकारणानें जे आर्य इराणांत गेले त्यांच्यापैकींच कांहीं लोक पुढें गेले असावेत व त्यांच्याबरोबर देवताकल्पना गेल्या असाव्यात. किंवा मिटानी लोकांशीं असलेल्या केवळ दळणवळणाच्या संबंधामुळेंहि देवताकल्पना गेल्या असणें शक्य आहे. हीं नांवें तिकडे गेल्यानंतर इराणांत अवेस्त्यांतील धर्मशास्त्र दृढ झालें असावें आणि त्यांतील नवीन शब्दोच्चार

रूढ झाले असावेत. प्रो. मॅक्डोनेल यांना ही कल्पना मान्य आहे.* परंतु त्यांचें म्हणणें असें आहे कीं आर्यांची फाटाफूट इराणांत झाली आणि तेथून हिंदी आर्य हिंदुस्थानांत आले. परंतु तसें मानतां येत नाहीं आणि प्रस्तुत प्रश्नाकरितां तसें मानण्याची अवश्यकताहि नाहीं. तात्पर्य, हिंदुस्थानांतून इराणांत गेलेल्या आर्यांच्या द्वारें आर्यदेवतांचीं नांवें मिटानी लोकांमध्यें गेलीं असावींत.

## इराणी संस्कृति

पारशी धर्माचें स्वरूप संक्षेपतः या ठिकाणीं पहाणें जरूर आहे. 'अहुरमज्द हा एकच देव पारशी धर्मांत मानला आहे. अर्थात् एकेश्वरवाद हा त्याचा पाया आहे. आधिभौतिक आणि आध्यात्मिक सृष्टीची उत्पत्ति अहुरमज्दनेंच केली. त्याचे खालोखाल सहा 'अमेश स्पेन्त' आहेत. या दृश्य जगांत त्यांपैकीं प्रत्येकाला विशिष्ट क्षेत्र आंखून दिलें आहे. अशाच सशास्त्र पद्धतीनें दुष्ट तत्त्वांचेंहि जगावर साम्राज्य पसरलेलें आहे. त्यांपैकीं मुख्य व प्रत्येक बाबतींत 'अहुरमज्द' चा प्रतिपक्षी म्हणजे 'आंग्र मैन्यु' ( Angra Mainyu ) होय. मृत्युस्वरूप तोच होय; त्याच्याभोंवतीं 'अमेश स्पेन्त' नां प्रतिपक्षी म्हणून सहा 'अर्च-दएव' आहेत. याप्रमाणें आध्यात्मिक सृष्टीची दोन समान संघटित पक्षांत विभागणी केलेली आहे. एक पक्ष प्रकाश आणि पुण्य यांचा व दुसरा अंधकार आणि पाप यांचा. तथापि याला द्वैतवाद ( Dualism ) म्हणतां येणार नाहीं. कारण ही सर्व सृष्टि 'अहुरमज्द' ची आहे आणि अवेस्त्यांतील तत्त्वाप्रमाणें जगाच्या प्रलयकालीं या दोहोंचें जें प्रचंड युद्ध होईल त्यांत 'आंग्र मैन्यु' च्या पक्षाचा नाश होईल.'

आध्यात्मिक सृष्टीचें द्वैविध्य

'अदृश्य जगताप्रमाणें दृश्य जगांतहि असेच दोन विरोधी पक्ष आहेत. प्रत्येक मनुष्य, प्रत्येक प्राणी, प्रत्येक वस्तुजात सुष्ट आणि दुष्ट आहे. प्रत्येक वस्तूमध्यें या दोन शक्तींचें वास्तव्य आहे. दुष्ट कल्पना किंवा वस्तु ही व्यापक दुष्ट शक्तीपासून येत असते. तिच्या निवारणार्थ प्रार्थना हाच एक उपाय पारशी धर्मांत सांगितलेला आहे. नीतिकल्पनांना पारशी धर्मांत उच्च स्थान आहे. विचार,

नीतिकल्पना

* Prof. Macdonell–Vedic Index Vol. I Preface viii.

उच्चार आणि आचार यांचे बाबतींत धार्मिकता आणि कर्तव्यतत्परता हा पारशी नीतिशास्त्राचा पाया आहे. पापी विचार हे पापी कृत्यांइतकेच अनिष्ट आणि घातक आहेत, म्हणून पापपुण्याचा शोध मनांतच केला पाहिजे अशी पारशी लोकांची समजूत आहे. सत्य, प्रामाणिकपणा, औदार्य हे त्यांच्या नीतिकल्पनांतील प्रमुख गुण होते. '*

वैदिक आणि पारशी देवतांतील साम्य

वैदिक धर्म आणि झरथुष्ट्री धर्म यांच्यामध्यें देवतांचीं नांवें, आख्यायिका, यज्ञयाग, गृह्यसंस्कार आणि भौगोलिक मतें या बाबतींत अतिशय साम्य आहे. झरथुष्ट्री धर्मात 'यम' ही देवता 'यिम' या नांवानें आहे. 'मित्र' देवतेचें 'मिथ्र' असें नांव आहे. 'अपां नपात्' व 'वायु' या देवतांचीं तींच नांवें आहेत. इंद्राचे ऐवजीं 'वेरेथ्रघ्न' (वृत्रघ्न) आहे. 'सोम' चें 'हओम' असें रूप झालें आहे. भग-बघ, गंधर्व-गंदरेव, कृशानु-केरेशानि, अग्नि-आतर, त्रित-आप्त्य=थ्रित-आथ्व्य, विवस्वत्-विवंऱ्हत्, त्रैतन-थ्रएतोना, अशा वैदिक देवतांशीं समान देवता पारशी धर्मांत आहेत. ऋग्वेदाच्या मानानें पहातां अवेस्त्यांतील पुराणशास्त्र कमी आहे. अथर्वन्-आथ्रवन्, ऋत-अश, अहि-अझि, इ. प्रकारचीं शब्दसाम्यें अनेक दाखवितां येतील. 'आर्य' शब्द 'ऐर्य' असा अवेस्त्यांत येतो. 'सप्तसिंधु' चें 'हप्तहिंदु' असें रूप पारशी ग्रंथांत झालेलें आहे. 'सिंधु' चें 'हिंदु' असें रूप होऊन 'हिंदुस्थान' असें नांव बनलें. ( India हें नांव 'सिंधु' शब्दाच्या Indus या ग्रीक नांवावरून तयार झालें ) शेंकडों इतर शब्द व धातु वैदिक आणि झेंद भाषेंत समान आहेत.

यज्ञविषयक साम्य आणि धार्मिक विशेष

वैदिक आणि झरथुष्ट्री धर्मांतील यज्ञपद्धति एकच आहे. सोमयाग दोन्ही धर्मांत प्रचलित होता. होता-झओता, इष्टि-इष्टि, ऋत्विज-रथ्वी, आहुति-अझुइति, गोदुग्ध-गौशुधओ, बर्हि-बरेश्म इत्यादि यज्ञविषयक शब्द दोन्ही भाषांत सारखेच आहेत. वैदिक आर्यांप्रमाणें पारशी लोकांतहि उपनयन आहे. यज्ञोपवीताप्रमाणें त्यांच्यामध्यें लोंकरीच्या धाग्याची 'कोश्ती' घालतात. और्ध्वदेहिकाचे बाबतींत जाळणें किंवा पुरणें हीं दोन्ही त्यांनीं सोडून दिलीं.

---

* W. Geiger-Civilization of Eastern Iranians Vol I.

गांवाबाहेर ‘ दोख्म ’ म्हणून एक गोल मोकळी विहीर बांधीत व त्यांत प्रेत नेऊन ठेवीत असत. तेथें गिधाडें, कोल्हींकुत्रीं वगैरे तें खात असत. चांगल्या आणि वाईट अशा नैतिक द्वंद्वाची कल्पना त्यांनीं नवीन काढली. पुनर्जन्माची कल्पना अवेस्त्यांत आहे. अशा रीतीनें वैदिक धर्मांतील कांहीं गोष्टी त्यांच्या धर्मांत राहिल्या व कांहीं नवीन त्यांनीं शोधून काढल्या.

‘ झरथुष्ट्री हा ऐतिहासिक धर्म आहे. कालावधीनें त्यांत बदल झाला.

वेद आणि अवेस्ता

तो फेरबदल केवळ अंतःक्रियेनें झाला नसून इतर धर्मांच्या आणि राजकीय घडामोडींच्या परिणामानेंहि त्यांत फरक पडला. ’ * “ वेद आणि झेंद अवेस्ता या एकाच पर्वतांतून वहाणाऱ्या दोन नद्या आहेत. वेदाचा प्रवाह अथांग आणि अतिशुद्ध आहे व तो मूलस्थितीप्रमाणें शेवटपर्यंत राहिला आहे. झेंद अवेस्त्याचा प्रवाह अनेक प्रकारें दूषित झालेला आहे, त्यानें आपला मार्ग अनेक वेळां बदललेला आहे, त्यामुळें त्याचें मूळ निश्चित सांगतां येत नाहीं. ”$

झेंद अवेस्त्याविषयीं थोडीशी माहिती येथें देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

अवेस्त्याची रचना

“ झेंद अवेस्त्याचे दोन भाग पडतात. पहिल्या भागांत म्हणजे अवेस्त्यांत वेंदीदाद, विस्पेराद आणि यस्न हे येतात. ‘ वेंदीदाद ’मध्यें धार्मिक कायदे आणि पौराणिक कथा आहेत. ‘ विस्पेराद ’मध्यें यज्ञयागादिकांच्या प्रसंगीं म्हणावयाचे मंत्र आहेत. ‘ यस्न ’मध्यें यज्ञयागाचे मंत्र आणि पांच गाथा आहेत. या गाथा किंवा सूक्तें एका विशिष्ट आणि अवेस्त्याहून जुन्या काळांतल्या भाषेमध्यें लिहिलीं आहेत. दुसऱ्या भागाला ‘ खोर्द अवेस्ता ’ म्हणतात. त्यामध्यें लहान लहान प्रार्थना आहेत. या प्रार्थना फक्त पुरोहितांनींच म्हणावयाच्या नसतात, तर सर्व सश्रद्ध माणसांनीं दिवसांतल्या, महिन्यांतल्या आणि वर्षांतल्या कांहीं विवक्षित प्रसंगीं निरनिराळ्या महाभूतांसमोर म्हणावयाच्या असतात. या प्रार्थनांमध्यें पांच गाह, तीस सीरोझाचे मंत्र, तीन आफ्रीगान आणि सहा न्यायि यांचा समावेश होतो. देवतांच्या स्तुतिपर कांहीं यश्त, नास्क व इतर तुटक पहलवी ग्रंथ हे वास्तविक अवेस्त्याचे भाग नसतांनाहि त्यांचा अवेस्त्यांत समावेश करण्याची वहिवाट आहे. ”*

* Darmesteter–S. B. E. Zend Avesta, Introduction.
$ Rudolph Roth.

वेंदीदाद आणि गाथा यांचीं स्वरूपें परस्परभिन्न आहेत. गाथांची भाषा सर्वांत जुनी आहे, परंतु त्यांतील मजकूर अर्वाचीन आहे. उलट वेंदीदादची भाषा अर्वाचीन आहे, परंतु त्यांतील मजकूर सर्वांत जुन्या काळांतील आहे. वेंदीदादच्या लेखकाचे दृष्टीपुढें गाथा होत्या तथापि त्यानें गाथांच्या पलीकडील काळांतील वस्तुस्थिति लिहिली. गाथा अर्वाचीन काळांत परंतु जुन्या भाषेंत लिहिल्या गेल्या.

वेंदीदाद आणि गाथा यांचीं परस्परभिन्न स्वरूपें

“अवेस्ताकालांत शेतकी हा लोकांचा प्रधान उद्योग होता. परदेशांशीं व्यापार मुळींच नव्हता. अवेस्त्यांत उल्लेखलेले सर्व पदार्थ इराणांतच उत्पन्न होत असत. पैसा हें विनिमयसामान्य कोणत्याहि प्रकारचें नव्हतें. कोणत्याहि प्रकारची चैन त्यांना ठाऊक नव्हती. संततीची अपेक्षा हा विवाहाचा हेतु होता. संतति नसणें हें दुर्भाग्य समजलें जात असे. मुख्यतः मुलगे अपेक्षित असत. घराचें सर्व दृष्टींनीं संरक्षण करणें, बापाबरोबर लढाईवर जाणें, वंश चालविणें व संपत्ति वाढविणें हीं मुलाचीं कामें असत. जन्मलेल्या मुलाचा पहिला संस्कार त्याचे हात धुणें हा होता. समाजाचा एक उत्तम घटक तयार करणें हें मुलाच्या शिक्षणाचें ध्येय समजलें जात असे. विचार, उच्चार, आणि आचार यांच्यामध्यें पवित्रता हा मुख्य गुण समजला जात असे. बापाच्या पेशाप्रमाणें पौरोहित्य, युद्ध किंवा शेतकी यांपैकीं शिक्षण मुलाला दिलें जात असे. ही तीन वर्गांची कल्पना इराणी आर्यांनीं हिंदुस्थानांतून नेली होती. पौरोहित्यशिक्षणाकरितां मुलाला गुरुगृहीं पाठविलें जाई. मुलगा आणि मुलगी वयांत आल्यानंतर त्यांच्या गळ्यांत ‘ कोश्ती ’ हें पवित्र बंधन घालून समाजांत त्यांचा अंतर्भाव करण्यांत येई. ही ‘ कोश्ती ’ लोंकरीच्या बहात्तर धाग्यांची केलेली असे व ती विवक्षित समारंभपूर्वक तयार करण्यांत येई. ‘ कोश्ती ’ घातल्या नंतर मुलगा किंवा मुलगी स्वतंत्र समजले जात आणि त्यांच्यावर नैतिक व सामाजिक जबाबदारी पडत असे. मुलीचें लग्न वयाच्या पंधराव्या वर्षीं होत असे. मुलीच्या बापाकडे तिच्याकरितां मागणी घालण्यांत येत असे. कधीं कधीं मुली स्वतः वर पसंत करीत असत. विवाहाचे वेळीं वधूवरांचे हातांत हात घालीत असत आणि प्रार्थना व मंत्र म्हटले जात. विवाहानंतर वधूला सुंदर रीतीनें नटवून

अवेस्ताकालीन सामाजिक स्थिति

मिरवीत वरगृहीं नेत असत. समाजांत स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीचा दर्जा असे. द्रव्यार्जन हें पुरुषाचें काम असे व गृहाची अंतर्व्यवस्था हें स्त्रीचें काम असे. धार्मिक समारंभांत स्त्रीचा पुरुषाच्या बरोबरीनें भाग असे. जवळच्या नातलगांत विवाह करणें हें वैदिक आर्य त्याज्य मानीत असत. उलट अवेस्त्यांमध्यें जवळच्या नातलगांत विवाह करावेत असें सांगितलें आहे. भिन्न रक्ताची भेसळ न होण्याविषयीं इराणी लोक फार जपत, आणि तेवढ्याचकरितां हा नियम सांगितला आहे. सामान्यतः प्रत्येक पुरुषास एकच स्त्री असे, परंतु श्रीमंत लोक अनेक स्त्रिया करीत असत."

सामाजिक स्थिति (पुढें चालू)

"इराणी लोक गुरें पाळीत असत. त्यांमध्यें गाई, बैल, उंट, घोडा, गाढव, आणि मेंढी हे प्राणी असत. गाईला जास्त महत्त्व असे. गुरांकरितां गोठे बांधलेले असत. त्यांच्याकरितां गवत सांठवून ठेवीत. घोड्याचा उपयोग युद्धांत केला जात असे. रथालाहि घोडे जोडीत. घोडा पवित्र मानला जात असे. उंट हा प्राणीहि त्यांना उपयुक्त होता. इराणी लोकांच्या नांवापुढें 'उष्ट्र' आणि 'अस्प' (अश्व) हे शब्द नेहमीं येतात. कुत्र्याला फार मान दिला जात असे. शेती करीत असत; परंतु त्या विषयाचें ज्ञान विस्तृत नव्हतें. पाटबंधारे अल्प प्रमाणांत होते. नदीच्या कांठानें शेती करीत. पाऊस अनिश्चित प्रमाणांत पडत असे. कलाकौशल्य वरच्या दर्जाचें होतें. सोनें, चांदी, तांबें व शिसें या धातूंचीं कामें करीत असत. सोन्याचें जरतारी काम होत असे. नित्योपयोगी भांडीं पितळेचीं आणि शिशाचीं होतीं. तरवार, खंजीर, बाण, चिलखत हीं धातूंचीं असत. मातीचीं भांडीं आणि कौलें भाजून पक्कीं करीत असत. रथ तयार करतां येत होते. वस्त्रें विणत असत; परंतु कांहीं कपडे कातड्याचे होते. वैद्यक बरेंच सुधारलेलें होतें. 'आंग्र मैन्यु'च्या शक्तीमुळें रोग होतात अशी समजूत होती. ताप हा मुख्य रोग होता. पुरोहित हेच मुख्यतः वैद्य असत. रोगनिवारण विशेषतः मंत्रांनींच करीत असत. त्यांचा उपयोग न झाल्यास औषध देत. कांहीं रोगांवर शस्त्रक्रियाहि करीत असत. रोग्याच्या दर्जाप्रमाणें फी असे. फी म्हणून जनावरें देण्यांत येत. व्यापारी दळणवळण मुळींच नव्हतें. इराणी लोकांना शहरें माहीत नव्हतीं. ते खेड्यांत रहात असत. सर्व आप्त मिळून एकत्र राहात असत. शेतावरच त्यांचें घर असे. अशा घरांपासून खेडीं तयार होत असत."‡

‡ W. Geiger–Civilization of Eastern Iranians Vol. I.

अवेस्त्याच्या मताप्रमाणें धार्मिक मनुष्याचें सर्व आयुष्य म्हणजे 'आंग्र मैन्यु' आणि त्याच्या सहकारी दुष्ट शक्ति यांशीं युद्ध होय. या दुष्ट शक्ति प्रत्येक क्षणाला मनुष्यावर आक्रमण करूं पहातात, म्हणून त्यांच्या नाशाकरितां दिवसांतून अनेक प्रसंगीं प्रार्थना म्हणावयास सांगितल्या आहेत. निजून उठल्यानंतर, स्नान केल्यावर, कपडे घातल्यावर, भोजनोत्तर, बाहेर जातांना, निजतांना अशा प्रकारें प्रत्येक दैनिक कार्यक्रमानंतर प्रार्थना म्हणावयाच्या असत. या दैनिक प्रार्थनांखेरीज नैमित्तिक प्रार्थनाहि म्हणण्यांत येत असत. अग्नि विझूं न देतां सतत प्रज्वलित ठेवणें हें प्रत्येक गृहपतीचें काम असे.

धार्मिक आचार

मृत शरीर अशुद्ध समजलें जात असे. मृत मनुष्य असलेल्या घरांतून अग्नि आणि पाणी बाहेर नेत असत. तें घर, व ज्या रस्त्यानें तें प्रेत नेलें जाईल तो रस्ता हीं अशुद्ध समजलीं जात. मनुष्य मेल्यानंतर 'सगदीद' नांवाचा संस्कार असे. मृत मनुष्याच्या शेजारून एका कुत्र्याला नेणें हा तो संस्कार होय. कुत्र्याच्या दृष्टीमध्यें दुष्ट शक्तींचा नाश करण्याचें सामर्थ्य आहे असें समजलें जात असे. हा कुत्रा चार डोळ्यांचा ( दोन्ही डोळ्यांवर दोन काळे ठिपके असलेला ) पिवळ्या रंगाचा किंवा पांढरा असून पिवळ्या कानांचा असा लागत असे. या संस्काराला प्राचीन इतिहास आहे. ऋग्वेदांतील कथेप्रमाणें यमाजवळ दोन कुत्रे आहेत, ते त्याच्या मागोमाग जात असतात. परलोकच्या मार्गाचे ते द्वाररक्षक आहेत. त्या रस्त्यांवरून जाणाऱ्या मृतात्म्यांना हे भीति दाखवीत असतात किंवा यम या कुत्र्यांना दूत म्हणून मृताचे प्राण हरण करण्याकरितां पाठवीत असतो. या कथेचा वरील संस्काराशीं संबंध आहे. कालांतरानें कथा विसरून गेली परंतु तिच्यावरून आलेला संस्कार कायम राहिला. ओसाड प्रदेशांत तयार केलेल्या 'दोख्म' नांवाच्या जागीं प्रेत नेऊन ठेवण्यांत येत असे. प्रारंभीं नुसत्या मोकळ्या टेकडीवर ठेवीत असत; परंतु पुढें विशिष्ट रचनेचें स्थान निर्माण करण्यांत येऊं लागलें.

अंत्यसंस्कार

वर्ष आणि अर्धवर्ष अशा दोन तऱ्हांनीं ते कालगणना करीत असत. वर्षाचे विभाग नेहमींप्रमाणेंच होते. परंतु दिवस न मोजतां रात्री मोजण्यांत येत असत. चांद्रवर्षाचा सौरवर्षाशीं मेळ घालण्याकरितां वर्षअखेरीस पांच दिवस अधिक धरीत असत.

पार्शियाचा संक्षिप्त इतिहास

उपलब्ध माहितीनुसार पार्शियन राज्याचा ' पिश्दानियन ' हा पहिला काल होय. ' गयोमर्द ' हा त्यांतील पहिला राजा होय. अवेस्त्यांत ' फर्वर्दीन यश्त ' मध्यें याचा उल्लेख आहे. याच्यापुढें अकरा राजे होऊन गेले. याहून या कालाची जास्त माहिती मिळत नाहीं. दुसरा ' क्यानियन ' काल होय. या कालांत बल्ख ही राजधानी होती. एकंदर नऊ राजे या कालांत होऊन गेले. त्यांपैकीं राजा ' गुश्तास्प ' आणि त्याचा मुलगा ' अस्पंदिआर ' यांचा उल्लेख अवेस्त्यांत आहे. झोरॅस्टर आणि गुश्तास्प हे समकालीन होत अशी समजूत आहे. तुराणी आणि इराणी यांचीं या कालांत युद्धें चालू होतीं. ' पिश्दानियन ' व ' क्यानियन ' हे दोन्ही राजवंश प्रागैतिहासिक समजले जातात. तिसरा ' हखामनियन ' राजवंश होय. याचा काल इ. पू ५५८ ते इ. पू. ३३० होय. ' पर्सोपोलिस ' ही या राजांची राजधानी होती. या राजवंशापासूनचा पूर्ण इतिहास उपलब्ध आहे. या वंशांतील प्रत्येक राजाला ' सम्राट् ' ही पदवी लावलेली आहे. या कालांत अनेक मुलुख जिंकण्यांत आले. ग्रीस देशहि या काळीं इराणच्या राज्यछत्राखालीं आला. या वंशांत दहा बादशहा होऊन गेले. या कालांतले शिलालेख उपलब्ध आहेत. पार्शियन साम्राज्य या वेळीं उत्कर्षाच्या कळसास पोंचलें होतें. दहावा बादशहा तिसरा दारियस याच्या कालांत साम्राज्याच्या ऱ्हासास सुरुवात झाली. यानंतर राजवंशाचा शेवट होऊन राजधानी जाळली गेली. मूल्यवान् वाङ्मयाचा नाश करण्यांत आला; कांहीं वाङ्मय जेत्यांनीं आपल्या प्रांतांत नेलें. चौथा ' अश्कानियन ' किंवा ' पार्थियन ' काल होय. ( इ. पू. २५० ते इ. स. २२६ ) या काळांत पर्शियन लोकांची वसति इराणांतील कांहीं मर्यादित प्रदेशापुरतीच शिल्लक राहिली. रानटी लोकांनीं त्यांचें राज्य हिरावून नेलें. पांचवा ' ससानियन ' राजवंशाचा काल होय. ( इ. स. २२६ ते इ. स. ६३१ ) या काळांत पर्शियाची पुनर्घटना झाली. ' मदाइन ' ही राजधानी करण्यांत आली. या वंशांत एकंदर अठ्ठावीस राजे होऊन गेले. त्यांपैकीं पहिला राजा ' आर्देसर बाबेगान ' याच्या कारकीर्दींत झरथुष्ट्री धर्माचा पुनः उदय झाला. इ. स. ६५१ नंतर अरब लोकांनीं इराणावर स्वाऱ्या केल्या, त्यामुळें झरथुष्ट्री धर्माची इराणांतून हकालपट्टी झाली. पुष्कळांनीं मुसलमानी धर्म स्वीकारला. इराणी लोक

' खोरासाण ' मध्यें कांहीं वर्षे राहिले व इ. स. ७१५ या वर्षी हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील ' संजाण ' बंदरांत उतरले. हल्लीं त्यांची वसति पुणें, मुंबई, नवसरी, बडोदा या भागांत आहे. एकूण पारशी लोकसंख्या दीडदोन लाखांहून अधिक नाहीं.

पंजाबांतील आर्यांपासून विभक्त झालेल्या इराणी आर्यांना कायमचें सोडून देऊन ऋग्वेदकालांत आर्य हिंदुस्थानांत कोठपर्यंत पसरले होते. याचा आतां विचार करावयाचा आहे.

## आर्यांचा विस्तार

वैदिक आर्य मुख्यतः पंजाबांत स्थाईक झाले. पंजाब हा शब्द पर्शियन आहे. कांहीं लोक काबुलिस्तानच्या भागांत राहिले होते; तथापि बहुतेक लोक सिंधुनद ओलांडून पंजाबांत आले होते. उत्तरेस काश्मीरपर्यंत त्यांची वसति होती. आर्यांच्या स्थलांतराची दिशा आग्नेयीस होती. आर्यलोक ' सप्तसिंधु ' मध्यें आले होते असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. ' सप्तसिंधवः ' हें पद सर्वच ठिकाणीं प्रदेशास लागू नाहीं. कांहीं ठिकाणीं त्याचा ' प्रदेश ' असा अर्थ होतो. या ठिकाणीं आर्यांना कोणत्या सात नद्या अभिप्रेत होत्या यासंबंधीं बरेच मतभेद आहेत. प्रो. मॅक्समुल्लर यांच्या मताप्रमाणें शुतुद्रि ( सतलज-ग्रीक Hesidrus ) विपाशा ( बियास-ग्रीक Hyphasis ) परुष्णी ( रावी किंवा इरावती-ग्रीक Hydraostes ) असिक्नी ( चिनाब-ग्रीक Akesines ) आणि वितस्ता ( झेलमग्रीक Hydaspes ) या पंजाबांतील पांच नद्या, सुवास्तु ( स्वात-ऋ. ८.१९.३७ ) आणि कुभा ( काबूल-ऋ. ५.५३.९, १०.७५.६, ग्रीक Cophen ) मिळून सात नद्या होत. कोणी स्वात आणि कुभा यांच्याऐवजीं सिंधु आणि सरस्वती या समाविष्ट करतात. सुप्रसिद्ध नदीसूक्तांत ( ऋ. १०.७५ ) गंगा, यमुना, सरस्वती इत्यादि एकवीस नद्यांचीं नांवें पूर्वेकडून पश्चिमेकडे या क्रमानें आलीं आहेत. त्यांपैकीं पहिल्या सात म्हणजे गंगा, यमुना ( ऋ. ५.५२.१७, ७.१८.१९ ), सरस्वती, शुतुद्रि ( ऋ. ३.३३.१ ), परुष्णी, मरुद्वृधा आणि आर्जिकीया या ' सप्तसिंधु ' होत, असें कांहीं समजतात.*

ऋग्वेदांतील नद्या

* Dr. S. N. Pradhan—Chronology of Ancient India.

डॉ. हॉपकिन्स यांच्या मतें ‘ सप्त ’ या पदाचा पुष्कळ वेळां अनेक असा अर्थ होतो. त्याप्रमाणें या ठिकाणीं ‘ सप्तसिंधु ’ या पदानें अनेक नद्या असा अर्थ घेतला पाहिजे. सात ही संख्या या ठिकाणीं विवक्षित नाहीं. सातच नद्या जर हुडकावयाच्या झाल्या तर सिंधुनदीच्या पश्चिमेस त्या शोधणें युक्त होईल. इराणच्या बाजूनें पाहिलें असतां हरिरुद, हिल्मंद, अर्घंदाब, कुरुम, काबूल, सिंधु आणि झेलम या ‘ सप्तसिंधु ’ समजणें नैसर्गिक होईल. उलटपक्षीं ‘ सप्तसिंधु ’ हें पद, आर्य बॅक्ट्रियांत असतांना शोधलेलें असणें शक्य आहे. कारण वैकर्त, उर्व इत्यादि प्रदेश सप्तसिंधूहून भिन्न आहेत असें अवेस्ता सांगतो. तात्पर्य, अशा संशयास्पद स्थितींत अनिश्चित रहाणें हाच उत्तम मार्ग आहे. कुरुक्षेत्रांत सात नद्या वहातात, किंवा नऊ नद्या वहातात असें अजूनसुद्धां म्हटलें जातें. ही गोष्ट ध्यानांत घेऊन कनिंगहॅमनीं* म्हटलें आहे कीं, हिंदु लोक सात हा आंकडा सर्व नद्यांना लावतात. ऽ लो. टिळकांच्या मतें ‘सप्तसिंधु’ म्हणजे अंतरिक्षांतील जलप्रवाह होत. अशीं अनेक मतें सप्तसिंधूंच्या बाबतींत प्रचलित आहेत. तथापि सामान्यत: हें नांव पंजाब प्रांताला लावून त्यांतील पांच व सिंधु आणि सरस्वती मिळून सात नद्या या अभिप्रेत आहेत असें समजण्यांत येतें.

अफगाणिस्तान ही प्राचीन आर्यनिवासाची पश्चिमेची मर्यादा होती. गंधार

**आर्य प्रदेशाची चतु:सीमा**

( कंदाहार ) देशाचा उल्लेख ऋ. १.१२६.७ यांत आला आहे. उत्तरेस काश्मीरपर्यंत वसति होती. पूर्वेस शरयू नदीपर्यंत ते गेले होते. कारण शरयूचा उल्लेख ऋग्वेदांत ( ४.३०.१८, ५.५३.९, १०.६४.९ ) आहे. हा उल्लेख अयोध्या प्रांतांतील शरयूचा नव्हे, ती अफगाणिस्थानांतील हरिरुद किंवा अवेस्त्यांतील हरयू नदी आहे असें डॉ. अविनाशचंद्र दास म्हणतात, पण तें बरोबर नाहीं. गंगायमुनांचा उल्लेख आहेच. कीकट—मगध किंवा हल्लींचा बिहार—देशाचा उल्लेख ऋ. ३.५३.१४ या मंत्रांत आहे व त्यांत अनार्यांची वसति आहे असें म्हटलें आहे. तेव्हां पूर्वेस शरयूनदीपर्यंत त्यांची वसति होती व कीकट देशापर्यंत ते पोंचले होते. कीकट ही पंजाबांतील एक पर्वतीय भूमि होय हें

---

* Archaeological Survey of India XIV. ऽ Dr. Hopkins—Religions of India.

डॉ. दासांचें मत चुकीचें आहे. आर्य दक्षिणेकडे फारसे आले नव्हते. चेदि देशाचा उल्लेख ऋग्वेदांत आहे. ( ऋ. ८.५.३७, ३९ ) व हा चेदिदेश संयुक्त प्रांताच्या दक्षिण सरहद्दीवर असावा. सिंधुनदीच्या मुखापर्यंत आर्यांची वसति गेली नव्हती. सिंधी भाषा ही मूळ आर्यांच्या भाषेपासून निघालेली आहे. व्याकरण आणि शब्दकोश या बाबतींत तिचें संस्कृतशीं पुष्कळ साम्य आहे; कालांतरानें पर्शियन आणि मुसलमानी भाषांचा पगडा तिच्यावर बसला. तथापि ती मूळ आर्य आहे. तेव्हां आर्यांची वसति ऋग्वेदकाळीं सिंध प्रांतांत होती असें श्री. कुंटे यांनीं लिहिलें आहे,× तथापि सिंधप्रांत आर्यांनीं मागाहून काबीज केला असावा; कारण ऋग्वेदांत सिंध प्रांतांतील वसतीचा उल्लेख नाहीं. याप्रमाणें ऋग्वेदकालीन आर्यनिवासाची मर्यादा आहे.

आणखी भौगोलिक उल्लेख

याशिवाय आणखी भौगोलिक उल्लेख ऋग्वेदांत पुष्कळ आढळतात. अनितभा ( ऋ. ५.५३.९ ), आपया ( ऋ ३.२३.४ ) क्रुमु ( कुर्रम–ऋ. ५.५३.९, १०.७५.६ ), गोमती ( गोमल ऋ. ८.२४.३०, १०.७५.६ ), त्रिष्टामा ( ऋ. १०.७५.६ ), दृषद्वती ( ऋ. ३.२३.४; हल्लींची घोग्रा (Macdonell) किंवा चौतांग*), मेहत्नू ( ऋ.१०.७५.५), यव्यावती ( ऋ. ६.२७.६ ),रसा ( इराणी रंघा-ऋ. १.११२.१२ इ. ), विवाली ( ऋ. ४.३०.१२ ), श्वेत्या ( ऋ. १०.७५.६ ), सुषोमा ( ऋ. १०.७५.६ ), सुसर्तु ( ऋ. १०.७५.६), शिफा ( ऋ. १.१०४.३ ), या नद्या ऋग्वेदांत उल्लेखलेल्या आढळतात. यांपैकीं फक्त कांहीं थोड्या नद्या आज ओळखतां येतात. हारियूपीया ( ऋ. ६.२७.५ ) हें एका नदीचें नांव आहे व ती कुर्रम नदीला मिळणारी इर्याब किंवा इलियाब नदी असावी असें कांहींचें मत आहे प्रो. लुडविग यांच्या मतें तें एका शहराचें नांव आहे.

सरस्वती नदी कोणती ?

आर्यांची प्रमुख वसति सरस्वती नदीच्या तीरावर होती. सरस्वती नदीचा उल्लेख ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. ही सरस्वती नदी कोणती असावी याबद्दल अनेक मतें आहेत. प्रो. रोथ ऽ व प्रो. झिमेर + यांच्या मतें

---

× M. M. Kunte–Vicissitudes of Aryan Civilization.
* Cambridge History of India Vol. I.
ऽ St. Petersberg Dictionary.
+ Altindisches Leben.

पुष्कळशा उताऱ्यांत सरस्वती म्हणजे सिंधुनद होय. सरस्वतीला 'नदीतमा' (ऋ.२.४१.१६) असें म्हटलें आहे; ती समुद्राला मिळते; तिच्या कांठीं अनेक राज्यें आहेत; पंचजन तिच्याच तीरांवर रहातात (ऋ. ६.६१.१२) इत्यादि वर्णन सिंधुनदीलाच लागू पडतें असें त्यांचें मत आहे. प्रो. हिलेब्रांट ऽ व हॉपकिन्स + यांच्या मतें सरस्वती म्हणजे अफगाणिस्थानांतील अर्घंदाब (जिच्या कांठीं कंदाहार वसलें आहे ती) नदी होय. कारण अवेस्त्यामध्यें 'Harahvaiti' असें तिचें नांव आहे. प्रो. लासेन व मॅक्समुल्लर यांच्या मतें उत्तरकालीन वाङ्मयांत उल्लेख असलेली सरस्वती व ऋग्वेदांतील सरस्वती या एकच होत त्यांच्या मतें सरस्वती नदीचा प्रवाह सतलजप्रमाणें मोठा होता व ती स्वतंत्रपणें किंवा सिंधुनदांत मिसळून अरबी समुद्राला मिळत होती. सतलज आणि यमुना यांच्यामध्यें ती वहात होती. प्रो. मॅक्डोनेल आणि कीथ यांना हें विधान मान्य आहे. सिमल्यापासून साठ मैलांवर तिचा उगम होता व अंबाल्याचे दक्षिण दिशेनें ती वहात होती. * कांहीं उताऱ्यांत सरस्वती नदी हीच अभिप्रेत आहे असें प्रो. रोथनींहि कबूल केलें आहे. पुढील संस्कृत वाङ्मयांत आलेल्या उल्लेखानुसार हल्लीं पतियाळा (विनशन) च्या वाळवंटांत अदृश्य झालेली सरस्वती नदी हीच होय. ही सरस्वती नदी ऋग्वेदकाळीं समुद्रास मिळत असे असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. म्हणून मागें लिहिल्याप्रमाणें राजपुतान्याचे जागीं समुद्र असावा असा डॉ. अविनाशचंद्र दासांचा तर्क आहे. परंतु सरस्वती नदी समुद्राला मिळण्याला राजपुतानाच कांहीं समुद्र असावयास नको होता. 'महाभारतांतील (शल्यपर्व अध्याय ३५ ते ३७) एका कथेवरून राजपुताना-समुद्राची उपपत्ति कशी निराधार आहे हें दिसून येतें. सरस्वती नदीचें शोषण राजपुतान्याच्या समुद्राची जमीन वरतीं आल्यानें झालेलें नसून ऋग्वेदोत्तरकाळांत, मार्गांतील वाळू ढकलून बाजूस सारण्याला नदीचा प्रवाह असमर्थ झाल्यानें झालेलें आहे हेंहि त्यावरून स्पष्ट होतें. वाळवंटांतून वाहाणाऱ्या नद्यांच्या बाबतींत असे प्रकार नेहमीं घडतात. बलराम तीर्थयात्रेला निघाला असतां सरस्वतीच्या

---

ऽ Vedische Mithologie          + Religions of India.

* Macdonell–History of Sanskrit Literature; Keith—Cambridge History of India Vol. I. Part IV.

तीरावरील क्षेत्रें पहात चालला. सरस्वती ज्या ठिकाणीं समुद्राला मिळते त्या प्रभासतीर्थापासून त्यानें प्रवासाला सुरुवात केली. पुढें कांहीं काळ प्रवास केल्यानंतर शूद्र आणि आभिर लोकांच्या तिरस्कारामुळें ज्या ठिकाणीं सरस्वती गुप्त झाली त्या विनशनतीर्थावर तो आला. त्यानंतर जेथें दृषद्वती सरस्वतीला मिळते त्या ठिकाणीं गर्ग ऋषींच्या आश्रमाजवळ तो आला. या वृत्तांतावरून सरस्वती नदी अरबी समुद्रालाच मिळत होती ही गोष्ट स्पष्ट होते. '* तेव्हां ऋग्वेदकालीं सरस्वती नदी सतलज आणि यमुना यांच्यामधून वहात जाऊन अरबी समुद्राला मिळत होती हें मत निर्दोष आणि सर्वमान्य आहे व तेंच या ठिकाणीं स्वीकारण्यांत आलेलें आहे.

पर्वत वगैरे

पर्वतांपैकीं फक्त हिमालयाचा उल्लेख ऋग्वेदांत ( १०.१२१.४ ) आढळतो. मूजवत् नांवाच्या हिमालयाच्या शिखराचाहि उल्लेख आहे ( ऋ. १०.३४.१ ). मूजवत् शिखर आज कोणतें आहे हें सांगतां येत नाहीं; तथापि तें काश्मीरच्या नैर्ऋत्य दिशेस असावें.* शर्यणावत् सरोवराचा उल्लेख ऋग्वेदांत कांहीं ठिकाणीं आला आहे ( ऋ. १.८४.१४ इ. ). मूजवत् आणि शर्यणावत् हीं स्थानें सोमवनस्पतीकरितां प्रसिद्ध होतीं. पस्त्यावत् नांवाच्या सोमस्थानाचाहि उल्लेख ऋग्वेदांत एके ठिकाणीं ( ८.७.२९ ) आहे. हीं दोन्हीं ठिकाणें पतियाळाजवळ असावींत.×

वैदिक आर्यांच्या समुद्रज्ञानाविषयीं पाश्चात्यांचीं मतें

वैदिक आर्यांना समुद्र माहीत होता कीं नाहीं या प्रश्नावर पुष्कळ चर्चा झालेली आहे. त्यांना समुद्राचें ज्ञान नव्हतें असें बऱ्याच पाश्चात्य विद्वानांचें मत आहे. समुद्र हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ वेळां आला आहे; परंतु त्याचा अर्थ जलसंचय असा आहे असें त्यांचें मत आहे. पंजाबांतील नद्या मिळाल्यानंतर सिंधुनदीचें पात्र अतिशय प्रचंड होत होतें; तें इतकें कीं नदीचें परतीर दिसत नसे. त्यामुळें पंजाबच्या खालीं वाहणाऱ्या सिंधुनदीला समुद्र म्हणत असत असें त्यांचें म्हणणें आहे. पूर्व आणि

---

* Amiyakumar Chakravarty—Samudra in Ṛgveda—Indian Historical Quarterly, June 1932.

× Cambridge History of India Vol. I Chap. IV.

पश्चिम या दोन समुद्रांचा किंवा चतु:समुद्रांचा उल्लेख हा त्यांच्या मतें आंतरिक्ष समुद्रास उद्देशून आहे.

प्रो. मॅक्समुल्लर यांच्या मतें त्यांना समुद्र माहीत होता. प्रो. झिमेर यांचें मत असें आहे कीं, सर्वसामान्य जनतेची वसति समुद्रापर्यंत गेली नव्हती. कांहीं धाडसी लोक समुद्रावर जाऊन येत होते. सरस्वती नदी समुद्राला मिळाल्याचा जो उल्लेख आहे त्या फक्त एका उल्लेखांत समुद्र हा शब्द अरबी समुद्राला लागूं आहे, असें प्रो. हॉपकिन्स यांनीं कबूल केलें आहे. समुद्र लोकांना फक्त ऐकून माहीत होता; प्रत्यक्ष ते समुद्रावर गेले नव्हते. कारण समुद्राला मिळणाऱ्या सिंधु नदीच्या अनेक मुखांचा उल्लेख आढळत नाहीं, तसेंच सिंधु नदीच्या तीरावरचा आणि समुद्रावरचा मुख्य धंदा जो मासे धरणें त्याचाहि उल्लेख नाहीं असें प्रो. मॅकडोनेल यांचें म्हणणें आहे. समुद्र मुळींच माहीत नव्हता असें प्रो. कीथ यांस वाटतें.

समुद्र माहीत होता

या एकंदर विधानांपैकीं एवढी गोष्ट खरी कीं, सर्वसामान्य जनतेची वसति समुद्रापर्यंत गेली नव्हती; तथापि लोकांना समुद्राचें ज्ञान होतें. मासे मारण्याच्या धंद्याचा किंवा सिंधूच्या मुखांचा उल्लेख नाहीं हें प्रमाण मान्य करतां येण्यासारखें नाहीं. व्यापार वगैरेंच्या निमित्तानें लोक समुद्रावर जात असत. समुद्रावरील संपत्तीचा उल्लेख केलेला आहे. ( ऋ. १.४७.६, ४८. ३, ५६.२, इ. ). शिवाय समुद्रावर व्यापार करणाऱ्या द्राविडियन लोकांशीं आर्यांचा संबंध असल्यामुळें त्यांना समुद्राचें ज्ञान होणें शक्य होतें. पूर्वसमुद्र म्हणजे बंगालचा उपसागरहि त्यांना माहीत असावा ( ऋ. १०.१३६.५ ). चार समुद्रांचा जो उल्लेख आहे ( ऋ. ९.३३.६, १०.४७.२ ) तो आंतरिक्ष-समुद्रांस उद्देशून असावा.

आतांपर्यंत सांगितल्याप्रमाणें ऋग्वेदकालीं आर्यांनीं उत्तर हिंदुस्थानापैकीं बराच प्रदेश व्यापला होता. यामुळें त्या प्रदेशांतील लतावृक्ष, पशुपक्षी यांचें बरेंच ज्ञान त्यांना झालें असलें पाहिजे. त्यासंबंधीं ऋग्वेदांत खालील उल्लेख सांपडतात:—

लतावृक्ष

अश्वत्थवृक्ष ( पिंपळ—Ficus Religiosa ) माहीत होता. ( ऋ. १०.९७.५ ). व तो पवित्र मानला जात असे. द्राविडियनांमध्यें अश्वत्थपूजा होती असें आपण पाहिलेंच

आहे. त्यांच्यामधून ही वृक्षपूजा आर्यांमध्यें आली असावी. पुढील वाङ्मयांत पवित्र मानला गेलेला व अतिशय छायेचा म्हणून प्रसिद्ध असलेला न्यग्रोधवृक्ष ( वड–Ficus Indica ) ऋग्वेदांत नाहीं. शमी, पलाश ( ऋ. १०.१३५. १ ), शल्मली ( ऋ. ३.५३.२२, ७.५०.३, १०.८५.२० ), किंशुक ( ऋ. १०.८५.२० ), शिंशपा, खदिर ( ऋ. ३.५३.१९ ), आणि शिंबल ( ऋ. ३.५३.२२ ) या वृक्षांचा उल्लेख आहे. गवतांचे प्रकार पुष्कळ आढळतात. ‘ नळा ’ नांवाचें गवत सरोवरांत उगवत असे ( ऋ. ८.१.३३ ). ‘ घासि ’ ( घास ) नांवाचें गवत घोड्यांना खावयास घालीत ( ऋ. १.१६२.१४ ). शर, कुशर, मुञ्जा, सैर्य, दर्भ हेहि गवतांचे प्रकार होते. ( ऋ. १.१९१.३ ). वेताचा उल्लेख फार चमत्कारिक रीतीनें आला आहे. ( ऋ. १०.९५.४, ५ ). व्रतति व ( ऋ. ८.४०.६ ) लिबुजा ( १०. १०.१३ ) हे लतांचे प्रकार आढळतात. कियाम्बु हें एक पाण्यांत उगवणारें रोप होतें. ( ऋ. १.८४.८ ). पावसाळ्यांतील छत्र्या उगवत असत ( ऋ. १ ८४.८ ). दूर्वांचे उल्लेख दोन तीन ठिकाणीं आले आहेत ( ऋ. १०.१६.१३, १३४.५, १४२.८ ). उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयांत कमलपुष्पाला असलेला मान ऋग्वेदापासून चालत आलेला आहे ( पुण्डरीक. ऋ. १०.१४२.८ ). नीलकमलांच्या माला ( पुष्करस्रक् ) गळ्यांत घालीत असत ( ऋ. १०.१८४.२ ). राजांचे व धनिकांचे वाडे पुष्करिणींनीं सुशोभित केलेले असत ( ऋ. १.७८.७, १०.१०७.१० ).

पशु

ग्राम्य पशूंमध्यें गाईला प्राधान्य आहे. तिचा उल्लेख अनेकत्रार आला आहे. तिच्या बहूपयोगित्वामुळें तिला पहिलें स्थान होतें. बैल व घोडा यांचे उल्लेख पुष्कळ आहेत. बकऱ्याचा उल्लेख दोन ठिकाणीं आहे ( अज, छाग–ऋ. १.१६२.३· १०.९०.१० ). देवांनीं लठ्ठ मेंढा शिजविल्याचा उल्लेख आहे ( मेष–ऋ, १०.२७.१७ ). गंधार देशांतील मेंढ्या लोंकरीकरितां प्रसिद्ध आहेत. ( ‘ गंधारीणामिवाविका ’–ऋ. १.१२६.७ ). शिकार करणें व घराचें आणि गुरांचें रक्षण करणें हीं कुत्र्याचीं कामें असत. ( ऋ. २.३९.४, ९.१०१.१, १३ ). यमाचे पौराणिक कुत्रे प्रसिद्ध आहेत. ऋ. १०.१४ यांत वानरांचा ( कपि ) उल्लेख आहे. रेडा हा रानटी आणि माणसाळलेला अशा दोन्ही स्थितींत होता. ऋ. ३.५३.२३ मध्यें गर्दभ आढळतो. गवय ( बैलाची एक

जात ) ऋ. ४.२१.८ या मंत्रांत उल्लेखित आहे. तो रानटी आहे कीं माणसाळलेला आहे तें समजत नाहीं. उंटाचा ( उष्ट्र ) उल्लेख आहे. ( ऋ. १.१३८.२, ८.५.३७, ६.४८ इ. ) परंतु तो शब्द उंट या अर्थी नाहीं असें प्रो. रोथ व आउफ्रेट् यांचें म्हणणें आहे. उष्ट्र या शब्दानें ऋग्वेदांत मोठें वशिंड असलेला बैल किंवा रेडा अभिप्रेत आहे. मध्य आशियांत उंट आहेत. आर्य तेथें असतांना त्यांना ते परिचित होते. हिंदुस्थानांत येतांना त्यांनीं कांहीं उंट आणले, परंतु हवामानांत बदल झाल्याकारणानें ते हिंदुस्थानांत येऊन जिवंत राहू शकले नाहींत. तेव्हां उंटाशीं सदृश असा जो प्राणी त्यांना हिंदुस्थानांत आढळला त्याला त्यांनीं उष्ट्र असें नांव दिलें. हत्तीचीं मृग, मृगहस्तिन्, इभ आणि वारण अशीं नांवें आलीं आहेत. ( ऋ. १.६४.७, ४.४.१, १६.१४ इ. ) हत्तीचा उपयोग बसण्याकरितां आणि युद्धांमध्यें करीत असत असें ऋ. ८.३३.८ या मंत्रावरून दिसतें. हरिण ऋग्वेदांत आहे ( मृग–ऋ. १.३८.५; रुरु–६.७५.१५; ऋश्य–८.४.१० ). ससाहि आढळतो ( शश–ऋ. १०.२८.९ ). उंदीर होते ( मूष–ऋ. १.१०५.८, १०.३३.३ ). मत्स्यांचा उल्लेख दोन ठिकाणीं आहे ( ऋ. ७.१८.६, १०.६८.८ ). वन्यपशूंपैकीं सिंहाचा उल्लेख ऋ. ४.१६.१४, १०.२८.४ या ठिकाणीं आला आहे. तरस होते ( सालावृक–ऋ. १०.९५-१५ ). लांडग्यांचा उल्लेख आहे ( वृक–ऋ. १.११६.१६, ८.५५.१ ). ते मेंढरें ( उरा–ऋ. ८.३४.३ ) व हरिण पकडून खात. कोल्हा आणि खोकड हे प्राणीहि माहीत होते ( लोपाश, क्रोष्टृ–ऋ. १०.२८.४ ). सूकर ( डुकर ) हा शब्द ऋ. ७.५५.४ या मंत्रांत आला आहे.

पक्षी

पक्ष्यांपैकीं मयूर ( ऋ. १.१९१.१४, ३.४५.१, ८.१.२५ ), हंस ( ऋ. १.१६३.१०, ३.८.९, ५३.१०, ७.५९.७ ) पारवा ( कपोत–ऋ. १.३०.४, १०.१६५ ) चक्रवाक ( ऋ. २.३९.३ ), पोपट ( शुक–ऋ. १.५० ), कपिंजल ( शकुनि, शकुंति–ऋ. २.४२,४३ ), गरुड ( सुपर्ण–ऋ. १.१६४.२०, ७.१०४.२२ ), सारिका ( रोपणाका–ऋ. १.५०.१२ ), चिमणी ( वर्तिका–ऋ. १.११२.८, १०.३९.१३ ), ससाणा ( श्येन–ऋ. १.११८.४, ७.१०४.२२, १०.१२७.५ ), गिधाड ( गृध्र–ऋ. १.११८.४ इ. ), कावळा ( कृष्णशकुन–ऋ. १०.१६.६ ), घुबड ( ऋ. ७.१०४.२२, १०.१६५ ) यांचे उल्लेख आहेत.

हारिद्रव हा एक पिंवळा पक्षी होता ( ऋ. १.५०.१२ ). चिच्चिक ( ऋ. १०.१४६.२ ) व आति ( ऋ. १०.९५.९ ) हीं पक्ष्यांचीं नांवें आहेत. चासपक्षी उल्लेखित आहे ( चाष–ऋ. १०.९७.१३ ). कोक या शब्दाचा कोकिळ असा अर्थ घेतला तर ऋग्वेदकाळीं कोकिळ अशुभ समजत असत असें 'कोकयातु' या शब्दावरून दिसून येतें ( ऋ. ७.१०४.२२ ). मुंग्या होत्या ( पिपील–ऋ. १०.१६.६ ). सर्प ( ऋ. १०.१६.६ ), विंचू ( ऋ. १.१९१ ) इत्यादि विषारी प्राणी उल्लेखलेले आहेत.

## दाशराज्ञ युद्ध

*दाशराज्ञ युद्धांतील राजे*

वैदिक आर्य हिंदुस्थानांत आल्यानंतर त्यांच्यामधील ऐतिहासिक महत्त्वाची व ऋग्वेदांत उल्लेखिलेली घडामोड म्हणजे दाशराज्ञ युद्ध होय. याचा उल्लेख तुटकपणें कांहीं सूक्तांतून आलेला आहे. सातव्या–वसिष्ठाच्या–मंडलांतील अठराव्या आणि तेहतिसाव्या सूक्तांत या युद्धाचें वर्णन विशेषेंकरून आलेलें आहे. याशिवाय अन्यत्रहि त्याचा उल्लेख आलेला आहे ( ऋ. ३.३३, ४.१६.१३, ७.२३.७ ). वरील दोन सूक्तांचा सुसंबद्ध अर्थ अद्यापि लागत नाहीं; तथापि त्यांवरून युद्धाविषयींची सामान्य कल्पना करतां येते. पिजवनाचा किंवा दिवोदासाचा पुत्र राजा सुदास याचें दहा राजांशीं युद्ध झालें. या दहा राजांपैकीं पांच आर्य होते व पांच अनार्य होते. अनु, द्रुह्यु, भृगु, तुर्वश आणि मत्स्य हे पांच आर्य होते, आणि पक्थ, भलान, अलिन, शिव आणि विषाणिन् हे पांच अनार्य होते. 'अलिन हे काफिरिस्तानच्या वायव्येकडील होते. पक्थ हे अफगाण ( पक्थून ) लोक असावेत; भलान हे बोलान खिंडीच्या आसपासचे असावेत; आणि शिव हे सिंधुनदीच्या कांठचे लोक असावेत.'* विषाणिन् हे डोक्यावर शिंगें बांधीत असावेत.×

*युद्धाचें वर्णन*

हें युद्ध परुष्णी नदीच्या कांठीं झालें. तृत्सु भरत हे सुदासाचे अनुयायी होते. प्रथम विश्वामित्र हा पैजवन सुदासाचा पुरोहित होता; परंतु ती जागा पुढें वसिष्ठानें घेतली.

---

* Cambridge History of India. Vol. I. Chap. IV.

× C. V. Vaidya–History of Sanskrit Literature p. 109.

वसिष्ठानें केलेल्या स्तुतीमुळें सुदासाला इंद्राचें साहाय्य मिळालें. सुदास परुष्णीनदी तरून गेला. तुर्वशानीं त्याचा पाठलाग करण्याचा प्रयत्न केला, परंतु ते नदींत बुडाले. या युद्धांत सहा हजार द्रुह्यु आणि सहाशें अनु रणांगणावर मरून पडले. दाशराज्ञ युद्धाचें (ऋ. ७. ३३. ३, ५ यांमध्यें या युद्धाला दाशराज्ञ युद्ध म्हटलें आहे) असें त्रोटक वर्णन सूक्तांमधून आढळतें. प्रो. मॅकडोनेल यांच्या मतें भरत हे सुदासाचे शत्रु होते. परंतु हें म्हणणें चुकीचें आहे. ते जर सुदासाचे शत्रु असते तर विश्वामित्रानें आपल्या सूक्तानें भरताच्या रक्षणाची अपेक्षा केली नसती ('विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेदं भारतं जनम्'–ऋ. ३. ३३. १२). श्री. चिं. वि. वैद्यांच्या मतें हें युद्ध सूर्यवंशी आणि चंद्रवंशी क्षत्रियांत झालें. सुदास हा सूर्यवंशी होता व विरुद्ध पक्षाचे आर्यराजे चंद्रवंशीय होते; परंतु हे दोन भेद ऋग्वेदकालीं असल्याचें सिद्ध होत नसल्यामुळें, चंद्रवंशीयांनीं प्रदेश काबीज करण्याकरितां हें युद्ध केलें असें म्हणतां येत नाहीं. विश्वामित्राचें सुदासाकडील पौरोहित्य गेल्यामुळें त्यानें इतर राजांना सुदासाविरुद्ध युद्धास प्रवृत्त केलें असा दाशराज्ञ युद्धाचा हेतु सांगण्यांत येतो ऽ.

दुसरें एक मत असें आहे कीं, भरतकुलांतील राजांविरुद्ध इतर राजांचा द्रोह होता. सुदासानें अश्वमेधयाग सुरू केला तेव्हां त्याला विरोध करण्याकरितां अनुतुर्वशादि राजांनीं युद्ध सुरू केलें.* तात्पर्य, दाशराज्ञ युद्ध कशाकरितां झालें हें निश्चितपणें समजूं शकत नाहीं.

---

ऽ Cambridge History of India Vol. I.

* बॅ. जयशंकर प्रसाद, 'गंगा' वेदांक १९३१.

# विभाग चौथा

# ऋग्वेदकालीन धर्म

## बहिरंगसमीक्षण

या विभागांत ऋग्वेदकालीन आर्यांच्या धर्माचा विचार प्रामुख्यानें करावयाचा आहे. परंतु तो करण्यापूर्वी ऋग्वेदाचें बहिरंगसमीक्षण प्रथम करणें युक्त होईल.

वैदिक आर्य व तत्कालीन इतर लोक

" वैदिक आर्य हें तत्त्वज्ञांचें राष्ट्र होतें. विचारांचें युद्ध हेंच त्यांचें युद्ध होतें. सृष्टीच्या उत्पत्तीविषयींचा विचार हा त्यांचा भूतकाळ होता. मानवी अस्तित्वाचा प्रश्न हा त्यांचा भविष्यकाळ होता. त्यांच्या विचारांना वर्तमानकाळ महत्त्वाचा वाटला नाहीं. म्हणून ज्यू, बॅबिलोनियन, ग्रीक, पर्शियन, रोमन, टयूटन, ईजिप्शिअन वगैरे लोकांप्रमाणें त्यांना राजकीय इतिहासांत महत्त्वाचें स्थान नाहीं, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. त्यांच्या राजकीय हालचाली इतर राष्ट्रांच्या डोळ्यांत भरण्याइतक्या मोठ्या नव्हत्या. परंतु मानवजातीच्या बौद्धिक इतिहासांत वैदिक आर्यांना महत्त्वाचें स्थान आहे. सर्व इंडो–युरोपियन राष्ट्रांत प्रचलित असलेल्या निसर्गपूजेचें केवळ मूर्तिपूजेंत रूपांतर झाल्यानंतर फक्त वैदिक आर्यांनींच आपल्या धर्माला अंतर्दर्शी स्वरूप दिलें. "*

वैदिक आर्य आणि तत्कालीन इतर प्राचीन लोक यांच्यामधील भेद हा अशा प्रकारचा आहे.

ऋग्वेदाच्या ग्रथनाचा हेतु

ऋग्वेदांतील सूक्तें ग्रथित करणारांचा काय हेतु होता ? प्रो. कीथ यांच्य मतें पुरोहितांमध्यें प्रचलित असलेलें धार्मिक क्रियासंबंधीं वाङ्मय संगृहीत करून ठेवण्याचा त्यांचा हेतु होता.ऽ परंतु या विधानानें ऋग्वेदाचें स्वरूप

---

* Max Muller–History of Ancient Sanskrit Literature

ऽ Cambridge History of India.

अभ्यास होतें. ऋग्वेदांत कांहीं सूक्तें अशीं आहेत कीं, ज्यांचा धार्मिक दृष्ट्या उपयोग केलेला नाहीं आणि होऊंही शकत नाहीं. त्यामुळें प्रो. कीथ यांनीं दर्शविलेला हेतु संपूर्ण होऊं शकत नाहीं. " ग्रंथ बांधणाऱ्या ऋषींना हा संग्रह धार्मिक आणि वाङ्मयीन अशा दोन्ही दृष्टींनीं करावयाचा होता. म्हणून छंद, भाषा, नीतिशास्त्र, संस्कृतिनिदर्शन इत्यादि गुणांमुळें जीं कांहीं सूक्तें त्यांना महत्त्वाचीं वाटत होतीं त्यांचाहि समावेश या संग्रहांत करण्यास ऋषींनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. कारण अशा सूक्तांचा समावेश, पाठ करण्याकरितां म्हणून केलेल्या मंडळांत करणें हा एकच त्यांच्या संरक्षणाचा मार्ग होता " ÷

ऋषींची आपल्या रचनेबद्दलची कल्पना

मंत्रद्रष्ट्या किंवा मंत्रकर्त्या ऋषींची स्वतः रचलेल्या सूक्तांसंबंधीं काय कल्पना होती ? " सामान्यतः पाहूं गेलें असतां ऋषींना आपलीं कवनें परमेश्वरी प्रेरणेनें उत्पन्न झालीं आहेत असें वाटत नव्हतें, कारण तीं आपल्या मनांतून उत्पन्न झालीं आहेत असा उल्लेख ते वारंवार करतात. विशेषतः जुन्या सूक्तकारांची अशी कल्पना होती. परंतु कांहीं सूक्तांवरून असें दिसून येते कीं, ते आपल्या काव्यांचें फार महत्त्व मानीत होते. कारण तीं काव्यें देवतांना स्वीकरणीय वाटतात; त्या काव्यांनीं देवांचें सामर्थ्य वाढतें आणि त्यामुळें ते आपलें कल्याण करतात अशी त्यांची समजूत होती. कांहीं सूक्तांमध्यें ऋषींना अतिमानवदृष्टि असते आणि त्यांच्या काव्यांत गूढ सत्त्व वास करीत असतें असें म्हटलें आहे. " *

देवताविषयक कल्पना

" ऋग्वेदांत एक हजारांहून जास्त सूक्तें आहेत, आणि कवींच्या कित्येक पिढ्यांनीं अनेक शतकांच्या कालावधींत तीं रचलेलीं आहेत. या सूक्तांमध्यें केवळ पूर्वजांपासून परंपरेनें आलेले निसर्गासंबंधींचे विचार त्यांनीं प्रकट केले नाहींत, तर स्वतः त्यांना ज्या नवीन कल्पना प्रादुर्भूत झाल्या त्याहि त्यांनीं वाचेमध्यें निर्मित केल्या. त्या प्राचीन काळांत मनुष्यांचीं मनें किंवा त्यांच्या कल्पनाशक्ति बाह्य

÷ Winternitz--History of Indian Literature. Vol. I. p. 119.

* Dr. J. Muir-Original Sanskrit Texts Vol. I.

संस्कारांचें प्रतिबिंब उमटण्याच्या दृष्टीनें पूर्णपणें मोकळ्या होत्या आणि विशेषतः आकर्षक चमत्कृतींचें माहेरघर असलेल्या हिंदुस्थान देशांत प्रेक्षकांचीं मनें अशा संस्कारांनीं अगदीं भारून जात असत; त्यामुळें कवींची काव्यशक्ति कळसास पोंचत असे. नभोपटलावर पसरलेल्या असंख्य तारका, सृष्टीवर उत्साहाचा अभिषेक करणारी उषा, अमर्याद आकाशपथाचें मापन करणारा प्रातःकालचा सूर्य, चित्रविचित्र भव्य आणि हवेंत इकडून तिकडे हेलकावे खाणारे मेघ, निर्मल आणि अगाध जल, पर्जन्य, वादळ, मेघगर्जना आणि विद्युत्प्रकाश यांच्यामध्यें त्यांना प्रीत किंवा क्रुद्ध अशा तत्सम नानाविध दिव्यशक्तींचें अस्तित्व किंवा प्रतिनिधित्व भासमान होई. एखाद्या उत्कट चमत्कारानें भारलेल्या मनःस्थितींत एखादा कवि जीं काव्यें करील त्या काव्यांत, ज्या देवतेमुळें त्या चमत्कारांची उत्पत्ति झालीसें त्याला वाटेल, त्या देवतेला विशेष आणि स्वतंत्र महत्त्व तो देईल व तिचें भावनापूर्ण वर्णन करील. दुसरे कवि त्याच निसर्गचमत्काराचें प्रतिनिधित्व त्यांना महत्त्वाच्या वाटणाऱ्या देवतांस देतील. त्याच चमत्काराची आणखी एक देवता कल्पून कोणी निराळे कवि तिचें वर्णन करण्यांत गुंग होतील. अशा रीतीनें परंपरेनें आलेल्या देवता जरी सर्वांनीं मानलया किंवा वर्णिल्या तरी प्रत्येक देवतेची शक्ति, तिचें महत्त्व आणि कार्य यांच्याविषयीं अनेक कवींच्या अनेक कल्पना होतील; किंवा निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळीं प्रतिबिंबें अंतःकरणावर उमटल्यामुळें एकच कवि एकाच देवतेच्या शक्तीविषयीं आणि तिच्या कार्याविषयीं भिन्न कल्पना करून भिन्न वर्णनें करील. कदाचित् असेंहि होईल कीं, पूर्वीं अंधुक कल्पना किंवा गौण महत्त्व असलेल्या देवतेला एखाद्या कवीच्या उत्कट भक्तीमुळें आणि बुद्धिमत्तेमुळें जास्त महत्त्व येईल. अशा परिस्थितींत एखाद्या देवतेला एके ठिकाणीं उच्च स्थान आहे व दुसऱ्या ठिकाणीं गौण स्थान आहे; एके ठिकाणीं ती विश्वोत्पत्तिकर्त्री आहे, तर दुसऱ्या ठिकाणीं ती दुसऱ्यामुळें उत्पन्न झालेली आहे असें आपणांस आढळून आल्यास त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. द्यौः आणि पृथिवी या देवतांच्या बाबतींत असा प्रकार विशेषेंकरून आलेला आहे. ''*

या उताऱ्याच्या प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें ऋग्वेदांतील सूक्तांची रचना

---

* Dr. J. Muir–Vol. V.

धार्मिक विचारांचा प्रवाह

अनेक पिढ्या व अनेक शतकें चालू असली पाहिजे. वैदिक आर्यांचे धार्मिक विचार मंत्रामध्यें प्रगट होण्यापूर्वी ते विचार बनण्याकरितां आणि रूढ होण्याकरितां मंत्ररचनेपूर्वी कितीतरी काळ लोटला असला पाहिजे. प्रत्यक्ष ऋग्वेदामध्यें पूर्वीचे ऋषि आणि आधुनिक ऋषि ( ऋ. १.१.२ इ. ) असा भेद केलेला अनेक ठिकाणीं आढळतो. इंडो–इराणी काळांत कांहीं सूक्तें रचलीं गेलीं असलीं पाहिजेत; परंतु कालप्रवाहांत तीं नष्ट झालीं. एकंदरींत आर्यांच्या धार्मिक विचारांच्या प्रवाहाचा उद्गम आणि विकास अनेक शतकें-पर्यंत चालू असला पाहिजे.

ऋग्वेदाचें स्वरूप

ऋग्वेदांतील सूक्तांच्या रचनेचा कालक्रम कसा आहे हें निश्चितपणें सांगतां येणें शक्य नाहीं. ऋग्वेदाचें ग्रथन कालक्रम किंवा विषयविभाग यांपैकीं कोणत्याच दृष्टीनें झालेलें नाहीं. डॉ. हॉपकिन्स यांच्या मतें वरुण आणि उषस् या देवतांचीं सूक्तें पंजाबांत रचलीं गेलीं व बाकीचीं सरस्वतीच्या तीरावर रचण्यांत आलीं. ऋग्वेदांतील वर्णनें आणि प्रचलित भौगोलिक स्थिति यांचें साम्य हें त्यांनीं आपल्या विधानास प्रमाण धरलें आहे; परंतु तें दृढ नाहीं. इंद्र, उषस् , वरुण, मित्र, द्यौ इत्यादि देवता मूळ उत्तरध्रुवाच्या प्रदेशांतील आहेत. ( देवतावर्णनप्रसंगीं याचें विवेचन होईलच ) त्या देवतांच्या प्रकल्पनावर ऋषींनीं पंजाब व सरहद्दप्रांत यांत आल्यानंतर सूक्तें रचिलीं. तेव्हां अमुक ठिकाणच्या निसर्गामुळें अमुक देवतेची कल्पना उत्पन्न झाली व त्या देवतेचीं सूक्तें त्या ठिकाणीं रचण्यांत आलीं असा निर्बंध घालतां येणार नाहीं. ऋग्वेदाच्या दहा मंडलांपैकीं दोन ते आठ हीं मंडलें अनुक्रमें गृत्स-मद, विश्वामित्र, वामदेव–गौतम, अत्रि, भरद्वाज, वसिष्ठ आणि कण्व या ऋषींचीं आहेत. या ऋषींना ‘ माध्यमाः ’ असें म्हटलें आहे. या मंडलांतील सूक्तें इतर मंडलांच्या सूक्तांहून प्राचीन आहेत. आठव्या मंडलाचे शेवटीं ‘ वालखिल्य ’ नांवाचें परिशिष्ट आहे. हें एकच परिशिष्ट ‘ सर्वानुक्रमणी’मध्यें संहितेंत समाविष्ट केलेलें आहे. इतर सर्व शेवटीं दिलेलीं आहेत. वालखिल्य-सूक्तें अकरा आहेत. त्यांत इतर परिशिष्टांप्रमाणें पाठभेद मुळींच नाहींत व त्यांना पदपाठ, स्वर वगैरे व्यवस्थित आहेत. पहिलें मंडळ अनेक ऋषींच्या सूक्तांचें मिळून झालेलें आहे. पहिल्या दहा सूक्तांतील एकशें दोन ऋचा

मधुच्छंद ऋषीच्या आहेत, म्हणून पहिलें मंडळ हें ' शतर्चिन् ' नामक ऋषीचें आहे असें म्हणण्यांत येतें. नववें मंडळ सोमासंबंधीं आहे. अर्थात् त्याचे ऋषिहि अनेक आहेत. दहाव्या मंडलाचेहि द्रष्टे अनेक ऋषि आहेत. या तीन मंडलांतील बरींच सूक्तें इतर मंडलांतील सूक्तांच्या मानानें अर्वाचीन आहेत. अर्थात् त्यांतहि कांहीं सूक्तें प्राचीन आहेत. नवव्या मंडळांतील पुष्कळशीं सूक्तें सोमयागामध्यें विनियोग करण्यासाठीं रचलेलीं दिसतात. तेव्हां तीं सापेक्षतया अर्वाचीन आहेत. दहा मंडलांचें ग्रथन झाल्यानंतर जीं सूक्तें राहिलीं तीं खिलसूक्तें म्हणून ऋग्वेदांत शेवटीं जोडण्यांत आलीं. अर्थात् तीं अर्वाचीन आहेत. शाकल्यानें त्यांचा पदपाठ दिलेला नाहीं. तसेंच ऋ. ७.५९.१२, १०.२०.१, १२१.१०, १९०.१, २, ३ या सहा मंत्रांनाहि त्यानें पदपाठ दिलेला नाहीं. त्याला हे मंत्र प्रक्षिप्त वाटले असावेत. पदपाठ असलेले मंत्र व खिलें यांच्या मधल्या काळांत ते मंत्र रचले गेले असावेत. खिलसूक्तांची रचना ब्राह्मणग्रंथांच्या रचनेपूर्वीं झाली हें निःसंशय आहे.

दहाव्या मंडलाविषयीं प्रो. मॅक्डोनेल यांचें मत

नऊ मंडलें तयार केल्यानंतर दहाव्या मंडलांतील सूक्तांची रचना झाली म्हणून तीं सर्व सूक्तें अर्वाचीन आहेत असें प्रो. मॅक्डोनेल म्हणतात. याकरितां त्यांनीं पुढील पुरावा दाखल केला आहेः—नवव्या सोममंडलाच्या पुढें त्याला स्थान मिळालें आहे. पहिल्या मंडलाच्या सूक्तसंख्येइतकी दहाव्या मंडलाची सूक्तसंख्या ( १९१ ) ठेवण्यांत आली आहे. दहाव्या मंडलांतील वीस ते सव्वीस या सूक्तांचा ऋषि आपल्या सूक्तांची सुरुवात ' अग्निमीळे ' या प्रथम मंडलाच्या आदिपदानें करतो. पूर्वींच्या देवांचें महत्त्व जाऊन त्या जागीं नवीन देवता प्रस्थापित झाल्या आहेत. उषादेवतेचें एकहि सूक्त त्यांत नाहीं. इंद्र आणि अग्नि या देवता त्यांत कसेंबसें आपलें अस्तित्व राखून आहेत. विश्वेदेवांना जास्त महत्त्व आलें आहे. श्रद्धा, मन्यु वगैरे भाववाचक देवता नवीन निर्माण करण्यांत आल्या आहेत. सृष्ट्युत्पत्ति, तत्त्वज्ञान, विवाह, अंत्यविधि, मंत्रतंत्र हे विषय या मंडलांत प्रथमच आले आहेत. भाषेच्या दृष्टीनेंहि दहावें मंडल अर्वाचीन ठरतें. ' सीम् ' इत्यादि जुन्या शब्दांचा अभाव, र च्या जागीं ल, लाभ, लक्ष्मी, काल, एवम् इत्यादि पुढील संस्कृतांतील शब्दांचें अस्तित्व, ' आसः ' या प्रथमेच्या बहुवचनी प्रत्ययाचा पुष्कळसा अभाव इत्यादि गोष्टी त्यांतील भाषेचें अर्वाचीनत्व दर्शवितात.

तथापि पहिल्या नऊ मंडलांचें ग्रथन झाल्यानंतर दहाव्या मंडलांतील सर्वच सूक्तांची रचना झाली, असें या प्रमाणांवरून समजण्याची आवश्यकता उत्पन्न होत नाहीं. तत्त्वज्ञानात्मक सूक्तें अर्वाचीनच आहेत असें म्हणतां येत नाहीं. मंत्रतंत्रांचींहि कांहीं सूक्तें प्राचीन आहेत असें अनुमान इंडो-युरोपियन राष्ट्रांतील मंत्रतंत्रांच्या तुलनेवरून काढण्यांत आलें आहे व तें बरोबर आहे. इतर प्रमाणें त्या त्या सूक्तांना सामान्यतः लागू करतां येतील. पहिल्या नऊ मंडलांतील सूक्तांहून भिन्न स्वरूपाच्या सूक्तांचा समावेश, तीं प्राचीन असूनहि कदाचित् सहजासहजीं दहाव्या मंडलांत झाला असेल. दुसरें असें कीं वाङ्मयाच्या दृष्टीनेंहि ऋग्वेदाचा संग्रह करण्याचा ऋषींचा हेतु होता; तदनुसार प्राचीनच परंतु धार्मिक दृष्ट्या गौण व वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचीं सूक्तें दहाव्या मंडलांत समाविष्ट झालीं असणें शक्य आहे. संवाद-सूक्तें, नासदीय सूक्त इत्यादींचा समावेश या वर्गांत होईल. दहाव्या मंडलांतील यांशिवाय बाकीचीं सर्वच सूक्तें अर्वाचीन नव्हेत. नऊ मंडलांचें ग्रथन झाल्यानंतर ज्या अर्थी त्यांना दहावें मंडल बांधण्याची आवश्यकता भासली त्याअर्थी पूर्वीचीं कांहीं सूक्तें त्यानंतर शिल्लक राहिलीं असलीं पाहिजेत. तेव्हां दहावें मंडळ पूर्ण करण्याकरितां, शिल्लक राहिलेलीं सर्व सूक्तें घेऊन शिवाय कांहीं नवीन सूक्तांचा अंतर्भाव त्यांत करण्यांत आला. तसेंच दोन ते आठ या सात मंडलांतील सर्वच सूक्तें प्राचीन आहेत असें नव्हे; त्यांतीलहि कांहीं सूक्तें अर्वाचीन आहेत.

त्यांतील सत्यांश

ऋग्वेदकालांतील आर्य ज्या मंत्रांचा धार्मिक विधींमध्यें उपयोग करीत असत त्यांपैकीं कांहीं मंत्रांचा अर्थ त्यांनासुद्धां पूर्णपणें उलगडलेला नव्हता असें क्वचित् आढळून येतें. खुद्द वैदिक वाङ्मयांत ऋग्वेदांतील कांहीं मंत्रांचा चुकीचा अर्थ केलेला दृष्टीस पडतो. " वेदांचा अर्थ लावण्याकरितां कठिण शब्दांचा अर्थ सांगणारे निघंटु सूत्रकालांत तयार केले गेले. यास्काचार्यांनीं निरुक्तामध्यें निघंटूच्या आधारावर कांहीं मंत्रांचें स्पष्टीकरण केलें आहे. यास्काचार्यांचा काल पाणिनिपूर्व होय. त्यांनीं आपल्या पूर्वींच्या परस्परविरुद्ध मतनिदर्शक अशा सतरा लेखकांचीं नांवें दिलीं आहेत. म्हणजे यास्ककालापर्यंत सुद्धां मंत्रांचा आणि त्यांतील शब्दांचा अर्थ अस्खालित परंपरेनें आलेला

वेदांचा अर्थ लावण्याच्या पद्धति

व्हता. इसवी सनाच्या चौदाव्या शतकांतील सायणाचार्यांचें संपूर्ण ऋग्वेद-ाष्य मात्र आज उपलब्ध आहे. ऋग्वेदाचा अर्थ लावण्याच्या बाबतींत ारंभींच्या कांहीं युरोपियन लेखकांनीं सायणाचार्यांच्या भाष्याचा पूर्णपणें मवलंब केला. यांत प्रो. विल्सन हे प्रमुख असून त्यांनीं सायणभाष्यास मनुसरून ऋग्वेदाचें संपूर्ण इंग्रजी भाषांतर केलें आहे. त्यांचें मत असें कीं, ायणाचार्यांची अर्थ लावण्याची पद्धति विश्वसनीय परंपरेनें आलेली आहे. याच्या उलट कांहीं वेदसंशोधकांनीं सायणभाष्यादिकांचा मुळींच उपयोग केला नाहीं. त्यांच्या मतानें ऋग्वेदकालानंतर हजारों वर्षांनीं झालेला भाष्यकार ऋग्वेदाचा बरोबर अर्थ सांगूं शकणार नाहीं. त्याच्यापेक्षां भाषाशास्त्रविषयक अर्वाचीन साधनांनीं परिपूर्ण असे आम्ही युरोपियन लोकच त्याचा अर्थ जास्त बरोबर लावूं शकूं. या पक्षाच्या पुरस्कर्त्यांत प्रो. रुडोल्फ रोथ हे प्रमुख होत. त्यांचे शिष्य प्रो. ग्रासमान् हे अर्थात् त्यांचेच अनुयायी आहेत. त्यांनीं दोन भागांत ऋग्वेदाचें संपूर्ण छंदोबद्ध जर्मन भाषांतर केलें आहे. आजचे बहुतेक संशोधक या दोन पराकाष्ठांच्या मधला मार्ग अवलंबितात. सायणादिकांचें अंधानुकरण करूं नये, परंतु त्यांची परंपरा कांहीं अंशीं तरी अस्खलित असल्यामुळें त्यांच्याकडे दुर्लक्ष करतां कामा नये. कारण हिंदी वातावरणाशीं त्यांचा परिचय पाश्चात्यांपेक्षां अधिक असल्यामुळें पुष्कळ वेळां ते बरोबर अर्थ सांगूं शकतात असें त्यांचें मत आहे. प्रो. आल्फ्रेड लुडविग् हे या पंथांतील आहेत. त्यांनीं सायणभाष्याचा आणि अर्वाचीन साधनांचा संमिश्र उपयोग करून ऋग्वेदाचें संपूर्ण जर्मन भाषांतर केलें आहे. त्यांच्या-मागून पिशेल् आणि गेल्डनेर यांनीं 'वेदविषयक अभ्यास' ( Vedische Studien ) तीन भागांत लिहून ऋग्वेदांतील अनेक क्लिष्ट सूक्तांचा अर्थ लावण्यास बरीच मदत केली."

सूक्तें म्हणजे काव्य, कीं यज्ञाकरितां तयार केलेले मंत्र ?

"वेदांचा अर्थ लावण्याच्या बाबतींत दुसरा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. ऋग्वेदांतील सूक्तें म्हणजे देवतांवरील श्रद्धेमुळें दिव्यस्फूर्ति मिळालेल्या कवींच्या अंतःकरणांचीं उत्कट आणि प्रकट स्वरूपें आहेत, कीं यज्ञक्रियां-मध्यें विनियोग करण्यासाठीं पुरोहितांनीं तीं रचलेलीं होतीं ? प्रो. ॲडोल्फ केगी हे पहिल्या मताचे प्रतिनिधि आहेत. ते म्हणतात. 'बरींचशीं सूक्तें देवतांच्या आवाहनपर आणि स्तुतिपर आहेत.

या सूक्तांत चोहोंकडे अंतःकरणांतील भक्तीचा उद्रेक दृष्टीस पडतो. हीं सूक्तें म्हणजे शुद्ध भावानें दिलेले हविर्भाग प्रेमानें स्वीकारण्याविषयीं देवतांची केलेली प्रार्थना होय. भावनामय अंतःकरणांत एखाद्या देवतेनें उत्पन्न केलेल्या प्रेरणेला व्यक्त स्वरूप देण्याची कवीची इच्छा दिसून येते. या संग्रहांतील कांहीं सूक्तें सामान्य दर्जाचीं आहेत हें खरें, तथापि बाल्यावस्थेतील समाजाच्या उत्साही काव्यकल्पनांचे निःश्वास त्या सर्वांत दिसून येतात. आध्यात्मिक प्रगतीच्या पहिल्या पायरीवरील लोकांचें काव्य, त्यांचे धार्मिक आणि नैतिक आचारविचार यांच्या वातावरणांत प्रवेश करणाऱ्याला निरनिराळीं सूक्तें निरनिराळ्या कारणांस्तव आकर्षक वाटतील. एके ठिकाणीं बालकाचा साधेपणा, दुसरीकडे भावनेचा नाजूकपणा, तिसऱ्या ठिकाणीं रूपकाचा उठावदारपणा व कल्पनेची भरारी हे गुण त्याला आकर्षून घेतील.ऽ याच्या उलट दुसऱ्या मताचे पुरस्कर्ते प्रो. ओल्डेनबर्ग हे होत. त्यांना या प्राचीन वाङ्मयांत बौद्धिक निर्बलतेचीं स्पष्ट चिन्हें दृग्गोचर होतात. त्यांच्या मतें 'देऊळ नसलेल्या यज्ञस्थानाभोंवतीं गवत (दर्भ) आंथरून त्याच्या मध्यभागीं अग्नि ठेवून व त्यांत आहुति टाकून त्या स्वीकारण्याकरितां देवतांना बोलाविणारे पुरोहित रानटी (Barbarian) असले पाहिजेत; आणि त्यांनीं बोलाविल्याबरोबर पिठाचे गोळे, मांस आणि मादक सोम यांचें सेवन करण्याकारितां घोड्यावर किंवा रथांत बसून अंतरिक्षांतून येणारे देवहि रानटीच असले पाहिजेत. सूक्तकारांचा हेतु देवतेविषयीं कांहीं सांगण्याचा नसतो. तर ते आपल्या पदरच्या मोठमोठ्या काल्पनिक विशेषणांची त्या देवतेवर खैरात करतात. अशा प्रकारचें काव्य यज्ञक्रियानिपुण पुरोहितांचेखेरीज इतरांचे हातून निर्माण होणार नाहीं '*

"हीं दोन्ही मतें अतिशयोक्त दिसतात. वेदाचा अर्थ लावण्याच्या बाबतींत दोहोंच्या मधील मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे. ऋग्वेदांतील कांहीं सूक्तें प्राचीन व कांहीं त्या मानानें अर्वाचीन आहेत. त्याचप्रमाणें सूक्तांतील मजकूरहि निरनिराळ्या कवींचा आणि कमजास्त सरस आहे. पुष्कळशीं सूक्तें प्राचीन धार्मिक काव्य म्हणून आणि यज्ञयागांत विनियोग करण्याचा हेतु नसतांना निर्माण झालीं

दोन्हीही

ऽ The Rgveda. * Religion des Veda.

आहेत हें निःसंशय! यांतील कांहीं सूक्तांचा जरी पुढील काळांत यज्ञयागांत विनियोग केला गेला असला तरी तीं मूळ त्या हेतूनें लिहिलीं गेलीं नव्हतीं त्याचबरोबर हेंहि खरें आहे कीं, ऋग्वेदसंहितेपैकीं बराचसा भाग यज्ञयागांत उपयोजिण्याच्याच हेतूनें पुरोहितवर्गानें रचला आहे."*

ऋग्वेदाचें छंदःशास्त्र केवळ अक्षरें मोजण्याच्या पुढें गेलेलें आहे. झेंद अवेस्त्यांत आठ आणि अकरा या अक्षरसंख्येवरूनच फक्त छंद बनलेले आहेत. ऋग्वेदांत याच्यापेक्षां थोडी प्रगति आढळते. छंदांतील प्रत्येक अक्षराच्या मात्रा ठरविण्याच्या दृष्टीनें छंदःशास्त्र हें पुढील संस्कृताच्या काळांत प्रगत झालें. तथापि ऋग्वेदांत छंदांतील कांहीं अक्षरांच्या मात्रा ठरविण्यांत आलेल्या आहेत.

छंदःशास्त्र

अनेककर्तृत्वामुळें ऋग्वेदांतील सूक्तें काव्यदृष्टया साहजिकच विषम गुणाचीं आहेत. इंद्राच्या सूक्तांमध्यें वीररस उत्कटत्वानें असलेला दिसतो. अग्निसूक्तांत साध्या भाषेंत गृहविषयक भावनेचें चित्रण सुरेख रीतीनें केलेलें आढळतें. वरुण आणि रुद्र या देवतांना उद्देशून केलेल्या सूक्तांत करुणरसाच्या छटा सुंदर रीतीनें दृष्टोत्पत्तीस येतात. निसर्गाचें सौंदर्यवर्णन आणि प्रवाही भाषा हे गुण सूर्य, पर्जन्य, मरुत्, वात आणि विशेषतः उषा या देवतांना उद्देशून लिहिलेल्या सूक्तांत विशेष रीतीनें स्पष्ट होतात. उषादेवतेच्या सूक्तांमध्यें उदयाचलावर आरूढ होणाऱ्या उषेच्या सौंदर्याचें वर्णन करण्यांत कर्त्यांची अहमहमिका लागलेली दिसते. अश्विनौच्या सूक्तांमध्यें वर्णनसामर्थ्य दिसून येतें.

सूक्तांचे काव्यगुण

विधिसंस्काराकरितां रचलेल्या सूक्तांतसुद्धां काव्यसौंदर्य असूं शकतें हें दहाव्या मंडलांतील विवाहविधीच्या आणि त्याचप्रमाणें अंत्यविधीच्या सूक्तांवरून दिसून येतें. गूढकाव्याचा नमुना म्हणून नासदीय सूक्ताकडे बोट दाखवितां येईल.

ऋग्वेदांतील काव्याची साधारण कल्पना येण्याकरितां कांहीं प्रमुख देवतांच्या निवडक सूक्तांचें भाषांतर खालीं देण्यांत येत आहे—

ऋ. २.१२ हें सूक्त इंद्रसूक्तांचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून म्हणतां येईल.—

---

* Winternitz—History of Indian Literature Vol. I. pp. 72-4.

( १ ) जन्मतांच ज्या बलिष्ठानें देवांचें अग्रस्थान मिळविलें, ज्यानें ज्ञानांत इतर सर्व देवतांना मागें टाकलें, ज्याच्या सामर्थ्यापुढें आणि तेजापुढें द्यावा-पृथ्वी थरथर कांपतात तो, हे लोकहो, इंद्र होय.

( २ ) ज्यानें विस्तीर्ण आणि हालणाऱ्या पृथ्वीला व चंचल पर्वतांना स्थिर केलें, ज्यानें अंतरिक्षाचें मापन केलें आणि आकाशाला आधार दिला तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ३ ) ज्यानें अहीला मारून सप्तसिंधूंना मोकळें केलें, ज्यानें वलाच्या अटकेंत असलेल्या गाईंना मुक्त केलें, ज्यानें मेघांत ( किंवा दगडांत ) अग्नि उत्पन्न केला, जो युद्धांत शत्रूंना जिंकतो तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ४ ) ज्यानें सर्व पार्थिव वस्तु स्थिर केल्या, ज्यानें हीन दासलोकांना नीचतर दशेला आणलें, लक्ष्यभेद करणाऱ्या व्याधाप्रमाणें ज्यानें शत्रूची संपत्ति जिंकली आहे तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ५ ) ज्या भयंकर इंद्राविषयीं " तो कोठें आहे ? " " तो नाहींच " असें लोक बोलतात, जो शत्रूची संपत्ति त्रास देऊन हरण करतो त्यावर श्रद्धा ठेवा. हे लोकांनो, तो इंद्र होय.

( ६ ) श्रीमंतांचें, गरीबांचें आणि दयेची याचना करणाऱ्या स्तोत्या पुरो-हितांचें जो कल्याण करतो, दगडांच्या योगानें सोमरस काढणाऱ्यांचें व सोम-याग करणाऱ्यांचें जो रक्षण तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ७ ) अश्व, गाई, रथ आणि ग्राम ज्याच्या आज्ञेंत आहेत, ज्यानें सूर्य आणि उषा यांना उत्पन्न केलें, जो उदकांना प्रेरणा देतो तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ८ ) युद्धांमध्यें दोन्ही बाजूंच्या, जवळच्या आणि दूरच्या सेना ज्याला मदतीकरितां बोलावतात, सारख्या रथांत बसलेले दोन्ही बाजूचे लोक ज्याला निरनिराळ्या रीतींनें हांक मारतात तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ९ ) ज्याच्या साहाय्याशिवाय लोकांना युद्धांत जय मिळत नाहीं, ज्याला योद्धे रक्षणार्थ बोलवीत असतात, जो सर्व जगताचा प्रतिनिधि आहे, जो अच-लाला चल करतो तो, हे लोकहो, तो इंद्र होय.

( १० ) जो असंख्य महापातक्यांना वज्रानें ठार करतो, नास्तिकांचा नायनाट करतो, दस्यूंचा नाश करतो तो, हे लोकहो, इंद्र होय.

( ११ ) दूर पर्वतामध्यें रहाणाऱ्या शंकराला ज्यानें शरदृतूंत चाळिसाव्या

दिवशीं ठार केलें, ज्यानें पराक्रमी अहीला तो निजला असतां ठार केलें तो, हे लोकहो, इंद्र होय.

( १२ ) सप्तकिरणांनीं युक्त अशा ज्या बलिष्ठानें सप्तसिंधूंना वाहण्यासाठीं मोकळें सोडलें, द्युलोकावर आरोहण करणाऱ्या रौहिणावर ज्यानें वज्राघात केला तो, लोकहो, इंद्र होय.

( १३ ) ज्याच्यापुढें द्यावापृथिवी नमतात, ज्याच्या बलानें पर्वत कांपतात, जो सोमपी म्हणून प्रसिद्ध आहे, ज्याच्याजवळ वज्र आहे तो, हे लोकहो, इंद्र होय.

( १४ ) सोम पिळणाऱ्याला, हवि शिजविणाऱ्याला आणि स्तोत्याला जो साहाय्य देतो, स्तोत्र आणि सोम ज्याला उत्साह आणतात तो, हे लोकहो, इंद्र होय.

( १५ ) हवि शिजविणाऱ्यास आणि सोम पिळणाऱ्यास बल देणाऱ्या भयंकर इंद्रा, तूं खरोखरीच आहेस. तुला सदोदित प्रिय असणाऱ्या आम्हीं वीरपुत्रांसह तुझी स्तोत्रें गात असावें.

पुढें दिलेलें वरुणसूक्त ( ऋ. ७.८६ ) करुणरसानें ओथंबलेलें आहे---

( १ ) ज्यानें विस्तीर्ण द्यावापृथिवीला स्थिर केलें त्या वरुणाचे जन्म महत्त्व-पूर्ण आहेत. कारण यानेंच महान् सूर्याला आणि दर्शनीय नक्षत्रांना प्रेरणा दिली आहे व भूमीला विस्तृत केलें आहे.

( २ ) मीं स्वतः त्याच्याशीं संभाषण करूं ? मी वरुणाशीं एकरूप केव्हां होईन ? न रागावतां तो माझ्या हवीचा स्वीकार करील का ? प्रसन्नमनानें सुखदात्या वरुणाला मी केव्हां पाहीन ?

( ३ ) हे वरुणा, तुझ्या दर्शनाची उत्सुकता असतांहि मला तुझें दर्शन होत नाहीं असें कोणतें पाप मीं केलें आहे, तें विचारण्याकरितां मी अनेक ज्ञानी लोकांच्याकडे गेलों. त्या सर्वांनीं मला एकच सांगितलें कीं, हा वरुण तुझ्यावर रागावला आहे.

( ४ ) हे वरुणा, असें कोणतें मोठें पाप मीं केलें आहे कीं, मित्रभूत स्तोत्याचा--माझा--नाश करण्यास तूं प्रवृत्त व्हावेंस ? हे दुर्दम्य तेजस्वी वरुणा, तें पाप मला लवकर सांग म्हणजे प्रायश्चित्त घेऊन निष्पाप होऊन मी तुझी भक्ति करीन.

( ५ ) हे वरुणा, आमच्या पूर्वजांकडून व आमच्या हातून जे दोष घडले

असतील, त्यांपासून तूं आम्हांस मुक्त कर. पशु चोरणाऱ्या चोराला पाशापासून किंवा वासराला दाव्यापासून मोकळें करावें त्याप्रमाणें मला वसिष्ठाला तूं मुक्त कर.

( ६ ) हे वरुणा, माझ्या हातून घडलेल्या दोषांना मी स्वतः कारण नव्हें तर ती दुर्वासना कारण आहे. मद्य, क्रोध, फांसे आणि अविचार हे दुर्वासनोत्पादक आहेत. बालकाच्या अपराधाला कोणीतरी थोरच कारणीभूत असतो. स्वप्नांतील कर्में सुद्धां पापमय असतात.

( ७ ) मी निष्पाप आहें. तथापि एकाद्या सेवकाप्रमाणें कामपूरक आणि विश्वपोषक वरुणाची मी सेवा करीन. उदार वरुणदेवानें अज्ञाला सुज्ञ करावें. बुद्धिमान् वरुण स्तोत्याला समृद्ध करो.

( ८ ) हे समर्थ वरुणा, तुझ्याकरितां केलेलें हें स्तोत्र तुझ्या अंतःकरणाला शांत करो. आमचा योगक्षेम सुखकर होवो. हे देवहो, तुम्हीं आमचें कल्याण करून सर्वदा संरक्षण करा.

पुढील आश्विसूक्त ( ऋ. १.११९ ) हें ऋग्वेदांतील सर्व अश्विसूक्तांचें प्रतीक आहे. 'अश्विनौ 'च्या सर्व सूक्तांमध्यें प्रायः एकच वर्णन भिन्नभिन्न भाषेंत केलेलें असतें—

( १ ) अद्भुत कर्में करणारा, मनोवेगवान्, वेगवान् घोड्यांचा, हजारों ध्वजांनीं युक्त, धनसंपन्न, धनप्रद व सुखकर असा तुमचा रथ, मी सुखानें रहावें म्हणून हवींकडे बोलवीत आहें.

( २ ) तुमचा हा रथ निघाला असतां आमची स्तुति त्याचें स्वागत करते. सर्व बाजूंनीं स्तोत्रें तुम्हांप्रत येतात. मी मधुर हवि तयार करतों तेव्हां ऋत्विज यज्ञस्थानीं आलेले असतात. हे अश्विनौ, सूर्या तुमच्या रथांत चढून बसते.

( ३ ) युद्धांत जय मिळविण्यासाठीं असंख्य योद्धे जेव्हां लढतात तेव्हां तुमचा रथ खालीं येतांना दृष्टीस पडतो. त्यावेळीं तुम्हीं भक्तासाठीं इष्टसिद्धि घेऊन येतां.

( ४ ) पाण्यांत बुडालेल्या भयभीत अशा तुग्रपुत्र भुज्यूला, आपोआप जोडल्या जाणाऱ्या आणि पक्ष्यांप्रमाणें वेगवान् असलेल्या घोड्यांच्या रथांतून दूर असलेल्या त्याच्या पित्याच्या घरीं तुम्ही घेऊन गेलां. तसेंच तुम्हीं दिवोदासाला केलेलें साहाय्य प्रसिद्धच आहे.

( ५ ) हे अश्विनौ, तुमच्या सुंदर घोड्यांनीं तुमचा रथ शर्यतीच्या शेवटापर्यंत नेऊन पोंचविला व तुमच्याच रथानें शर्यत जिंकली. तेव्हां कुलवती युवती सूर्या तुम्हांजवळ येऊन तिनें तुम्हांस पति वरून तुमच्याशीं सख्य केलें. तुम्हीं तिचें पतित्व जिंकलें.

( ६ ) तुम्हीं रेभाचें संकटांतून संरक्षण केलें आणि उष्णतेपासून अत्रीला होणारा त्रास शीतोपचारांनीं नष्ट केला. तुम्हींच शयूची गाय दुभती केली व वंदनाला दीर्घायुषी केलें.

( ७ ) हे पराक्रमी अश्विदेवांनो, जरेमुळें मृतप्राय झालेल्या वंदनाला, जुना रथ नीट करावा तसें, तुम्हीं पुनः तरुण केलें. वामदेवानें केलेली स्तुति ऐकून तुम्हीं त्याला मातेच्या उदरांतून बाहेर काढलेंत. तुमचा पराक्रम यजमानाचें रक्षण करण्यास समर्थ असो.

( ८ ) पितृक्रोधामुळें पीडिलेल्या आणि तुमची प्रार्थना करणाऱ्या भुज्यूला तुम्हीं प्रसन्न झालांत, म्हणून तुमच्याच सर्वांगीण आणि भव्य कृपेची इच्छा सर्व लोक करतात.

( ९ ) मधमाशीनें मधासाठीं मधयुक्त अशी तुमची स्तुति केली. उशिग्पुत्रानें सोमरसपानासाठीं तुम्हांला बोलाविलें. मधुविद्या संपादन करण्याकरितां दधीचि ऋषीचें मन तुम्हीं प्रसन्न केलें, तेव्हां त्यानें अश्वशिरानें तुम्हांला मधुविद्या सांगितली.

( १० ) हे अश्विनौ, तुम्हीं पेदूला प्रियतम, श्वेतवर्ण, शत्रुसंहारक, अजिंक्य आणि इंद्रासारखा युद्धकुशल असा अश्व दिलात.

ऋ. १.११४ हें रुद्रसूक्तहि वाचनीय आहेः—

( १ ) बळवान्, जटाधारी, पराक्रमी पुत्रानीं युक्त अशा रुद्राची आपण स्तुति करूं; कारण त्या योगानें या गांवांतील द्विपाद आणि चतुष्पाद प्राण्यांचें कल्याण होईल व सर्व निरोगी आणि पुष्ट होतील.

( २ ) हे रुद्रा, तूं आम्हांवर कृपा कर आणि आम्हांला सुख दे. शत्रुसंहारक अशा तुला आम्ही नमस्कार करतों. मनूनें यज्ञ करून जें सुख व आरोग्य मिळविलें तें तुझ्या नियमानुसार वागणाऱ्या आम्हांला मिळो.

( ३ ) हे कृपावंत रुद्रा, वीरपुत्रयुक्त अशी तुझी कृपा आम्हांला उपासनेच्या योगानें प्राप्त होवो. कल्याणप्रद असा तूं आमच्या प्रजांमध्यें ये. अजिंक्यपुत्रयुक्त असे आम्ही तुला हवि अर्पण करीत जाऊं.

( ४ ) तेजस्वी, यज्ञसिद्धिदायक, बुद्धिमान् व कुटिलगति रुद्राला आम्ही रक्षणाकरितां बोलावीत आहों. तो आपला क्रोध आम्हांपासून दूर फेंकून देवो. आम्ही त्याच्या कृपेची याचना करतों.

( ५ ) तो द्युलोकांतील वराह आहे. तो देदीप्यमान, जटाधर व क्रोधी आहे. त्याला आम्हीं नमस्कारपूर्वक येथें बोलावतों. उत्तम औषधें हातांत धारण करणारा तो आम्हांला आश्रय आणि अभय देवो.

( ६ ) हें मधुरतम आणि उत्साहवर्धक स्तोत्र आम्ही मरुत्पिता रुद्राकरितां गात आहोंत. तरी हे अमर रुद्रा, मर्त्यभोग्य असें धन तूं आम्हांस दे, व आमच्या पुत्रपौत्रांवर कृपा कर.

( ७ ) हे रुद्रा, आमच्यांतील लहानथोरांचा जीव घेऊं नकोस. आमच्यांतील वाढत असलेल्यांना व वाढलेल्यांनाहि तूं मारूं नकोस. आमच्या मातापित्यांस मारूं नकोस आणि आमच्या स्वतःच्या शरीरासहि अपाय करूं नकोस.

( ८ ) आमच्या पुत्रपौत्रांना, सेवकांना, गाईंना व अश्वांना तूं मारूं नको. हे रुद्रा, तूं रागावून आमच्या वीरांना ठार करूं नकोस. आम्ही हवि घेऊन तुझी सर्वदा प्रार्थना करीत असतों.

( ९ ) हे मरुत्पित्या, गुराखी ज्याप्रमाणें गुरें पोहोंचतीं करतो, तसें मी हीं तुझीं स्तोत्रें तुला अर्पण करीत आहें. आम्हांस सुख दे. तुझी कृपा सुखदायक आहे म्हणून तुझ्या कृपेकरितां आम्ही तुझी प्रार्थना करीत आहोंत.

( १० ) हे वीरपुत्रयुक्ता, तुझें तें गोघातक आणि मनुष्यघातक शस्त्र जरा दूर ठेव. तुझी कृपा आम्हांवर असूं दे. आमची बाजू घेऊन बोलत जा. द्यावापृथिवीमध्यें असणारा तूं आम्हांला आश्रय आणि सुख दे.

( ११ ) रुद्रकृपेची इच्छा करणाऱ्या आम्हीं अशा प्रकारें त्याच्यासाठीं हें स्तोत्र नमस्कारपूर्वक म्हटलें आहे. तरी मरुद्युक्त असा तो रुद्र आमची प्रार्थना ऐको आणि मित्रावरुण, अदिति, समुद्र आणि द्यावापृथिवी हे सर्व आम्हांला सुख देवोत.

उषादेवीचीं सर्वच सूक्तें इतकीं सुंदर आहेत कीं, त्यांतून भाषांतराकरितां एक सूक्त निवडून काढणें अवघड आहे. ऋ. ४.५१ या सूक्ताचें भाषांतर खालीं दिलें आहेः--

( १ ) हा प्रचंड आणि कांतिमान् प्रकाश पूर्वदिशेस अंधकारांतून प्रकट

झाला आहे. प्रकाशमय असलेल्या स्वर्गकन्या उषांनीं भूमीवरील मार्ग लोकां-करितां स्पष्ट केला आहे.

( २ ) यज्ञामध्यें वेदीपुढें पुरलेला स्तंभ जसा प्रकाशतो त्याप्रमाणें कांति-मान् उषांनीं आपल्या प्रकाशानें पूर्वदिशा व्यापून टाकली आहे. निबिड अंधकाराचीं द्वारें सताड उघडून वस्तुजात शुद्ध करणाऱ्या दीप्तिमान उषा बाहेर पडलेल्या आहेत.

( ३ ) अंधकाराचा नाश करणाऱ्या धनसंपन्न उषा, यजमानानीं लोकांना धन द्यावें म्हणून त्यांना आज प्रेरणा करीत आहेत. गाढ अंधारामध्यें पणी पडून राहोत; ते जागे न होवोत.

( ४ ) हे देदीप्यमान आणि धनवती उषादेवतांनो, ज्या रथाच्या योगानें नवग्व आणि दशग्व अंगिरसांच्या समुदायामध्यें तुम्हीं प्रकाशमान झालांत तो तुमचा जुना किंवा नवा रथ आज अनेकवार इकडे येवो.

( ५ ) हे उषादेवींनो, झोपीं गेलेल्या मानवमात्रास व पशुमात्रास जागें करून आपापल्या उद्योगास प्रवृत्त करण्याकरितां आपल्या अश्वांसह तुम्हीं सकल विश्वामध्यें संचार करीत असतां.

( ६ ) जिच्या योगानें ऋभूंनीं आपलीं कामें पार पाडलीं ती यांच्यापैकीं सर्वांत पुरातन उषा कोणती ? ती कुठें आहे ? या सर्व शुभ्र उषा शोभायमान रीतीनें संचार करीत असतात. या कधींहि जीर्ण होत नाहींत आणि त्या सर्व एक-सारख्या असल्यामुळें परस्परांपासून निराळ्या ओळखू येत नाहींत.

( ७ ) ज्या उषांच्या उदयकालामध्यें यज्ञ करणाऱ्यास व स्तुतिस्तोत्रें गाणा-ऱ्यास शीघ्र धनप्राप्ति होते, त्या तेजस्वी धनयुक्त आणि नियमांचे पालन कर-णाऱ्या उषा पूर्वींहि खरोखर होत्याच.

( ८ ) सर्व बाजूंनीं सारख्या असलेल्या पूर्वदिशेला एकाच स्थानांतून आपल्या प्रभेचा विस्तार करणाऱ्या, यज्ञादि कर्में जाणणाऱ्या तेजस्वी उषांची पर्जन्यधारांप्रमाणें ( किंवा गाईच्या समूहाप्रमाणें ) स्तुति केली जाते.

( ९ ) समान स्वरूपें असलेल्या, निर्मल वर्ण धारण करणाऱ्या, गडद अंधः-कार नाहींसा करणाऱ्या, चकाकणाऱ्या शरीरांच्या योगानें देदीप्यमान भासणाऱ्या निर्मल आणि सुंदर अशा त्या उषा एकाच रीतीनें भुवनामध्यें संचार करीत असतात.

( १० ) हे प्रकाशमय स्वर्गकन्यांनो, आम्हांला प्रजायुक्त धन द्या.

आम्हांला सुख मिळावें म्हणून तुमची स्तुति करणाऱ्या आम्हांला वीरपुत्र आणि संपत्ति प्राप्त होवो.

( ११ ) हे स्वर्दुहितानो, यजनादि कर्म करणारा मी तुमची स्तुति करीत आहें. आम्हीं लोकांमध्यें यशस्वी व्हावें; तें यश द्यावापृथिवी धारण करोत.

ऋग्वेदांतील काव्याची आणि देवतास्तुतीची कल्पना या भाषांतरावरून येईल.

सूक्तांचे सामान्य गुणदोष

मागें सांगितलेल्या देवतांखेरीज इतर बहुतेक देव-तांचीं बहुतेक सूक्तें यज्ञविधीकरितां रचलेलीं असल्यामुळें त्यांची रचना अगदीं यांत्रिक (Mechanical) वाटते. नवव्या मंडलांतील सोमसूक्तांच्या बाबतींत हें विधान विशेष रीतीनें लागू करतां येईल. ‘ रचनेच्या बाबतींत सूक्तें अगदीं साधीं आहेत. पुष्कळशा सूक्तांची दुर्ज्ञेयता ऋग्वेदकालाच्या आपल्या अज्ञानामुळें भासते. कारण त्यांचे परस्परसंबंध आणि त्यांतील उल्लेख हे आज आपणांस माहीत नाहींत. परंतु स्वतः सूक्तकारांना त्यांचें पूर्ण ज्ञान होतें. तरीसुद्धां उत्तरकालीन सूक्तांमध्यें पुष्कळशी गूढता असते आणि विचारांची गुंतागुंत व त्यांचें गूढवादामध्यें पर्यवसान हे दोष त्यांत दिसून येतात. ’ *

“ दानस्तुति म्हणून कांहीं सूक्तें ऋग्वेदांत आहेत तींहि काव्यदृष्ट्या हीन स्वरूपाचीं आहेत. हीं सूक्तें सुमारें चाळीस आहेत.

‘ दानस्तुति ’

परंतु केवळ दानस्तुतीचें असें एकच सूक्त ( ऋ. १. १२६ ) आहे. बाकीच्या सूक्तांमध्यें सूक्ताच्या शेवटच्या कांहीं ऋचांमध्यें दानस्तुति असते. इंद्राच्या साहाय्यानें युद्धांत मिळालेल्या विजयाबद्दल कांहीं सूक्तें आहेत. देवाच्या स्तुतीबरोबर विजयी राजाचीहि स्तुति त्यांत असते. तसेंच ऋषीच्या आश्रयदात्या राजानें त्याला दक्षिणा म्हणून घोडे, बैल, दास वगैरे दिल्याबद्दल त्या राजाची स्तुति केलेली असते. एखाद्या राजानें सांगितल्यावरून केलेलीं आणि यज्ञांत म्हटलेलीं अशीं विशेषत: इंद्रदेवतेचीं कांहीं सूक्तें आहेत. या सूक्तांत शेवटीं मूल्यवान् दक्षिणा दिल्याबद्दल त्या राजाची स्तुति असते. या दानस्तुतीमध्यें त्या धर्मशील दात्याचें संपूर्ण नांव दिलेलें असतें. प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टी त्यांत असल्यामुळें ऐतिहासिकदृष्ट्या तीं महत्त्वाचीं आहेत. काव्य या दृष्टीनें त्यांना महत्त्व नाहीं. अपेक्षित दक्षिणा मिळण्याच्या हेतूनें, कारागिरानें केलेल्या वस्तूप्रमाणें

---

* Keith–Cambridge History of India Vol. I Chap. IV.

तीं रचलेलीं आहेत. दानस्तुतीशीं संबंध नसतांहि कांहीं सूक्तें दक्षिणा मिळण्याकरितां 'ठोकून काढलेलीं' आहेत. कांहीं ठिकाणीं स्वतः ऋषींनीं आपल्या कृतीची सुताराच्या कृतीशीं तुलना केली आहे ( ऋ. १.६१.४, १३०.६ इ. ) काव्यदृष्ट्या जीं सूक्तें उत्कृष्ट आहेत त्यांपैकीं एकाचाहि दानस्तुतीनें शेवट केलेला नाहीं ही ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट आहे. ऋग्वेदाच्या सूक्तकारांत कांहीं थोडे केवळ रचनाकर्ते होते; परंतु पुष्कळसे 'कवि', ह होते."

संवादसूक्तें आणि प्रो. ओल्डेनबर्ग यांची उपपत्ति

" ऋग्वेदामध्यें सुमारें वीस सूक्तें अशीं आहेत कीं ज्यांचा वीरचरित्रात्मक आणि नाट्यविषयक ( Epic and dramatic ) काव्यांत अंतर्भाव करतां येतो. संवादस्वरूपाच्या कथांतील हे त्रुटित भाग होत. म्हणून यांना 'संवादसूक्तें' म्हणतां येईल. प्रो. ओल्डेनबर्गनीं त्यांना 'आख्यानसूक्तें' असें नांव दिलें आहे, आणि त्यांच्या त्रुटित व गूढ स्वरूपाचें स्पष्टीकरण करण्याकरितां एक उपपत्ति बसविली आहे. ते म्हणतात, 'हिंदुस्थानांतील वीरकाव्याचें प्राचीनतम स्वरूप गद्यपद्यमिश्रित होतें. पात्रांचीं भाषणें हीं पद्यांत होतीं आणि त्यांना जोडणाऱ्या गोष्टी गद्यांत होत्या. यांपैकीं केवळ पद्यभाग तेवढा पाठ केला जात असे व त्यामुळें तो परंपरेनें आला व टिकला. परंतु गद्यकथा प्रत्येक भाषक आपापल्या भाषेंत सांगत असे. ऋग्वेदांतील संवादसूक्तांत संभाषणात्मक पद्यभाग तेवढा आला आहे व कथात्मक गद्यभाग त्यांत नसल्यामुळें तो उपलब्ध नाहीं. यांपैकीं कांहीं कथा ब्राह्मणग्रंथ, काव्यें आणि टीका यांच्या मदतीनें समजू शकतात. ज्या ठिकाणीं अशी मदत मिळत नाहीं, त्या ठिकाणीं केवळ तर्कानेंच संभाषणावरून कथेची कल्पना करावी लागते. इतर देशांच्या वाङ्मयांतूनहि प्राचीन वीरकाव्यांचें स्वरूप गद्यपद्यमिश्रित आहे, या वस्तुस्थितीचा वरील उपपत्तीस आधार मिळाल्यासारखा वाटतो. उदाहरणार्थ, स्कँडिनेव्हियन आणि जुन्या आयरिश काव्यांत असा प्रकार आढळतो. तसेंच ब्राह्मणें, उपनिषदें, महाभारताचा जुना भाग, बुद्धवाङ्मय, कथावाङ्मय, नाटकें आणि चम्पू यांतहि हेंच स्वरूप दिसून येतें. या सर्व उदाहरणांत पद्याबरोबर गद्यहि परंपरेनें आलेलें आहे. तथापि ऋग्वेद हा केवळ पद्यग्रंथ असल्यामुळें त्यांत गद्याचा अंतर्भाव करणें शक्य नव्हतें; आणि गद्यपद्यमिश्रित आख्यानांना पद्यमय ऋग्वेदांत स्थान मिळावयाचें झाल्यास त्यांतील गद्यभाग वगळणें आवश्यक

होतें. अशा प्रकारची प्रो. ओल्डेनबर्ग यांची उपपत्ति आहे आणि ती कांहीं काळपर्यंत बहुतेक विद्वानांनीं स्वीकारली होती."

"परंतु या उपपत्तीला बरेच विरोधक पुढे उत्पन्न झाले. प्रो. मॅक्समुल्लर आणि प्रो. सिल्व्हान लेव्ही यांनीं असें मत मांडलें होतें कीं, संवादसूक्तें हा नाटकाचा एक प्रकार असावा. या मताचा अनुवाद करून हेर्टेल आणि श्रेडेर यांनीं असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला कीं, 'संवादसूक्तें हीं धार्मिक संप्रदायाशीं संबद्ध असलेल्या नाटयप्रयोगांतील संभाषणें होत. नाटयाचा अभिनय त्यांत समाविष्ट केला असतां त्या सूक्तांचा अर्थ लावणें कठिण जाणार नाहीं असें ते म्हणतात. कोणत्या प्रकारचा अभिनय त्याच्याशीं जोडला पाहिजे हें संवादावरून कल्पनेनें जाणतां येईल.' हीं संवादसूक्तें म्हणजे प्राचीन पोवाडे होत. इतर देशांच्या वाङ्मयांतील असलीं काव्येंहि प्राचीन पोवाडेच होत. या पोवाड्यांपासूनच वीरकाव्यें आणि नाटकें यांचा उगम झाला. कारण यामध्यें कथांश आणि नाटयांश असे दोन्ही आहेत. या दोन्ही अंशांपासून अनुक्रमें वीरकथा आणि नाटकें हीं प्रगत झालीं. हीं आख्यानें अगर पोवाडे नेहमींच पूर्णपणें पद्यांत नव्हते. तर कांहीं ठिकाणीं त्यासंबंधींची कथा पोवाडे म्हणण्याच्या आरंभीं अगर नंतर गद्यांत तोंडी सांगितली जात असे; आणि प्रसंगानुसार पद्यांची सांखळी जोडण्याकरितां लहानशीं विवरणात्मक भाषणें करण्यांत येत. तेव्हां कांहीं सूक्तांच्या बाबतींत ओल्डेनबर्गनीं म्हटल्याप्रमाणें पद्यभागाचा संबंध दाखविणारी अशी एकादी गद्य कथा असावी कीं जिच्यामुळें तीं संभाषणें स्पष्ट होतील. परंतु बरींचशीं सूक्तें म्हणजे प्रत्यक्ष नाटकें नसून अर्धवट वीरकाव्य व अर्धवट नाटक अशा स्वरूपाचे पोवाडे आहेत." *

संवादसूक्तांचें वास्तविक स्वरूप

या संवादसूक्तांपैकीं ऋ. १०.९५ हें सूक्त सर्वांत प्रसिद्ध आहे. या सूक्तांत पुरूरवा आणि उर्वशी यांचा संवाद असलेल्या अठरा ऋचा आहेत. पुरूरवा हा इहलोकांतील एक मर्त्य आणि उर्वशी ही एक अप्सरा आहे. चार वर्षेंपर्यंत उर्वशी ही पुरूरव्याची पत्नी म्हणून इहलोकांत राहिली. पुरूरव्यापासून तिला

पुरूरवा-उर्वशीसंवाद

* Winternitz-History of Indian Literature Vol. I. pp. 100-3.

गर्भ राहिल्यानंतर ती ‘ पहिल्या उषेप्रमाणें ’ निघून गेली. पुरुरवा तिला शोधण्याकरितां निघाला. शेवटीं एका सरोवरांत अप्सरांबरोबर क्रीडा करीत असलेली उर्वशी त्याला आढळली. या ठिकाणीं उर्वशी व पुरूरवा यांचा जो संवाद झाला त्यांतील दुर्ज्ञेय अशा मंत्रांतून एवढी माहिती मिळते. सुदैवानें ही पौराणिक कथा संस्कृत वाङ्मयांत इतरत्र आढळते आणि त्यावरून कांहीं अंशीं ही कथा पूर्णपणें उपलब्ध होऊं शकते. ही कथा प्रथम शतपथब्राह्मणांत ( ११.५.१ ) आढळते. त्या ठिकाणीं ऋग्वेदांतील मंत्र कथेमध्यें गोंवलेले आहेत. त्या कथेमध्यें असें म्हटलें आहे कीं, जेव्हां उर्वशीनें पुरूरव्याची पत्नी होण्याचें कबूल केलें तेव्हां त्याला तीन अटी घातल्या. त्यांतील एक अट अशी होती कीं, तो नग्नस्थितींत केव्हांहि तिच्या दृष्टीस पडतां कामा नये. गंधर्वांना उर्वशी परत पाहिजे होती. उर्वशीजवळ दोन मेंढे होते आणि ते तिला फार आवडत असत. रात्रीं ते मेंढे तिच्या पलंगाला बांधून ठेवण्यांत येत असत. एके दिवशीं रात्रीं गंधर्वांनीं ते मेंढे चोरून नेले, त्याबरोबर उर्वशीनें आक्रोश करण्यास सुरुवात केली. जवळपास दुसरें कोणी नसल्यामुळें स्वतः पुरूरवा नग्नस्थितींत त्या चोरांचा पाठलाग करण्यास निघाला. अंगावर वस्त्र घेण्यांत फार वेळ जाईल असें त्याला वाटलें. इतक्यांत गंधर्वांनीं मोठा विद्युत्प्रकाश उत्पन्न करून दिवसासारखा उजेड केला. त्याबरोबर नग्न पुरूरवा उर्वशीला दिसला व ती निघून गेली. पुरूरवा परत आला तों त्याला उर्वशी दिसेना. तिच्या वियोगदुःखानें वेडा होऊन तिचा शोध करीत तो रानोमाळ भटकत राहिला. एके दिवशीं तो एका जलाशयाजवळ आला. त्यांत अप्सरा हंसींच्या रूपानें विहार करीत होत्या. त्यांमध्यें त्याला उर्वशी दिसली. ऋग्वेदांत जो संवाद दिला आहे तो या ठिकाणीं झाला आहे आणि तोच विवरणात्मक मजकुरासह शतपथब्राह्मणांत आला आहे. एकंदर अठरा मंत्रांपैकीं पंधरा मंत्र शतपथब्राह्मणांत घेतलेले आहेत. पुरूरवा उर्वशीची घरीं परत येण्याविषयीं वारंवार प्रार्थना करीत असतो; परंतु तिचा कांहींच उपयोग होत नाहीं. शेवटीं निराश होऊन आत्मनाश करण्यास प्रवृत्त झालेला पुरूरवा म्हणतोः—

“ हे उर्वशी, तुझ्याबरोबर क्रीडा करणाऱ्या पतीचें माझें शरीर या कड्यावरून खालीं कोसळो किंवा देशांतराला जावो. येथेंच तें जमिनीवर पडो आणि या अरण्यांतील हिंस्र लांडगे तें फाडून खावोत. ”

यावर उर्वशी म्हणते—

" हे पुरूरवस्, तूं प्राणत्याग करूं नकोस. येथें उडी टाकूं नकोस. अमंगल लांडगे तुझें शरीर न खावोत. स्त्रियांच्या बरोबर चिरकाल स्नेह रहाणें शक्य नसतें; कारण त्यांचीं हृदयें लांडग्याच्या हृदयासारखीं असतात. "

पुरूरव्याचें आणि उर्वशीचें पुनर्मीलन झालें किंवा नाहीं, झालें असल्यास तें कसें झालें हें ऋग्वेदांत किंवा शतपथब्राह्मणांत स्पष्ट दिलेलें नाहीं. तथापि असें दिसतें कीं, तो गंधर्व होऊन स्वर्गलोकांत गेला आणि तेथें त्याचें उर्वशीशीं पुनर्मीलन झालें. ही पुरूरवा-उर्वशीची कथा उत्तरकालीन वाङ्मयांत अनेक वेळां आलेली आहे. कृष्णयजुर्वेदाचें काठक ब्राह्मण, बौधायन श्रौतसूत्र, बृहद्देवता, हरिवंश, विष्णुपुराण आणि कथासरित्सागर यांत ती आलेली आहे. कालिदासाचें ' विक्रमोर्वशीय ' हें प्रसिद्ध नाटक याच कथानकावर रचलेलें आहे.

यमयमी-संवाद

ऋग्वेदांतील दुसरा महत्त्वाचा संवाद म्हणजे यमयमीसंवाद ( ऋ. १०.१० ) होय. जुळ्या भावंडांच्या पहिल्या जोडप्यापासून अखिल मानवजातीची उत्पत्ति झाली ही प्राचीन कथा या संवादाच्या मुळाशीं आहे. मानवजाति नष्ट होऊं नये म्हणून, कामनाप्रदीप्त झालेली यमी विकारपूर्ण शब्दांत आपल्या भावाला-यमाला संभोगास प्रवृत्त करूं पहाते. परंतु, देवांचे सनातन कायदे एकाच रक्ताच्या बंधुभगिनींच्या संबंधाचा निषेध करतात असें सांगून सौम्य शब्दांत यम तिचा अनादर करतो. या संवादापैकीं कांहीं भाग अद्यापि दुर्ज्ञेय आहे, तथापि त्यांतील भाषणें नाट्यपूर्ण आहेत. पहिल्या ऋचेंत यमीनें यमाला एतत्संबंधीं विनंति केली असतां यम तिला म्हणतो—

' तुझा सखा असलें सख्य करूं इच्छित नाहीं. कारण त्यामुळें आपलेपणाच्या नात्याचें परकेपणांत रूपांतर होईल. द्यावापृथिवींना आधार देणारे बलवान् असुराचे पुत्र आपल्या सभोंवार पहात असतात. '

त्यावर यमी म्हणते—

' अमर असणारे देवहि एकाद्या मनुष्याला त्याज्य वाटणारें हें कृत्य करतात.—' परंतु यम तिला उत्तर देतो, ' जें पूर्वीं झालें तें आम्ही करणार नाहीं. सूर्य आणि सरण्यू हे आपले आईबाप आहेत, म्हणून आपलें बंधुभगिनीचें श्रेष्ठ नातें आहे.' या त्याच्या उत्तरावर यमी म्हणते—' आपला हा संबंध

कोणाला कळणार ? आपल्याला कोण पहाणार आणि आपलें हें कृत्य कोण बाहेर फोडणार आहे ?' यम म्हणतो–'देवांचे हेर उघड्या नेत्रांनीं सर्वत्र संचार करीत असतात. ते कोठेंहि थांबत नाहींत.' एवढ्यानें समाधान न होऊन यमी म्हणते–' भाऊ असतांना जी भगिनी अनाथ होते तो भाऊ असून काय उपयोग ? तसेंच बहीण असतांना ज्या भावाला दुःख प्राप्त होतें ती बहीण असून व्यर्थ होय.' परंतु यम तिला उत्तर देतो कीं, 'भ्रातृभगिनी-संबंध हें पाप आहे. माझ्याशिवाय अन्य पुरुषाची इच्छा कर.' याप्रमाणें कळवळ्यानें विनंति केली असतां ती निष्फल झाल्यामुळें यमी संतप्त होते. यमाचें भाषण शेवटपर्यंत सौम्यपणाचें आहे.

या यमयमीकथेचा शेवट कसा झाला तें समजत नाहीं, आणि वेदोत्तर-कालीन वाङ्मयांतहि या कथेचा मागमूस लागत नाहीं. हा संवाद म्हणजे दिवस आणि रात्र यांवरील रूपक आहे असें प्रो. मॅक्समुल्लर यांचें मत आहे. ही कथा अवेस्त्यांमध्येंहि आहे. यावरून ती इंडो-इराणी काळांत किंवा कदाचित् मूलगृहींहि उत्पन्न झाली असावी असा तर्क होतो.

## जातिसंस्थेचा उगम आणि विकास

आर्य पंजाबांत आले तेव्हां त्यांच्यामध्यें जातिसंस्थेचा उदय झाला नव्हता.

**सामाजिक वर्गव्यवस्था**

आजच्या हिंदुधर्माचें प्रमुख अंग जें चातुर्वर्ण्य तें त्यावेळीं अस्तित्वांत नव्हतें. वांशिक, सामाजिक, धार्मिक आणि राजकीय अशा कारणांमुळें चातुर्वर्ण्यसंस्थेचा पाया ऋग्वेद-कालीं घातला गेला. ऋग्वेदकालांत चार 'वर्ग' झाले होते; चार 'वर्ण' झाले नव्हते. म्हणजे जातिबंधनें आजच्यासारखीं तीव्र नव्हतीं. त्यावेळीं जन्मावरून जाति ठरत नव्हती; तर प्रत्येकास कर्मस्वातंत्र्य होतें. तथापि समाजव्यवस्थेच्या दृष्टीनें चार वर्ग नैसर्गिक रीत्या निर्माण झाले होते. इराणी लोकांमध्येंहि पुरोहितवर्ग, योध्यांचा वर्ग व वैश्यवर्ग असे तीन वर्ग होते. आणि समाजविभागणीची ही कल्पना त्यांनीं पंजाबांतूनच आपल्याबरोबर नेली होती. असो. हिंदुस्थानांत समाजव्यवस्थेच्या सोयीच्या दृष्टीनें चार वर्ग कसे निर्माण झाले हें आतां पहावयाचें आहे.

पंजाबांत आल्यानंतर आर्यांचा अनार्यांशीं संबंध आला आणि त्यामुळें

**शूद्रवर्ग**

जातिसंस्था प्रथम अस्तित्वांत आली. अनार्य हे आर्यांपासून सर्वस्वीं भिन्न होते. पहिला भेद म्हणजे

आर्य गौरवर्ण होते आणि अनार्य कृष्णवर्णीय होते. अनार्यांची भाषा आर्यांच्या भाषेहून सर्वस्वीं भिन्न होती. त्यांचा धर्म आणि चालीरीति याहि आर्यांच्याहून निराळ्या होत्या. आपल्या प्रदेशांत नवीन आलेल्या व आपलें स्वातंत्र्य आणि सुख हिरावूं पहाणाऱ्या आर्यांना प्रतिकार करण्याचा अनार्यांनीं साहजिकच प्रयत्न केला; परंतु त्यांच्या शारीरिक सामर्थ्यापुढें आणि सुधारलेल्या शस्त्रांमुळें प्रतीत होणाऱ्या युद्धकौशल्यापुढें अनार्यांचा टिकाव लागेना. त्यामुळें त्यांना आर्यांचें दास्य पत्करावें लागलें. ज्यांना दास्यांत रहाण्याची इच्छा नव्हती ते दूर प्रदेशांत निघून गेले; परंतु अनार्यांचा बहुजनसमाज आर्यांना शरण आला व त्यांची सेवाचाकरी करूं लागला. या अनार्यांना आर्यांनीं आपल्या सेवकवर्गांत सामील करून घेतलें. अशा प्रकारें आर्य आणि अनार्य हा पहिला भेद मानववंशदृष्ट्या आणि राजकीय दृष्ट्या निर्माण झाला. शारीरिक वर्णभेदामुळें हा जातिभेद तीव्रतर झाला. वर्ण हा मूळ रंगवाचक शब्द पुढें जातिवाचकहि बनला याचें कारण हेंच होय. या अनार्य जातीला 'शूद्र' असें नांव देण्यांत आलें. 'शूद्र' हा शब्द मूळ आर्यभाषेंतील नव्हे, सिंधुनदीच्या तीरावरील एकाद्या प्रदेशाचें तें द्राविडियन नांव असावें व तें वैदिक भाषेंत प्रविष्ट झालें असावें.

क्षत्रियवर्ग

हिंदुस्थानांत आल्याबरोबर आर्यांना वारंवार अनार्यांशीं युद्धप्रसंग येऊं लागले. तेव्हां अनार्यांपासून आपलें रक्षण करण्याकरितां व आपल्या वसतीचा प्रदेश वाढविण्याकरितां आर्यांना आपल्यापैकीं कांहीं लोक या संरक्षणाच्या कामाकरितां निराळे काढून ठेवावे लागले. यांतून क्षत्रिय जातीचा उदय झाला. या क्षत्रियांपैकीं कांहीं प्रमुख क्षत्रिय लहान लहान प्रदेशांचे संरक्षक अधिपति बनले आणि जसजसा आर्यवसतीचा प्रदेश वाढूं लागला तसतसे त्यांच्या अधिकारक्षेत्रांतील प्रांत मोठे होऊं लागले आणि ते एकेका प्रांताचे राजे बसले. परंपरेनें त्यांच्या पिढ्यांतील मुलांना युद्धशास्त्राचें शिक्षण देण्यांत येऊं लागलें आणि कांहीं कालानंतर शस्त्रकौशल्याचें शिक्षण आनुवंशिक झालें आणि या युद्धकुशल लोकांची एक स्वतंत्र जाति बनली. हा भेद राजकीय दृष्ट्या निर्माण झाला.

वैश्यवर्ग

परंतु ज्याच्या अस्तित्वाशिवाय क्षत्रियांना जगणें अशक्य होतें व ज्याच्या आधारावरच राजकीय व्यवस्था चालते असा एक वर्ग अस्तित्वांत असणें जरूर होतें. या कारणास्तव

जमिनीची लागवड करून धान्य उत्पन्न करणारे शेतकरी, मानवी जीविताला आवश्यक अशा अन्य वस्तु निर्माण करणारे लोहार, सुतार, सोनार, विणकर, कारागीर, व्यापारी इत्यादिकांचा एक निराळा वर्ग बनला. जगाच्या इतिहासांत कोठल्याहि प्रदेशांत राज्यव्यवस्थेचा आधारस्तंभ असणारा असा हाच वर्ग होय. याच्यामुळेंच राज्यसंस्थांचें पोषण होतें. या वर्गाला 'विश्' असें नांव ऋग्वेदांत आहे व यावरून 'विश्पति' असें नांव राजाला मिळालें आहे. या वर्गांतील लोकांना त्यांचे निरनिराळे धंदे फायदेशीर झाल्याकारणानें ते आपापल्या धंद्यांस चिकटून राहिले. त्यांचीं मुलेंबाळेंहि परंपरेनें त्यांचे धंदे करूं लागलीं व अशा रीतीनें वैश्यवर्ग अस्तित्वांत आला. या वर्गांतील प्रत्येक धंदेवाईकानें आपला चालू धंदाच केला पाहिजे अशा प्रकारचा निर्बंध अद्यापि उत्पन्न झाला नव्हता. कोणीहि कोणताहि धंदा करी, त्यामुळें सर्व प्रकारचीं कामें करणाऱ्यांचा एकच वर्ग बनला होता. अर्थात् हा वर्ग समाजव्यवस्थेच्या दृष्टीनें निर्माण झाला.

या तीन वर्गांबरोबर चौथा एक वर्ग–ब्राह्मणवर्ग–बनत चालला होता. या प्रमुख वर्गाची उत्पत्ति धार्मिक कारणांमुळें झाली. प्रारंभीं प्रत्येक गृहपति स्वतः आपल्या कुटुंबाचे यज्ञयागादि धार्मिक विधि चालवीत असे. यज्ञयाग हें धर्माचें मुख्य अंग होतें. राजे लोक प्रारंभीं यज्ञयाग स्वतः करीत असत; परंतु पुढेंपुढें त्यांच्याकरितां यज्ञ करण्यास प्रतिनिधि म्हणून पुरोहित नेमण्यांत येऊं लागला आणि पुरोहितांचा एक वर्गच बनला. राजांच्या आज्ञेवरून त्यांच्याकरितां हे पुरोहित यज्ञ करीत असत व त्याप्रीत्यर्थ त्यांना राजांकडून मोठी दक्षिणाहि मिळत असे. राजपुरोहिताचा मान इतका मोठा समजला जात असे कीं, त्याप्रीत्यर्थ वर्षानुवर्ष स्पर्धा चालत असत. सुदास राजाच्या पौरोहित्याबद्दल वसिष्ठविश्वामित्रांमध्यें झालेली स्पर्धा प्रसिद्धच आहे. या पुरोहितवर्गाला राजेहि मोठा मान देऊं लागले. राजा युद्धास निघाला कीं पुरोहित त्याच्याबरोबर जात असे आणि युद्धांत जयप्राप्ति होण्याकरितां त्याच्यासाठीं देवतांची प्रार्थना करीत असे. राजाच्या सल्लागाराचेंहि काम तोच करीत असे. युद्धांत राजाला जय मिळाला, कीं त्याचें श्रेय पुरोहितानें केलेल्या देवतांच्या प्रार्थनेला मिळत असे. एकाद्या वेळीं अवर्षण झालें कीं, पुरोहित पर्जन्याकरितां प्रार्थना करीत असे, आणि पाऊस पडत असे. अशा कारणांमुळें साहजिकच पुरोहिताचें

ब्राह्मणवर्ग

महत्त्व वाढलें आणि त्याच्या प्रार्थना व देवतांचे प्रसाद यांच्यामध्यें कांहीं तरी अन्योन्यसंबंध आहे असें समजण्यांत येऊं लागलें. त्यामुळें हा वर्ग वाढूं लागला आणि सर्वसामान्य जनतेलाहि आपण आपलीं धार्मिक कृत्यें स्वतः करण्यापेक्षां पुरोहितवर्गाकडून करवून घ्यावीत त्यामुळेंच आपणांवर देवतांचा प्रसाद होईल, असें वाटूं लागलें.

ब्राह्मणवर्गाच्या उत्पत्तीचीं आणखी कारणें

पंजाबप्रांतांत येण्यापूर्वींच आर्यांमध्यें मंत्ररचना सुरू झाली होती. हे सर्व मंत्र जतन करून ठेवणें जरूर होतें. दिवसानुदिवस नवे नवे कवि उदित होऊं लागले आणि ही धार्मिक मंत्ररचना झपाट्यानें वाढूं लागली. सर्वच ऋषि किंवा पुरोहित कवि नव्हते. जे मंत्ररचना करीत नव्हते ते हे सर्व मंत्र पाठ करीत असत आणि प्रसंगानुसार त्यांचा उपयोग करीत असत. तथापि वर्षानुवर्ष नवीन रचना होत असल्याकारणानें हें मंत्रवाङ्मय एवढें विस्तीर्ण झालें कीं, लेखनाभावीं तें पाठ करण्याकरितां एक स्वतंत्र वर्ग असणें जरूर झालें. याचबरोबर हेंहि ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, या घटनेला अनेक शतकें लागल्याकारणानें मूळ वैदिक भाषा सर्वसामान्य जनतेला समजण्यास थोडी अवघड वाटूं लागली. त्यामुळें या वाङ्मयाला एक प्रकारचें पावित्र्य आलें आणि तज्ज्ञ असा पुरोहित वर्ग याचा एकमेव धारक आणि रक्षक बनला. वैदिक मंत्रांचें रक्षण, पठण आणि अध्यापन व समाजाच्या धार्मिक विधींचें आचरण हें या ब्राह्मणवर्गाचें काम होऊन बसलें. यासंबंधींचें शिक्षण परंपरेनें पिढ्यांना देण्यांत येऊं लागलें व ब्राह्मण हा एक वर्ग बनला आणि त्यानें सर्व वर्गांत अग्रस्थान मिळविलें. पुरोहितवर्गाला समाजांत अग्रस्थान मिळाल्याचें जगाच्या इतिहासांत हें एकच उदाहरण आहे. इतर सर्वत्र योध्यांच्या वर्गाला प्राधान्य मिळालेलें आहे. अशा प्रकारें प्रारंभीं सांगितलेल्या कारणांमुळें ऋग्वेदकाळीं समाजांत चार वर्ग निर्माण झाले. ही व्यवस्था दृढ होऊन तिचेंच उत्तरकालांत चातुर्वर्ण्यांत रूपांतर झालें.

## देवता

देवतास्वरूपें

ऋग्वेदांतील देवतांच्या स्वरूपांसंबंधीं अनेक मतें मांडण्यांत आलीं आहेत. यास्काचार्यांच्या निरुक्तांमध्यें सुद्धां वैदिक देवतांच्या स्वरूपासंबंधीं ऐतिहासिक आणि नैसर्गिक अशा दोन उपपत्ति मांडण्यांत आल्या आहेत; म्हणजे

यास्ककालीं सुद्धां वैदिक देवतांच्या मूळ स्वरूपांबद्दल निश्चित ज्ञान नव्हतें. अर्वाचीन संशोधनामुळें देवतास्वरूपें निश्चित करण्यास बरीच मदत झाली आहे. तथापि अजूनहि या बाबतींत एकमत झालेलें नाहीं. देवतांच्या स्वरूपांचा निर्णय करण्याकरितां ज्या ज्या उपपत्ति पुढें आलेल्या आहेत त्यांचा उल्लेख त्या त्या देवतांच्या वर्णनप्रसंगीं येईलच. कोणत्याहि एका उपपत्तीनें सर्व देवतांच्या स्वरूपाचा निर्दोष निर्णय लागलेला नाहीं. डॉ. व्ही. जी. रेळे यांनीं नुकतीच एक शारीरशास्त्रविषयक उपपत्ति मांडलेली आहे. × ज्ञानतंतूंच्या प्रकृतिविज्ञानावरून ( Physiology of the Nervous System ) समजून येणारे निरनिराळे भाग किंवा अवयव हेच ऋग्वेदांतील सर्व देवतांच्या स्वरूपवर्णनांत अभिप्रेत आहेत, असें सिद्ध करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. निरनिराळ्या देवतांचीं वर्णनें व त्यांचे परस्पर संबंध यांशीं वरील ज्ञानतंतूंच्या प्रकृतिविज्ञानाचें साम्य जुळतें किंवा नाहीं हा प्रश्न निराळाच आहे. परंतु या अत्यंत अर्वाचीन आणि केवळ सूक्ष्म बुद्धीनेंच शोधल्या गेलेल्या शास्त्राचें ज्ञान आपल्या प्राचीनतम पूर्वजांवर लादणें असमंजस आणि फाजील स्वाभिमानदर्शक होईल. या शास्त्राचें ज्ञान त्यांना होतें असें क्षणभर वादाकरितां गृहीत धरलें तरी तें ज्ञान शास्त्रीय ग्रंथद्वारें व्यक्त न करतां धार्मिक देवतांद्वारें व्यक्त करण्याची जरूरी त्यांना कां भासली ? शास्त्रज्ञान धर्मद्वारां व्यक्त करण्याची अजब कल्पना त्यांना कोठून सुचली, हा प्रश्न सर्वांत महत्त्वाचा आहे आणि याला उत्तर मिळणें शक्य नाहीं. तेव्हां खोलांत शिरून त्या उपपत्तीचें निरीक्षण करण्याची आवश्यकता उरतच नाहीं. असो. ‘ यस्य वाक्यं स ऋषिः या तेनोच्यते सा देवता ’ या सर्वानुक्रमणींतील व्याख्येनुसार ऋग्वेदांत अनेक ऋषि आणि अनेक देवता आहेत. त्या सर्व देवतांचा उल्लेख येथें करणें शक्य नाहीं; आणि त्याची जरुरीहि नाहीं. कांहीं महत्त्वाच्या देवतांचीं साधारणतः निश्चित झालेलीं स्वरूपें कशीं आहेत तें येथें पहावयाचें आहे. ऋग्वेदांत खालील देवता प्रामुख्यानें आलेल्या आहेतः—

इंद्र, अग्नि, मित्र, वरुण, आश्विनौ, मरुत्, रुद्र, सोम, उषस्, द्यौ, पृथिवी, सविता, विष्णु, पूषन्, सूर्य, पर्जन्य, वात, यम, आदिति, आप, अपां नपात्, विश्वेदेव, इत्यादि.

---

× Vedic Gods as figures of Biology, Bombay 1931.

यांपैकीं कांहीं देवतांच्या स्वरूपांविषयीं आणि कार्यांविषयीं येथें थोडक्यांत विवेचन करण्यांत येत आहेः—

इंद्र

इंद्र—ऋग्वेदांतील अडीचशेंहून अधिक सूक्तें इंद्रदेवतेचीं आहेत. इंद्र हा ऋग्वेदीय आर्यांचा प्रियतम देव आहे. कांहीं विद्वानांच्या मतें इंद्र ही आर्य हिंदुस्थानांत आल्यानंतर कल्पिलेली देवता आहे. त्याच्या उलट हिंदुस्थानांत येण्यापूर्वींची ती देवता आहे असेंहि मत प्रचलित आहे. इंद्राचें स्वरूप अनेकांनीं अनेक प्रकारें सांगितलें आहे. उदाहरणार्थ—वादळ, आकाश, वर्ष, सूर्य, अग्नि इ. इंद्रदेवतेचीं म्हणून जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं यांपैकीं कोणत्याहि स्वरूपामुळें उत्पन्न होत नाहींत. उत्तरध्रुव हें आर्यांचें मूळ स्थान होतें असें सिद्ध करतांना लो. टिळकांनीं इंद्र देवतेच्या स्वरूपासंबंधीं बरोबर उपपत्ति बसविलेली आहे. तिचें वर्णन पहिल्या विभागांत आलेंच आहे. इंद्र ही उत्तरध्रुवप्रदेशांतील देवता आहे. इंद्र आणि वृत्र यांचें वारंवार युद्ध होतें. इंद्र वृत्राचा किंवा अहीचा वध करून प्रकाश, जल आणि गाई ( किरण ) यांची मुक्तता करतो. उत्तरध्रुवप्रदेशांत सूर्य कांहीं महिने अदृश्य असतो. पृथ्वीच्या भोंवतीं वायुरूपी जलाचा प्रवाह सूर्यप्रकाशाशीं समांतर असा नेहमीं वाहत असतो. सूर्य अदृश्य होतो म्हणजे वृत्रनामक एक काल्पनिक दुष्ट शक्ति सूर्याचा आणि जलाचा मार्ग आडवते, तेव्हां इंद्र वृत्राशीं युद्ध करून त्याचा पाडाव करतो आणि सूर्य उगवतो व जलप्रवाह चालू होतात, अशा प्रकारची इंद्राची मूळ कल्पना आहे. कालांतरानें ही मूळ कल्पना आर्य विसरले. इंद्र ही देवता शिल्लक राहिली. परंतु तिचें स्वरूप बदललें. हिंदुस्थानांत आल्यानंतर इंद्राला राष्ट्रदेवतेचें स्वरूप प्राप्त झालें. अनार्यांशीं वारंवार येणाऱ्या युद्धप्रसंगांमुळें इंद्रही रणदेवता आणि राष्ट्रदेवता बनली. द्यावापृथिवींनां सुद्धां कांपावयास लावणारी इंद्राची प्रचंड शक्ति, त्याची युद्धप्रियता आणि वृत्रवध यांचें वर्णन इंद्रसूक्तांतून नेहमीं आढळतें. इंद्र हा ' द्यौ ' चा पुत्र आहे अशी कल्पना आहे. त्याला सोमपान अतिशय प्रिय आहे. त्यामुळें त्याच्या अंगांत वीरश्रीचा संचार होतो. सोमपानासाठीं आणि युद्धांत साहाय्य देण्यासाठीं इंद्राला नेहमीं बोलाविलें जातें. पर्जन्यवृष्टीचा उत्पादक इंद्र आहे. पर्जन्याकरितां त्याची प्रार्थना केलेली आहे. इंद्राच्या कार्याची बरीचशी कल्पना मागें दिलेल्या इंद्रसूक्ताच्या भाषांतरावरून येईल, तेव्हां त्याचा विस्तार करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

अग्नि

इंद्रसूक्तांच्या खालोखाल अग्निसूक्तांची संख्या आहे. अग्नि या देवतेचें स्वरूप स्पष्टच आहे. गृह्य आणि याज्ञिय अशा दोन्ही अग्नींचा अग्निदेवतेंत समावेश होतो. अग्नि हा देवांचा पुरोहित आहे. यज्ञामध्यें देवांना आणण्याचें काम त्याचें आहे. निरनिराळ्या देवतांना उद्देशून दिलेले हवि त्या त्या देवतांकडे पोंचविणें हें त्याचें प्रमुख कार्य आहे. इंद्र हा योध्यांचा देव आहे तर अग्नि हा कुटुंबवत्सल मनुष्याचा देव आहे. तो त्याच्या बायका-मुलांचें संरक्षण करतो व कुटुंबाचा उत्कर्ष करतो. तो मर्त्यांचा साहाय्यक आहे. अंगिरस्, हव्यवाहन, दमूनाः, गृहपति अशीं त्याचीं दुसरीं नांवें आहेत. 'पहिला अतिथि' असेंहि त्याला म्हटलें जातें. गृहसंबंधीं कोणत्याहि संस्कारा-मध्यें अग्नीची पूजा आणि स्तुति असते. सर्व बाबतींत त्याचा आशीर्वाद मागितला जातो. पुराणकथांची उत्पत्ति आणि काव्य यांचें भिन्नत्व निदान अग्निसूक्तांच्या बाबतींत तरी मानतां येणार नाहीं. घृतादि हविर्द्रव्यें अग्नींत टाकलीं गेल्यामुळें याज्ञिय अग्नीच्या प्रचंड ज्वाळा होत असत आणि अशा वेळीं अग्नीची ज्वालारूपी शिंगामुळें वृषभाशीं, जोरानें उसळणाऱ्या व आवाज करणाऱ्या ज्वाळांमुळें अश्वाशीं आणि ज्वाळांच्या गतिमत्त्वामुळें गरुडपक्ष्याशीं तुलना केलेली आहे. अशा प्रकारच्या आलंकारिक वर्णनामुळें आणि ऋषींच्या गूढ भाषेमुळें अग्निकथांची उत्पत्ति झालेली आहे.

वरुण

वरुणाचें अधिकारक्षेत्र मोठें आहे. द्यावापृथिवी वरुणाच्या सामर्थ्या-मुळें स्थिर राहातात. सूर्याला आधार त्यानेंच दिलेला आहे. व त्याचा मार्गहि आंखून दिलेला आहे. त्याच्या राज्यांत पक्ष्यांना, वायूला किंवा चंचल पाण्यालाहि प्रवेश नाहीं. चंद्र आणि असंख्य तारे आपापल्या मार्गानें जात असतात ते वरु-णाच्या आज्ञेमुळेंच. तो दीर्घायुष्य देतो. दुःखापासून, चुकीपासून आणि पापां-पासून तोच मुक्त करतो. सूर्य आणि तारे हे त्याचे नेत्र आहेत. तो उच्चतम प्रदेशांतील आपल्या सुवर्णसिंहासनावर बसतो आणि पृथ्वीवर घडणाऱ्या सर्व गोष्टी पहातो. मनुष्यांच्या अंतःकरणांतील विचारसुद्धां त्याच्या दृष्टींतून सुटत नाहींत. जगांतील नीतिमत्तेचा तो सूत्रधार आहे. दोषांचें निरीक्षण करणारी, सत्यपालक, जगदुत्पादयित्री अशा एकाकी वरुणदेवतेची कल्पना ऋग्वेदां-

तील इतर कोणत्याहि निसर्गनिर्मित देवकल्पनेहून एकेश्वरी मताला जास्त जवळ आहे.

वरुण आणि अहुरमज्द

दृश्यमान आकाशाला व्यापून रहाणारी अदृश्यमान शक्ति असें वरुणाचें वर्णन ऋग्वेदीय ऋषींनीं केलें आहे. वरुण ही सर्व व्यापक देवता आर्क्टिक प्रदेशांतील आहे असें लो. टिळकांनीं दाखविलें आहे. पृथ्वीभोंवतीं फिरणाऱ्या जलप्रवाहांचा आणि सूर्यप्रकाशाचा तो चालक आहे. खालचा समुद्र किंवा पाताळ हें त्याचें मुख किंवा राज्य आहे. आर्य पंजाबांत आले तेव्हां त्यांच्या मध्यें वरुणदेवता होती. पारशी लोकांनीं ती आपल्याबरोबर नेली. तेथें 'अहुरमज्द' असें नांव तिला प्राप्त झालें. अहुरमज्द आणि वरुण यांच्या मध्यें अप्रत्यक्ष कां होईना पण अतिशय साम्य आहे. 'अहुरमज्द' यांतील 'अहुर' हें 'असुर' शब्दाचें रूप आहे. आणि वरुणाला 'असुर' हें विशेषण अनेकदां लावलेलें आहे. वरुण हा आदित्यांचा मुख्य आहे. आदित्यांचें पारशी धर्मांतील 'अमेश स्पेन्त'शीं साम्य आहे. 'अहुरमज्द' हा त्या सर्वांत श्रेष्ठ आहे. ऋग्वेदांत मित्र आणि वरुण यांचें फार सख्य आहे. 'मित्रावरुणौ' या जोडदेवतेचीं सूक्तें ऋग्वेदांत अनेक आहेत. पारशी धर्मांतहि 'मिथ्र'ची गणना 'अमेश स्पेन्त' मध्यें केली नसली तरी 'अहुर' आणि 'मिथ्र' यांचें सख्य आहे. प्रो. स्पीगेल, डॉ. विंडिश्मान इत्यादिकांच्या मतें वरुण आणि अहुरमज्द यांत कोणतेंहि साम्य नाहीं. वरुण आणि ग्रीक ( Ouranos ) यांच्यांत सर्व बाबतींत साम्य नाहीं. एकंदरींत वरुण ही मूळ आर्क्टिक आणि इंडो-इराणी देवता आहे. ऋग्वेदांत वरुण ही समुद्रदेवता आहे असें सामान्यतः जरी म्हटलें नसलें तरी कांहीं मंत्रांत पृथ्वीवरील आणि अंतरिक्षांतील जलतत्त्वाशीं त्याचा अशा रीतीनें संबंध जोडला आहे कीं, त्यामुळें ऋग्वेदोत्तरकालीन वाङ्मयांत त्याला जलदेवतात्व प्राप्त झालें. वरुणाला जलदेवतेचें स्वरूप कसें प्राप्त झालें हें प्रो. रोथ पुढीलप्रमाणें सांगतातः—

वरुणाचें जलदेवतेंत रूपांतर कसें झालें ?

'ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांत या रूपांतराचीं अगर विकासाचीं बीजें आहेत. ज्याप्रमाणें अग्नीचा पृथ्वीशीं संबंध आहे, वायु आणि वादळ यांचा अनुक्रमें आकाश ( Heaven ) आणि अंतरिक्ष ( Atmosphere ) यांशीं

संबंध आहे, त्याप्रमाणें वरुणाचा एके ठिकाणीं समुद्रजलाशीं संबंध दाखविलेला आहे. ऋ. ७.८७.६ यांत असें म्हटलें आहे कीं तो समुद्रांत बुडतो. ऋ. ८.९२.१२ यांत म्हटलें आहे कीं नद्या वरुणाला येऊन मिळतात. आतां एका पक्षीं वरुणाचें सर्वव्यापकत्व स्थापित झालें होतें व दुसऱ्या पक्षीं नद्या पृथ्वीच्या अंतापर्यंत वाहतात आणि समुद्राला मिळतात अशी कल्पना बांधली गेली, तेव्हां यावरून पृथ्वीला व्यापणारा असा एक समुद्र आहे अशी नवी कल्पना केली गेली. अशा रीतीनें समुद्र आणि अनंत आकाश यांच्या कल्पनांचें ऐक्य झाल्यामुळें पुढील काळांत वरुणाला जळदेवतात्व प्राप्त झालें.'*

ऋग्वेदांत अंतरिक्ष आणि जल यांचा संबंध उल्लेखित आहे हें आपण मागें पाहिलेंच आहे; अंतरिक्षांतून जलप्रवाह सूर्यगतीच्या दिशेनें आणि सूर्य-गतीला समांतर असे वाहतात अशी आर्यांची कल्पना होती.

'वरुण' शब्द ऑस्ट्रो-एशियाटिक नाहीं.

'वरुण हा शब्द ऑस्ट्रो-एशियाटिक आहे असें प्रो. पृझिलुस्की सिद्ध करूं पहातात. ( JRAS 1933 ) समुद्र या अर्थी 'भरु' असा एक शब्द उत्तरकालीन संस्कृतांत आहे व त्याचा उपयोग क्वचित् केलेला आढळतो; 'मरु' या संस्कृत आणि पाली शब्दाचा अर्थ वाळवंट असा आहे; या दोन शब्दांपासून वरुण शब्द निष्पन्न झाला असें त्यांनीं म्हटलें आहे. कारण ऑस्ट्रो-एशियाटिक भाषांपैकीं मलाई भाषेमध्यें 'बरोह' या शब्दाचा समुद्र, समुद्रकिनारा, उथळ जमीन असा अर्थ आहे. या शब्दाशीं 'मरु' आणि 'भरु' या शब्दांचें साम्य आहे; 'मर्यादा' हा संस्कृत शब्दहि 'मरु' या शब्दाशीं संबद्ध आहे असें त्यांचें म्हणणें आहे; परंतु तें सिद्ध होऊं शकत नाहीं 'मर्यादा' हा शब्द लॅटिन Mare व इतर इंडो-यूरोपियन शब्द यांच्या वर्गांत सामान्यत: समाविष्ट केला जातो. वरुण ही ऑस्ट्रो-एशियाटिक जलदेवता होती असें सिद्ध करण्यास यत्किंचित्हि पुरावा नाहीं.'†

ऋग्वेदांत मित्राचें स्वतंत्र असें एकच ( ऋ. ३.५९ ) सूक्त आहे.

---

* ZDMG VI 73 referred to by Muir OST. Vol. V. 75.

† Dr. A. B. Keith-Indian Historical Quarterly, June 1933.

मित्र

'मित्रावरुणौ' या जोडदेवतेचीं सूक्तें अनेक आहेत. मित्र ही इंडो-इराणी देवता आहे. ती दिवसाची देवता आहे असें प्राचीन भाष्यकारांचें मत आहे. पण अर्वाचीन विद्वानांना तें मान्य नसून त्यांच्या मतें मित्र म्हणजे कृपाळु सूर्य होय. मित्र हें नांव लोकांशीं असलेला त्याचा स्नेहसंबंध दाखवितें. आदित्य हें त्याचें दुसरें नांव आहे. मित्र लोकांचें निरीक्षण करीत असतो, त्यांना कार्यप्रवृत्त करीत असतो. द्यावापृथिवींना धारण करणारा तोच आहे. त्यानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें वागणाराला विपुल संपत्ति मिळते. त्यानें रक्षिलेल्याला कधीं दुःख होत नाहीं. त्याचा महिमा द्यावापृथिवीहून मोठा आहे. उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत दिवसां दिसणारा सूर्य म्हणजे मित्र होय असें लो. टिळकांनीं आपलें मत मांडलें आहे.

सूर्य, सविता, विष्णु, पूषन्, या सर्व सूर्यदेवता आहेत. उदय पावणारा

सूर्य

प्रत्यक्ष सूर्य हें सूर्यदेवतेचें स्वरूप होय. 'हिरण्मय' हें सूर्याचें मुख्य विशेषण आहे. सूर्याच्या तेजस्वी स्वरूपाचें वर्णन आलंकारिक रीतीनें केलेलें आढळतें. सूर्याचें सामर्थ्य प्रत्यक्षच आहे. तो जागृति उत्पन्न करतो. देवांना आणि मर्त्यांना सर्व चांगल्या गोष्टी तो देतो. जीवन देणारा तोच आहे. संततीकरितां त्याची प्रार्थना केली आहे. आपल्या एक अगर अनेक अश्वयुक्त रथांत बसून अंतरिक्षांतून मार्ग चालत असतां खालीं चाललेल्या सर्व गोष्टी तो पहातो.

सूर्याचें स्वरूप दृश्य आणि जड आहे तर सवित्याचें स्वरूप सूक्ष्म आणि

सविता

आध्यात्मिक आहे. सविता ही सूर्याची प्रेरक शक्ति आहे. सूर्याच्या आणि सवित्याच्या वर्णनामध्यें पुष्कळ साम्य आहे. उगवणारा आणि मावळणारा असें दोन्ही प्रकारचें सवित्याचें स्वरूप आहे. थोडयाशा आध्यात्मिक स्वरूपामुळें सवित्याला सूर्याहून भिन्नत्व प्राप्त झालेलें आहे. ऋ. ३.६२.१० म्हणजे सवितृदेवतेला उद्देशून असलेला प्रसिद्ध गायत्रीमंत्र होय. पुष्कळशीं सवितृसूक्तें प्रातःकालच्या किंवा सायंकाळच्या यज्ञाकरितां रचल्यासारखीं दिसतात. तथापि कांहीं सूक्तांतून सौंदर्यपूर्ण मंत्र आढळतात. ऋ. १.३५ हें सूक्त या दृष्टीनें पहाण्यासारखें आहे. भग या सूर्यदेवतेला निराळें अस्तित्व आहे व तिच्याकरितां एक

सूक्त ( ऋ. ७.४१ ) आहे. तथापि मूलतः भग हें सवित्याचें दुसरें नांव आहे. भग हा आदित्यांपैकीं ( अदितिपुत्रांपैकीं ) एक आहे आणि एवढ्याकरितां ती सूर्यदेवता आहे असें म्हटलें आहे.

पूषन्

पूषन् ( पोषण करणारा ) या देवतेमध्यें सूर्यपूजेचें प्राचीन स्वरूप दिसून येतें. सूर्याच्या इतर नांवांमध्यें समाजाच्या प्राथमिक अवस्थेचे—पशुपालनवृत्तीचे—अवशेष दिसत नाहींत. पूषन्चें स्वरूप पशुपालन, युद्ध-प्रियता आणि पौरोहित्य या तिन्ही गुणांनीं युक्त असें आहे पूषन् ही पशुपालांची देवता आहे असें नेहमीं म्हणण्यांत येतें. परंतु तें तिचें एक अंग आहे. पूषन्च्या केसांची वेणी घातलेली आहे, तो पशूंचा रक्षक आहे, या दोन बाबतींत त्याचें रुद्राशीं साम्य आहे. त्याचा चेहरा भयंकर आहे. केव्हां केव्हां तो तेजस्वी दिसतो तर केव्हां केव्हां अंधकारमय असतो. त्याच्या हातांत सोन्याची कुऱ्हाड अगर तरवार असते. भारद्वाज कुलाचा ( ऋग्वेदाचें सहावें मंडल ) तो फार आवडता दिसतो या कुलाची ती प्रिय युद्धदेवता आहे. इंद्र आणि मरुत् यांच्याबरोबर त्याला नेहमीं बोलावलें जातें. हरवलेलीं जनावरें तो शोधून देतो आणि चुकलेल्यांना रस्ता दाखवितो.

विष्णु

विष्णु हीहि सूर्यदेवता आहे. ऋग्वेदांत विष्णूला फारसें महत्त्व असलेलें दिसत नाहीं. त्याच्या माहात्म्याची ऋग्वेदांत केवळ प्रभात झालेली आहे. त्याचीं सूक्तें थोडीं आहेत. विष्णु आपल्या तीन पावलांनीं आकाश आक्रमितो, हा त्याचा विशेष आहे. विष्णूचीं तीन पदें कोणतीं याबद्दल यास्ककालीं सुद्धां मतभेद होते. शाकपूणीच्या मतें पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्यौ हीं व और्णवाभाच्या मतें उदयाचल ( समारोहण ), आकाशमध्य ( विष्णुपद ), आणि अस्ताचल ( गयाशिरस् ) हीं तीं तीन पदें होत, असें यास्काचार्य म्हणतात. बहुतेक अर्वाचीन ग्रंथकारांचें मत और्णवाभाच्या विवरणाला अनुकूल आहे. पण लो० टिळकांच्या मतें विष्णु ही आर्क्टिक देवता आहे. विष्णु गोल चक्राप्रमाणें फिरतो, त्याच्या रथाला नव्वद घोडे आहेत व त्यांना चार नांवें आहेत ( ऋ. १.१५५.६ ). यांत नव्वद दिवसांचा एक अशा चार ऋतूंचें मिळून झालेलें वर्ष अभिप्रेत दिसतें. यावरून सूर्याची वार्षिक गति हा विष्णूच्या पराक्रमाचा पाया दिसतो.

इंद्रवृत्रयुद्धामध्यें तो इंद्राचा साहाय्यक आहे. विष्णूचीं दोन पावलें दिसतात, तिसरें दिसत नाहीं. पक्षी तेथें पोहोचूं शकत नाहींत ( ऋ. १.१५५. ५ ) याचें विवरण उदय, मध्य आणि अस्त हीं तीन पावलें होत या उपपत्तीनें होत नाहीं. वर्षाच्या तीन भागांपैकीं दोन भाग सूर्य क्षितिजावर होता व तिसऱ्या भागांत तो क्षितिजाखालीं गेल्यामुळें अदृश्य होता. म्हणून तिसरें पाऊल मानवदर्शनातीत होतें. तिसऱ्या पावलांत तो अंधकारव्याप्त असल्यामुळें ‘ शिपिविष्ट ’ असें जें नांव त्याला मिळालें आहे तें योग्यच आहे. ( ऋ. ७.१००.६ ). अशा रीतीनें लो० टिळकांनीं विष्णूचें आर्क्टिक मूळ सिद्ध केलें आहे.

अश्विनौ

अश्विनौचीं सूक्तें ऋग्वेदांत बरींच आहेत. अश्विनौचें ग्रीक देवता ‘ Dioskouroi ’ शीं साम्य आहे. जर्मन व लेटिश वाङ्मयांतहि अश्विनौशीं सम देवता आढळतात. अश्विनौचें मूळ स्वरूप काय होतें याविषयीं यास्ककालींसुद्धां निश्चित ज्ञान नव्हतें. द्यावापृथिवी, दिवस आणि रात्र, चंद्रसूर्य, दोन ऐतिहासिक राजे अशीं भिन्न मतें प्राचीन टीकाकारांकडून प्रदर्शित करण्यांत आलीं आहेत. अर्वाचीन संशोधकांनीं दोन संधिप्रकाश, बुध आणि शुक्र हे तारे, मिथुनराशींतील दोन तारे हीं नवीन स्वरूपें मांडलीं आहेत. परंतु यांपैकीं कोणत्याहि उपपत्तीनें अश्विनौनीं साहाय्य केलेल्या आश्रितांचें त्यांच्या संकटकालाचें आणि स्थलाचें निर्दोष स्पष्टीकरण होऊं शकत नाहीं. तसेंच अश्विनौनीं त्या पीडितांची अंधकारापासून मुक्तता केली असें कां वर्णन केलें आहे हेंहि स्पष्ट होत नाहीं; असें लो० टिळकांनीं दाखवून दिलें आहे आणि आर्क्टिक उपपत्तीच्या योगानें रेभ, भुज्यु, दीर्घतमस्, अत्रि सप्तवध्रि, ऋज्राश्व ( Helios च्या ग्रीक कथेसह ) इत्यादि कथांचा बरोबर उलगडा करून अश्विनौ म्हणजे उत्तरध्रुवाच्या प्रदेशांत पाताळांत गेलेल्या सूर्याला वर आणणारे उषःकालापूर्वीचे अग्रदूत होत असें मोठ्या कल्पकतेनें सिद्ध केलें आहे. अश्विनौ हे द्यौचे पुत्र आणि उषेचे पति आहेत. कधीं कधीं त्यांना तिचे बंधु किंवा पुत्रहि म्हटलें आहे. हे द्युलोकाचे वैद्य आहेत. मनुष्यांच्याकरितां ते औषधें आणतात आणि संकटग्रस्तांना साहाय्य करतात. ते अंधांना दृष्टि देतात, पंगूंना पाय देतात. अश्विनौचें वर्णन तेजस्वी रीतीनें केलेलें आहे. पक्ष्यांनीं ओढला जाणारा त्यांचा रथ व त्याचीं सर्व उपांगें सोन्याचीं आहेत.

ते तरुण, सुंदर आणि विचाराइतके चपल आहेत. सकाळीं, दुपारीं आणि सायंकाळीं ते यज्ञस्थानीं येतात. त्यांनीं रथ जोडला म्हणजे उषेचा उदय होतो. अश्विनौचें एक सूक्त भाषांतररूपानें मागें आलेंच आहे.

मरुत्

मरुतांची संख्या प्रथम सात होती, नंतर ती एकवीस झाली पुढें अनेक वेळां ही संख्या निरनिराळी सांगितली आहे. केव्हां केव्हां ती एकशेंऐंशींपर्यंत गेलेली आहे. रुद्र हा मरुतांचा पिता आहे आणि पृश्नि ही त्यांची माता आहे. इंद्राला साहाय्य करणें, युद्धांत सदोदित त्याच्या मागोमाग असणें हें त्यांचें प्रमुख कार्य आहे. ते स्वच्छ, सूर्यासारखे तेजस्वी आहेत. ते द्यौचे सेवक आहेत. सोन्याच्या चकाकणाऱ्या अलंकारांनीं ते आपलीं अंगें सुशोभित करतात. त्यांच्या डोक्यावर सोन्याचें शिरस्त्राण असतें, छातीवर सोन्याचें चिलखत असतें आणि हातांत लकाकणारे बाण व तरवारी असतात. ते हरिणांप्रमाणें सुंदर आहेत. ते वीराप्रमाणें लढाईंत घुसतात. त्यांची गर्जना सिंहासारखी आहे पर्वत त्यांच्यापुढें नमतात. चाकांतील आऱ्यांप्रमाणें एकत्र राहून ते पराक्रम करतात. ते रानटी अस्वलासारखे आहेत आणि त्यांचे पंजे धातूचे आहेत. पक्ष्याप्रमाणें ते आपले पंख पसरतात. उड्डाण करण्यांत ते परस्परांची स्पर्धा करतात. आकाशाच्या छतांतून ते पर्जन्यवृष्टि करतात. उत्कृष्ट योद्धे आणि चांगले घोडे यांची ते आपल्या भक्तांवर खैरात करतात. मरुत् हो वादळाची देवता ( Storm God ) आहे, असें सामान्यतः समजण्यांत येतें; परंतु मरुतांचें सर्व वर्णन या स्वरूपाशीं जुळत नाहीं.

सोम

संपूर्ण नववें मंडळ सोमासंबंधीं आहे. मूलतः सोम म्हणजे जीपासून सोमरस पिळून काढीत असत ती वनस्पति होय. उत्तरकालीन वाङ्मयांत आढळणारा सोम शब्दाचा चंद्र हा अर्थ ऋग्वेदांतहि आहे. याच प्रकरणांत मागें लिहिल्याप्रमाणें नवम मंडल हें सोमयागांत विनियोग करण्याकरितांच रचलें आहे व त्यामुळें सोमयागांतील सोमाच्या उपयोजनासंबंधींच्या निरनिराळ्या कृतींचें, उ. पर्वतांतून सोम आणणें, तो पिळणें, लोंकरीच्या वस्त्रांतून गाळणें, भांड्यांतून ओतणें, दुधांत मिसळणें, इंद्राला सोमपानार्थ बोलावणें, सोमाची आणि इंद्राची स्तुति इत्यादींचें लांबलचक आणि कंटाळवाणें वर्णन सर्व सोमसूक्तांतून केलेलें आहे. तरी सुद्धां क्वचित् ठिकाणीं सुंदर उपमा येऊन जाते.

उषस् देवतेच्या स्वरूपासंबंधीं वाद असण्याचें कारण नाहीं. परंतु ती कोणत्या प्रदेशांतील आहे याबद्दल वाद आहे. ही उषा पंजाबांतील आहे असें बहुतेक ग्रंथकारांचें मत आहे. परंतु उषादेवीचें जें संपूर्ण वर्णन ऋग्वेदांत आलें आहे तें यामुळें उत्पन्न होत नाहीं. उषा ही देवता मूळ आर्क्टिक प्रदेशांतील आहे असें लो. टिळकांनीं सिद्ध केलें आहे आणि हें मान्य करणें कोणालाहि प्राप्त आहे. यासंबंधींचें विवरण पहिल्या विभागांत आलेलेंच आहे. उषेचीं कांहीं सूक्तें पंजाबांत आल्यानंतर रचलीं गेलीं असतील असें शक्य आहे, परंतु उषादेवता मूळ उत्तरध्रुवप्रदेशांतील आहे हें मान्य करावयास पाहिजे. उषादेवतेचें कार्य असें विशेष नाहीं. तिच्या सूक्तांचें महत्त्व सुंदर भाषेंत आहे. उठावदार आणि आलंकारिक वर्णनानें उषासूक्तें सजलेलीं आहेत. उषा ही रथांत बसून येते. ती सूर्याला आणते. ती लोकांना जागें करून कार्यप्रवृत्त करते; पृथ्वीला प्रकाश देऊन अंधकाराचा नाश करते व लोकांना आपापल्या उद्योगांना जाण्याकरितां प्रकाशानें रस्ते स्पष्ट करते. ती 'द्यौ' ची मुलगी आणि रात्रीची भगिनी आहे. अश्विनौ हे तिचे पति आहेत. केव्हां केव्हां अग्नि हाहि तिचा पति आहे असें म्हटलें आहे. कारण उषा उदित झाल्याबरोबर गृह्य आणि यज्ञिय कार्याकरितां अग्नि प्रदीप्त केला जातो. मागें दिलेल्या उषासूक्तावरून उषेच्या इतर सूक्तांच्या काव्यपूर्णत्वाची कल्पना येण्यासारखी आहे.

उषस्

द्यौ आणि पृथिवी ( द्यावापृथिवी ) या अत्यंत प्राचीन देवता आहेत. ग्रीकांच्या प्रमुख देवतेशीं ( Zeus ) असलेल्या साम्यावरून साधारण अशी कल्पना होते कीं, हिंदु देवतासमूहांत द्यौला बरेंच महत्त्व असेल. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. केवळ द्यौ या देवतेचें स्वतंत्र असें एकहि सूक्त नाहीं; एवढेंच नव्हे, तर द्यावापृथिवींच्या थोड्याशा सूक्तांत द्यौचें विशेष महत्त्वहि वर्णिलेलें नाहीं. द्यौ हा शब्द शेंकडों वेळां उपयोगांत आणलेला आहे. परंतु त्याला केवळ आकाश हा अर्थ आहे. त्याला सचेतन देवतास्वरूप प्राप्त झालेलें नाहीं. जसें पृथ्वीला देवांचें मातृपद मिळालें आहे तसें द्यौला देवांचें विशेषतः इंद्र, अश्विनौ आणि उषस् यांचें पितृपद मिळालेलें आहे. याहून उच्च प्रकारचें स्थान ह्या दोहोंनाहि मिळालें नाहीं. त्यांच्या स्तुतीमध्यें अतिशयोक्त वर्णन मुळींच नाहीं. त्यांचीं म्हणून कांहीं कार्यें सांगितलीं आहेत, परंतु तीं

द्यावापृथिवी

मूळ निराळ्याच देवतांचीं असून नंतर यांच्याकडे सोंपविलीं आहेत. यज्ञाला देवांकडे पोंचविण्याचें अग्नीचें काम द्यावापृथिवींना सांगितलें आहे (ऋ. २. ४१.२० ). एका सूक्तामध्यें (ऋ. ६.७०.१ ) द्यावापृथिवी वरुणाच्या नियमानुसार चालतात असें म्हटलें आहे. द्यावापृथिवींची स्तुति संदिग्ध आहे आणि नेहमींप्रमाणें संपत्तीची आणि पुत्रपौत्रांच्या रक्षणाची याचना त्यांजपाशीं केली आहे. द्यावापृथिवींचीं बहुतेक सूक्तें स्पष्टपणें याज्ञिय विनियोगाच्या हेतूनें लिहिलेलीं आहेत ( ऋ. १.१५९.१, ४.५६.७, ६.७०, ७.५३.१ ). ऋ. ५.८४ हें एकच केवळ पृथ्वीदेवतेचें स्वतंत्र असें तीन ऋचांचें सूक्त आहे. देवताद्वंद्वाची स्तुति आणि पूजा करणें हा हिंदुधर्मशास्त्राचा एक विशेष आहे. उ. द्यावापृथिवी, मित्रावरुणौ, इंद्राग्नी, अग्नीषोमौ, इ.

अदिति

प्रो. रोथ आणि बोथ्लिंक * यांच्या मतानुसार अदिति म्हणजे आकाशाचा विस्तार होय. अदिति म्हणजे अनंत विस्तीर्ण पृथिवी होय असें दुसरें एक मत आहे. तर्कबुद्धीनें शोधलेलें नव्हे, तर डोळ्यांना दिसणाऱ्या अनंतत्वाची कल्पना देणारें पहिलें नांव म्हणजे अदिति होय असें प्रो. मॅक्समुल्लर म्हणतात. डॉ. मूर यांच्या मतें अदिति म्हणजे सृष्टीचें सर्वात्मकत्व ( Universal Nature ) होय. परंतु यांपैकीं कोणतेंहि स्वरूप खरें मानतां येत नाहीं अदिति म्हणजे आकाश असा अर्थ करतां येत नाहीं. कारण ऋ. १०. ६५.९ मध्यें पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्यौ या तिन्ही लोकांतील देवतांबरोबर आदित्यांचें आणि अदितीचें आवाहन केलें आहे. अदिति म्हणजे पृथ्वीहि म्हणतां येत नाहीं. त्या दोन्हींचा एकत्र उल्लेख एके ठिकाणीं आला आहे. नागपूरचे पं. कृष्णशास्त्री घुले यांनीं दिलेलें अदितीचें खालील स्पष्टीकरण बरोबर दिसतें. ( 'गंगा' मासिक—वेदांक, १९३२ ). अदितीवरून दितीची कल्पना निघालेली आहे. अदितीचा उल्लेख ऋग्वेदांत ऐशीं वेळां आलेला आहे. दिति फक्त तीन वेळां उल्लेखलेली आहे. अदितीचें स्वरूप ठरविण्यास ऋ. १.२४.१ हा मंत्र उपयोगीं पडतो.

**कस्य नूनं कतमस्यामृतानां मनामहे चारु देवस्य नाम ।**
**को नो मह्या अदितये पुनर्दात्पितरं च दृशेयं मातरं च ॥**

---

* St. Petersberg Lexicon

बलि द्यावयास काढलेला शुनःशेप (शुनःशेपकथा–ऐ. ब्रा. ७.१३–१८) म्हणतो, ' कोणत्या अमर देवाच्या नांवाचें आम्हीं चिंतन करावें ? मला माझे मातापितर ( द्यावापृथिवी ) दिसावेत म्हणून कोण मला अदितीकडे नेऊन पोंचवील? ' ज्याला त्याचा प्रत्यक्ष पिता अजीगर्त मारावयास तयार झाला तो शुनःशेप मानवी मातापित्यांच्या भेटीस उत्सुक होणार नाहीं. म्हणजे द्यावापृथिवीरूपी मातापित्यांना पाहूं इच्छिणारी व्यक्ति त्या दोहोंहून भिन्न स्थानीं असली पाहिजे, अर्थात् शुनःशेप हा मनुष्य नव्हे. लो. टिळकांनीं म्हटल्याप्रमाणें शुनःशेप हा आर्क्टिक प्रदेशांत पाताळांत गेलेला सूर्य होय. प्रदीर्घ रात्रीनंतर सूर्य अदितीकडे उत्तरखगोलार्धाकडे जाऊं इच्छितो. या ठिकाणीं सूर्य बरोबर क्षितिजावर येतो. म्हणजे तो या वेळीं पृथ्वीच्या खालींहि असत नाहीं व वरतींहि असत नाहीं. तेथून तो द्यावापृथिवींना पाहूं शकतो. तेथून तो वर आला म्हणजे द्युलोकांत येतो. अशा रीतीनें उगवलेला सूर्य द्युलोक आणि पृथ्वी या दोहोंना पाहूं शकतो. आतां जिला भेटल्याबरोबर सूर्य द्यावापृथिवींना पाहूं शकतो ती अदिति कोण असावी ? अर्थात् उत्तरखगोलार्ध हें उत्तर येतें. अदितीच्या विरुद्ध म्हणून दिति निर्माण करण्यांत आली. निर्ऋति–अधोलोक–हें दितीचें पहिलें नांव होतें.

अदिति ही सात आदित्यांची माता आहे. वरुण हा आदित्यांमध्यें श्रेष्ठतम होय. बाकीचे आदित्य या निरनिराळ्या सूर्यदेवता होत. मित्र, अर्यमन्, सवितृ, भग, सूर्य आणि इंद्र हे बाकीचे आदित्य होत. दक्ष आणि अंश यांचीहि आदित्यांत गणना केलेली आहे. अदिति ही पापांची क्षमा करते आणि मानवजातीचें रक्षण करते.

**पर्जन्य**

प्रत्यक्ष पाऊस पाडणारी देवता म्हणजे पर्जन्य होय. वरुण, इंद्र, अग्नि, बृहस्पति या देवतांचा पर्जन्यांशीं संबंध आहे. पर्जन्याकरितां इंद्राची प्रार्थना केली आहे. अग्नि आणि बृहस्पति यांचा पर्जन्याशीं यज्ञद्वारां संबंध आहे. पर्जन्यवृष्टि आणण्याचें सामर्थ्य असणारे मंत्र बृहस्पति ब्राह्मणांना देतो. अग्नीला यज्ञांत आहुति दिल्या असतां तो पर्जन्याचा वर्षाव करतो. परंतु प्रत्यक्ष पाऊस पाडणारी देवता म्हणजे पर्जन्य होय. केव्हांकेव्हां वात आणि पर्जन्य यांचें एकत्र स्तवन आणि वर्णन केलेलें आहे ( पर्जन्यवाता ). पर्जन्य हा आकाशाचा पुत्र आहे. गवताचीं कुरणें, धान्यें आणि फळें मिळण्याकरितां

त्याची प्रार्थना केली आहे. तो पशूंचा देव आहे; त्यानें अन्न द्यावें म्हणून त्याला हवि अर्पण केला जातो. गर्जना करीत तो पाऊस पाडतो आणि वनस्पतींमध्यें बीज पेरतो. मोठमोठे वृक्ष तो मोडून टाकतो. त्याच्या प्रचंड प्रभावास मानवगण आणि राक्षसगण भितात. पर्जन्यसूक्तांत प्रत्यक्ष वृष्टीचें नैसर्गिक वर्णन स्वभावोक्तिपूर्ण केलेलें आहे. ऋ ५.८३ हें पर्जन्यसूक्त उत्कृष्ट आहे. पर्जन्य आणि वात यांचीं स्वरूपें स्पष्टच आहेत. त्यांच्या सूक्तांचें महत्त्व केवळ वर्णनांत आहे.

यम

पहिला मृत मनुष्य अशी यमदेवतेची मूळ कल्पना आहे. यम हा विवस्वानाचा मुलगा आहे. अवेस्त्यांतील 'यिम'हि 'विवंव्हत्' चा पुत्र आहे. ऋग्वेदांत यमाला 'राजा' म्हटलें आहे ( ऋ. १०.१४.१ ). वेदोत्तरकालीन वाङ्मयांत त्याला पूर्णपणें देवतात्व प्राप्त झालेलें आहे. ऋग्वेदांत त्याच्या देवत्वप्राप्तीचा आरंभ झाला आहे. मित्र, द्यौ इत्यादि ऋग्वेदांतील देवता वेदोत्तरकालीन वाङ्मयांत नष्ट झाल्या, परंतु मृतांचा राजा म्हणून यम अद्यापि अस्तित्वांत आहे. कोणत्याहि निसर्गनिर्मित देवतेहून यम हा निराळा आहे अशी ऋग्वेदकालीन आर्यांची कल्पना होती ( ऋ. १०.६४.३, ९२.११ ). पहिला मृत मनुष्य जो यम तो आकाशांत रहातो; मृतवीर त्याच्या स्थानामध्यें एकत्र जमतात ( ऋ. १.३५.६, १०.१४.७ ). प्राचीन काळीं मेलेल्या पितरांची तो काळजी घेतो आणि एका सुंदर वृक्षाखालीं देवांसह सोम पीत बसतो ( ऋ. १०.१३५.१ ). मृत मनुष्यें सूर्यामध्यें प्रवेश करीत व यम त्या ठिकाणीं त्यांचा स्वीकार करीत असे अशी सामान्य कल्पना असावी असें ऋ. १.१०५.९, १०.१५४.४,५ या मंत्रांवरून प्रो. हॉपकिन्स म्हणतात* परंतु यम ही आर्क्टिक प्रदेशांतील देवता आहे व त्याचें गृह म्हणजे अधोलोक होय असें लो. टिळकांनीं दाखविलें आहे. ¶

यमाचें कार्य

यम हा आकाशांतील आपल्या जागेवरच बसून रहात नाहीं. इतर देवांप्रमाणें तो यज्ञाला येतो. आंगिरस आणि पितर यांच्याबरोबर हवि सेवन करण्याकरितां त्याला बोलाविलें जातें ( ऋ. १०.१४. ३, ४; १५.८ ). प्रेत भक्षण करतो म्हणून

* Religions of India p. 129.

¶ Arctic Home in the Vedas—Vedic Myths.

किंवा यज्ञांत त्याचें फार महत्त्व आहे म्हणून अग्नि हा यमाचा प्रियमित्र आहे. ( ऋ. १०.२१.५ ). त्याचा पुरोहितहि आहे ( ऋ. १०.५२.३ ). यमाचा आणि मृत्यूचा फार मोठा संबंध आहे. मृत्यु हा यमाचा मार्ग आहे. युद्ध हें यमाशीं होणारें भांडण आहे. यमाचा वरुणाशींहि निकट संबंध आहे. यमाचे पाश वरुणाच्या पाशांशीं समान आहेत ( ऋ. १०.९७.१६ ). यम हा पहिला मृत आहे, तेव्हां अमरत्वाचा मार्ग प्रथम दाखविणाराहि तोच आहे. यमाजवळ दोन कुत्रे आहेत; ते त्याच्या गृहाच्या मार्गावर पहारा करतात. लोकांवर लक्ष ठेवीत ते फिरत असतात. या कल्पनेचा अवशेष पारशी लोकांच्या अंत्यसंस्कारांत कसा राहिला आहे हें तिसऱ्या विभागांत आपण पाहिलेंच आहे. यमदेवतेसंबंधीं आणखी विवेचन पुढें होईलच.

ऋग्वेदांतील प्रमुख देवतांचीं स्वरूपें अशा प्रकारचीं आहेत. ऋग्वेदाच्या

**भावदेवता आणि स्त्रीदेवता**

उत्तरकालांत अमूर्त किंवा भाववाचक स्वरूपाच्या श्रद्धा, मन्यु इ. कांहीं देवता निर्माण करण्यांत आल्या. प्रचलित देवतांच्या कांहीं विशेषणानांहि देवत्व प्राप्त झालें. उ. प्रजापति. ऋग्वेदांत स्त्रीलिंगी देवता थोड्या आहेत. पुंलिंगी देवतांना प्राधान्य आहे. स्त्रीदेवता या आपल्या पतींचीं प्रतिबिंबें आहेत याला अपवाद म्हणून उषस्‌चें स्वरूप मात्र स्वतंत्र आणि महत्त्वाचें आहे. तिच्या खालोखाल पृथिवी रात्रि, सरस्वती, आपः इत्यादींचा क्रम लागेल.

## धर्मशास्त्र आणि तत्त्वज्ञान

ऋग्वेदांत संस्कार फारच थोडे आढळतात. जातकर्म आणि चूडाकर्म ( ऋ. ६.७५.१७ ) करीत असत. उपनयन करीत असत.

**संस्कार**

उपनयन हें इंडो-युरोपियन काळींहि होतें, कारण मुलगा मोठा झाल्याबरोबर त्याला उपदेश देणें ही गोष्ट सर्व इंडो-युरोपियन राष्ट्रांत त्याच्या दुसऱ्या जन्माप्रमाणें मानली जाते. * हे संस्कार पुरोहित करीत असे. त्याबद्दल त्याला दक्षिणा मिळत असे. मुख्यतः दक्षिणा म्हणून गाई दिल्या जात. त्याशिवाय घोडे, बैल इत्यादिहि देत असत. दक्षिणा म्हणून जी गाय द्यावयाची ती पुरोहिताच्या उजव्या ( दक्षिण ) बाजूस नेऊन उभी करीत. यामुळें 'दक्षिणा' हें नांव पडलें. पूर्वेकडे तोंड

---

* Macdonell—History of Sanskrit Literature.

केलें असतां दक्षिण दिशा उजव्या हाताकडे येते. म्हणून 'दक्षिण' हा शब्द उजवा हात आणि दक्षिण दिशा अशा दोन्हीं अर्थांनीं उपयोगांत येऊं लागला. ब्राह्मणांचीं मुलें उपनयनानंतर वेदाध्ययनाकरितां एकाद्या अध्यापकाकडे जात असत. वेदमंत्र लिहिले जात नसल्याकारणानें प्रत्यक्ष गुरूकडे जाऊन शिकणें प्राप्त होतें. त्याबद्दल त्यांना गुरूला मोठी दक्षिणा द्यावी लागत असे. शिक्षणाच्या दृष्टीनें ऋ. १०.७१ हें सूक्त महत्त्वाचें आहे.

नक्षत्रें, ऋतु वगैरे

ऋग्वेदकाळीं नक्षत्रज्ञान होतें. 'नक्षत्र' हा शब्द ऋग्वेदांत तारा या अर्थानें येतो. 'अर्जुनी' (फल्गुनी) व 'अघा' (मघा) हीं दोन नक्षत्रांचीं नांवें ऋ. १०.८५.१३ या मंत्रांत आढळतात. राशि माहीत नव्हत्या. यज्ञयागांचे काल ठरविण्याकरितां ज्योतिषज्ञानाचा उपयोग होत असे. सूर्यग्रहण त्यांना माहीत होतें. (ऋ. ५.४०). दक्षिणायन सुरू होतां व पाऊस पडूं लागतो हें त्यांना माहीत होतें (ऋ. ६.३२.५). प्रथम ऋतु तीनच होते (ऋ. १०.९०.६). वसंत, ग्रीष्म आणि शरद्. प्रावृष् आणि हिम किंवा हेमंत यांचाहि उल्लेख आहे. पुढें ऋतु पांच झाले (ऋ. १.१६४.१३). वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद् आणि हेमंत किंवा शिशिर. आर्यांच्या वसतिस्थानाच्या पूर्वेकडील विस्ताराबरोबर ऋतूंची संख्या वाढली असावी.एक वर्ष, बारा महिने, तीनशें साठ दिवस या कालविभागाच्या ज्ञानाचा उल्लेख आहे (ऋ. १.१६४.४४). चांद्रवर्षाचा सौरवर्षाशीं मेळ घालण्याकरितां अधिक मास धरीत असत (ऋ. १२५.८). देशमानपद्धति ऋग्वेदांत आढळते (ऋ. २.१८.५, ६); एवढेंच नव्हे तर ती इंडो-युरोपियन काळीं शोधून काढण्यांत आली होती. वैदिक ऋषींना भूगर्भशास्त्राचें ज्ञान होतें असें सिद्ध करण्याचा निष्फल प्रयत्न श्री. ना. भ. पावगी यांनीं केला आहे. (Vedic Fathers of Geology) वैदिक आर्य हे जवळजवळ विसाव्या शतकांतील लोकांइतके सुसंस्कृत होते असें मनाशीं ठाम ठरवून त्याला अनुसरून निरनिराळे सिद्धांत ठरविण्याकरितां प्रमाणें शोधून काढण्याची दृष्टि ठेवणें चुकीचें आहे. अशीं प्रमाणें एखादा सिद्धांत ठरविण्याला पूर्णपणें असमर्थ असतात. ऋग्वेदांतील मंत्रांचा कोऱ्या अंतःकरणानें स्पष्ट अर्थ लावण्याचा प्रयत्न करून त्यांत कांहीं प्रमाणें मिळालीं असतां त्यांवरून काळजीपूर्वक सिद्धांत बांधणें हाच संशोधनाचा शास्त्रीय मार्ग आहे.

देवतांना संतुष्ट करून त्यांची कृपा संपादन करण्याचे व तद्द्वारां इहपर-

देवतांची प्रार्थना

लोकीं सुख मिळविण्याचे दोन मार्ग ऋग्वेदांत आहेत. १ प्रार्थना व स्तुति, २ यज्ञ. ' मानवी जीविताचा आदि शोधीत आपण जितकें मागें जाऊं तितक्या कालापासून प्रार्थना आणि स्तुति यांचा प्रवाह आजच्या इतकाच नैसर्गिकरीतीनें वहात असल्याचा आपणांस आढळून येईल. आपणांस त्याचा आदि सांपडणार नाहीं, कारण आत्म्याचा आदि आपण शोधूं शकत नाहीं. '* प्रार्थना व स्तुति म्हणजे देवावलंबित्वाची भावना व देवांशीं असलेला नैतिक संबंध यांचीं प्रकट स्वरूपें होत. आपणांहून उच्च व भव्य असलेल्या शक्तीच्या आधाराची भावना असल्यामुळें मनुष्याला त्या शक्तीची साहाय्यार्थ प्रार्थना करण्याची आणि तसें साहाय्य मिळालें असतां त्याबद्दल उपकार मानण्याची नैसर्गिक इच्छा उत्पन्न होते. देवाशीं नैतिक संबंध असल्याची भावना असली म्हणजे स्वतःच्या पापाची जाणीव उत्पन्न होते आणि मनुष्य त्याच्यापाशीं क्षमेची याचना करतो.

यज्ञसंस्था व धार्मिक आचार

वैदिक धर्मांत यज्ञाला मोठें स्थान आहे. देवांना संतुष्ट करण्याचें आणि देव व भक्त यांच्यामध्यें परस्परस्नेहसंबंध उत्पन्न करण्याचें तें एक साधन आहे. आर्यांची देवतांच्या बाबतींत परावलंबित्वाची परंतु आशापूर्ण भावना होती. पूजा केली असतां देव हे भक्तांना कृपाप्रसाद देण्यास तयार असतात. यद्यपि कृतज्ञताबुद्धि व्यक्त करण्याकरितांहि यज्ञ केला जात असे तथापि सामान्यतः दैवी कृपा संपादन करण्याकरितां हवि अर्पण करणें हें यज्ञाचें मुख्य कार्य असे. अर्पण करावयाच्या हवींमध्यें दूध, तूप, धान्य, मांस आणि सोम यांचा अंतर्भाव होत असे. ऋग्वेदकालीन यज्ञपद्धति प्राथमिक स्वरूपाची म्हणून साधी होती. तथापि सोमयागाचा विधि बराच क्लिष्ट झाला होता आणि त्यांतील कामें कांहीं पुरोहितांमध्यें विभागून दिलेलीं होतीं. ' होता ' हा त्यांतील प्रमुख होता. तो सूक्तें म्हणत असे आणि प्राचीनतर काळीं स्वतः तयार करीत असे. अध्वर्यु प्रत्यक्ष हातांनीं विधि करी. उद्गाता हा सामें गात असे. याशिवाय आणखी मदतनीस होते. पोतृ, अग्निध, प्रशास्तृ, नेष्टृ इत्यादि नांवें ऋग्वेदांत आढळतात ( ऋ. १.१९.३, ९४.६, १०.४१.

---

* Johnson's Oriental Religions. Vol. I.

३ ). ऋत्विजांची सात ही संख्या अनेक वेळां उल्लेखलेली आढळते. सृच्, सृव, द्रोण, जुहू, दर्वी, चमू, चरु, नीक्षण, चमस इत्यादि यज्ञिय पात्रांचीं नांवें ऋग्वेदांत आलेलीं आहेत. सोमयागांत ब्राह्मणांना पुष्कळ दक्षिणा मिळत असे. सोमयाग हें मोठ्या खर्चाचें काम असल्याकारणानें राजे किंवा श्रीमंत लोक हेच तेवढे सोमयाग करीत असत. राजाचें पौरोहित्य मिळविणें हें ब्राह्मणांच्या महत्त्वाकांक्षेचें ध्येय असे. ' या क्लिष्ट यज्ञाविधिखेरीज प्रत्येक आर्याला दैनिक पूजा करावी लागत असे आणि ती तो स्वतः करी; परंतु ऋग्वेद हा कांहीं उच्च विचाराच्या ऋषींच्या काव्यांचा संग्रहग्रंथ असल्या-मुळें त्यांत अशा सार्वत्रिक धर्मविधींचें ( Popular Religion ) फारसें वर्णन आढळत नाहीं. ' * प्रो. कीथ यांचें हें शेवटचें विधान अतिशयोक्त आहे. ' जरी ऋग्वेदांतील सूक्तांना सार्वत्रिक काव्यसंग्रह ( Popular Poetry ) म्हणतां येत नाहीं, जरी तीं सूक्तें कांहीं ऋषिकुलांच्या संकुचित क्षेत्रांत निर्माण झालीं, तथापि त्या ऋषींनीं त्यांतील पुराणकल्पना आणि धर्माचार सामान्य जनतेच्या धार्मिक आचारांस किंवा समजुतींस सोडून तयार केले असें म्हणतां येणार नाहीं. देवतांच्या कांहीं गोष्टी या ऋषींच्या वैयक्तिक आणि तात्कालिक कविकल्पना असतील, तथापि ऋषींनीं त्या बाब-तींत सामान्य धार्मिक आचार विचारांत घेतले. हिलेब्रांटनीं म्हटल्याप्रमाणें ते ऋषि लोकांच्या ' वर ' होते, ' बाहेर ' नव्हते; एवढें कबूल करावें लागेल.' ऽ

अश्वमेध ( ऋ. १.१६२ ) व दर्शपूर्णमास हे यज्ञ ऋग्वेदकालीं प्रचारांत

**यज्ञाचा हेतु**

होते. माध्यंदिन सवनाचा उल्लेख आढळतो. ( ऋ. ३.५२.५ ). त्रिकाल प्रार्थनांचा उल्लेख ऋ. ८.२७. १९ या मंत्रांत आलेला आहे. ऋग्वेदकालीन यज्ञ हे देवांना संतुष्ट करून त्यांची कृपा संपादन करण्याच्या हेतूनें केले जात असत. देवाविषयीं त्यांची भावना स्नेहस्वरूपाची होती. त्यांच्या हांकेला ओ देऊन देव यज्ञाला येत असत. आम्ही तुम्हांला हवि अर्पण करतों तेव्हां तुम्हीं आमचें रक्षण केलेंच पाहिजे व इच्छित वस्तु आम्हांला दिल्याच पाहिजेत अशा प्रकारची देव-

* Keith–Cambridge History India. Vol. I. Chap. IV.

ऽ Winternitz–History of Indian Literature Vol. I. p.79.

घेवीची सक्ति करणारा त्यांचा देवाशीं संबंध नव्हता. ऋग्वेदोत्तरकालीं यज्ञ म्हणजे देव व यजमान यांच्यामधील करार झाला. एकानें आपली अट पाळतांच म्हणजे हवि अर्पण करतांच देवानें त्याच्या इच्छा पूर्ण केल्याच पाहिजेत अशी त्याच्यावर सक्ति झाली. यज्ञाला विनिमयाचें स्वरूप प्राप्त झालें; एवढेंच नव्हे, तर पृथ्वीवर केलेल्या यज्ञांमुळेंच देवांना त्यांचें महत्त्व प्राप्त होतें अशी समजूत झाली. अर्थातच यज्ञाच्या बारीकसारीक अंगांना फार महत्त्व आलें. यज्ञांतील सर्व विधि जर न चुकतां आचारण्यांत आले तर यजमान आपल्या इच्छेनुसार देवांना नमवितो अशी कल्पना दृढ झाली. परंतु ऋग्वेदांत तिचा मागमूस नाहीं.

धार्मिक विधींपैकीं नदीपूजा ऋग्वेदांत उल्लेखितच आहे (ऋ. १०.७५).

मूर्तिपूजा प्रचारांत नव्हती

सर्व नद्यांत सिंधूनदीला साहाजिकच जास्त मान दिला जात असे. नदीसूक्ताच्या आठव्या मंत्रांत सिंधूच्या कांठच्या प्रदेशांतील वस्तूंचें वर्णन आलें आहे. ‘ चांगले घोडे, उत्तम रथ, सुंदर वस्त्रें, सुवर्णाचे अलंकार, अन्न आणि लोंकर उत्पन्न करणारी, दोऱ्या वळण्याचें गवत देणारी सिंधु नदी पुण्यशील आणि सुंदर आहे. निर्गुडी वगैरे झाडेंहि ती आपल्या तीरांवर धारण करते. ’ प्राणिपूजा ऋग्वेदांत नाहीं. वृक्षपूजा व पर्वतपूजा सामान्य जनतेंत रूढ असावी; फक्त पुरोहितांच्या आचारांत तिचा अंतर्भाव झाला नसावा असें प्रो. कीथ यांचें म्हणणें आहे. मूर्तिपूजा प्रचारांत होती किंवा नाहीं याबद्दल मतभेद आहेत. प्रो. मॅक्समुल्लर व इतर बहुतेक पाश्चिमात्य विद्वान् यांच्यामतें ती प्रचारांत नव्हती. उलटपक्षीं मूर्तिपूजा प्रचारांत होती असें डॉ. बोलेन्सेन ऋ. १.२५.१३, २.३३.९, ३.४.५, ५.५२.१ या मंत्रांवरून सिद्ध करूं पहातात. परंतु हीं प्रमाणें फारच तुटपुंजीं होत. ऋ. ४.२४.१० यांतील, ‘ दहा गाई देऊन या माझ्या इंद्राला कोण विकत घेईल ’ या प्रश्नावरून मूर्तिपूजेचें अस्तित्व कोणी सिद्ध करूं पहातात. परंतु ग्रिफिथनीं म्हटल्याप्रमाणें, ‘ यज्ञ करून इंद्राची कृपा प्राप्त करून देण्याकरितां व त्यायोगें संकटांचें निवारण करण्याकरितां ठरविलेली देवघेव ’ असा या वाक्याचा अर्थ होईल. लोकांनीं स्वतःवरून देवतांच्या मूर्तींविषयीं नुसत्या कल्पना केल्या होत्या असें अग्नि, रुद्र, अश्विनौ, वरुण, मरुत् या देवतांच्या वर्णनावरून दिसून येतें. प्रो. मॅकडोनेल

आणि कीथ यांच्यामतें * मूर्ति असाव्यात, परंतु मूर्तिपूजा प्रचारांत नव्हती. मोहेंजो-दारो व हरप्पा येथील उत्खननांत द्राविडियन लोकांनीं केलेल्या मूर्ति सांपडल्या आहेत. द्राविडियनांच्या संबंधामुळें कदाचित् मूर्ति केल्या जात असतील, परंतु त्यांची पूजा प्रचलित नव्हती. द्राविडियनांच्या लिंगपूजेचा ऋग्वेदांत उल्लेख आहे; परंतु ती ऋग्वेदकालीं आर्यधर्मांत शिरली नव्हती.

अतिप्राचीनकाळीं मनुष्य-यज्ञ प्रचारांत होता.

जगांतील बहुतेक राष्ट्रांत समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत मनुष्ययज्ञ प्रचलित होता. ऋग्वेदीय आर्यांमध्यें तो प्रचारांत होता कीं नव्हता याबद्दल दोन्ही प्रकारचीं मतें मांडण्यांत आलीं आहेत. तो प्रचारांत होता असें म्हणणारे असें प्रमाण सांगतात कीं, ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत पुरुषमेधाची कल्पना आहे व त्या सूक्ताचा विनियोग पुरुषमेधांत आहे. शुक्लयजुर्वेदांत ( अध्याय ३० ) एकशेंचौऱ्याऐशीं पुरुषांच्या मेधाचें वर्णन आहे. ऐतरेय ब्राह्मणांतील शुनःशेपकथेवरून तेंच दिसून येतें. परंतु या प्रमाणांवरून पुरुषमेध ऋग्वेदकालीं प्रचारांत होता असें प्राप्त होत नाहीं. ऋग्वेदकालापूर्वीं म्हणजे वैदिक आर्य हिंदुस्थानांत येण्यापूर्वीं त्यांच्यामध्यें तो प्रचारांत असावा. त्या वेळची कल्पना पुरुषसूक्तांत आली आहे. शुक्लयजुर्वेदांत पुरुषमेध आला आहे परंतु तो मागील स्मरण म्हणूनच केवळ आला असावा. त्यांतहि पुरुषाचा प्रत्यक्ष वध करीत नसावेत. ते वध्यस्तंभांना बांधले जात असावेत व निरनिराळ्या देवतांना औपचारिक रीत्या अर्पण केल्यानंतर त्यांना मुक्त केलें जात असावें. ऽ या वर्णनानंतर शुक्लयजुर्वेदांत पुरुषसूक्त आलें आहे व त्याचा पुरुषमेधांत विनियोग केवळ कल्पनासाम्यामुळें सांगितला आहे. शुनःशेपकथेसंबंधीं असें म्हणतां येईल कीं, वाजसनेयिसंहितेनंतर ऐतरेय ब्राह्मणांतील ही कथा वाढविण्यांत आली. ऐतरेय ब्राह्मणांत ती कथा आहे म्हणून त्या काळीं पुरुषमेध प्रचलित होता असें म्हणतां येत नाहीं. परंपराप्राप्त गोष्टी ध्यानांत आणून त्यावरून ही कथा कशावरून बनविली नसेल ? दुसरा मुद्दा असा कीं, प्रतिज्ञेकरितां बळी देणें ही गोष्ट पुरुषमेधाहून भिन्न आहे. पुरुषमेध ऋग्वेदकालीं प्रचारांत नव्हता, तत्पूर्वीं तो प्रचारांत होता असें बहुतेक विद्वान् ग्रंथकारांचें मत आहे.

---

* Vedic Index.

ऽ C. V. Vaidya-Hist. San. Litt. Vol. I p. 150.

तत्त्वज्ञान–पूर्वार्ध

ऋग्वेदीय आर्यांची सामाजिक अवस्था सामान्यतः प्राथमिक स्वरूपाची असल्यामुळें धर्म व तत्त्वज्ञान यांचें पृथक्त्व ऋग्वेदांत आढळत नाहीं. तथापि तत्त्वज्ञानाच्या बाबतींत ऋग्वेदाचे कालदृष्ट्या दोन विभाग पाडतां येतील. निसर्गचमत्कारांना देवता मानून त्यांच्या स्तुतिपर सूक्तें रचण्यांत आलीं हा पहिला काल होय. या कालांत अनेकदेवतात्व हें ऋग्वेदाचें तत्त्वज्ञान होतें. तथापि त्या सूक्तांत ऋषि ज्या वेळीं ज्या देवतेची स्तुति करीत असेल त्यावेळीं तीच देवता सर्वश्रेष्ठ आहे असें त्याला वाटत असे. जगाची चालक, रक्षक, अधिपति वगैरे सर्व कांहीं तीच देवता आहे अशा समजुतीनें तो तिची स्तुति करी. दुसऱ्या एखाद्या वेळीं दुसऱ्या देवतेचें स्तवन करीत असतां तिचा प्रभाव त्याच्या अंतःकरणावर इतक्या उत्कटतेनें उमटत असे कीं, त्या वेळीं ती देवता त्याला सर्वशक्तिमती वाटत असे. अशा रीतीनें ऋग्वेदांत जरी अनेक देवता आहेत तरी त्या अनेकदेवतात्मक तत्त्वज्ञानामध्यें एकेश्वरीवाद अंधुक रीतीनें स्फुरत आहे. या प्रकारास प्रो. मॅक्समुल्लरनीं ‘ Henotheism ’ असें नांव दिलें आहे.

तत्त्वज्ञान–उत्तरार्ध

ऋग्वेदांतील उत्तरकालांत एकेश्वरीवाद आणि अद्वैतवाद यांकडे तत्त्वज्ञानाचा कल दिसून येतो; परंतु यापूर्वींहि लोकांना देवांच्या महत्त्वाविषयीं किंबहुना अस्तित्वाविषयीं शंका येऊं लागली होती. मागें भाषांतरित केलेल्या ऋ. २.१२ या इंद्रसूक्तामध्यें अशा प्रकारच्या शंका उपस्थित केल्या आहेत; ‘ तो कोठें आहे ? ’ ‘ तो नाहींच ’ ‘ त्याच्यावर श्रद्धा ठेवा ’. ‘ तोच इंद्र आहे ’ हें तर त्या सूक्ताचें पालुपद आहे. अशाच प्रकारच्या शंका ऋ. ८. १००.३, ४ मध्यें प्रदर्शित केल्या आहेत. ‘ पुष्कळजण असें म्हणतात कीं इंद्र नाहींच. त्याला कोणी पाहिलें आहे ? आम्हीं हें स्तुतिपर सूक्त कोणाला अर्पण करावें ? ’ यावर, स्वतःचें अस्तित्व आणि महत्त्व प्रकट करण्याकरितां इंद्र प्रत्यक्ष अवतरतो आणि म्हणतो, ‘ हा मी येथें आहें, सर्वांपेक्षां माझें सामर्थ्य अधिक आहे ’ ऋ. ६.१८.३ यांत इंद्राच्या सामर्थ्याविषयीं संशय प्रकट झाला आहे. सर्वश्रेष्ठ अशा इंद्राविषयीं अशा शंका प्रकट होऊं लागल्याबरोबर देवांच्या अनेकत्वाविषयीं आणि त्यांच्याप्रीत्यर्थ यज्ञ करण्यांत कांहीं स्वारस्य आहे कीं नाहीं याविषयींहि लोकांना शंका येऊं लागल्या. ऋ. १०. १२१ या सूक्तांत प्रजापति हा एकच सर्व जगाचा उत्पादक आणि

चालक आहे असें म्हणून त्याची स्तुति केली आहे. त्यांत प्रत्येक मंत्राच्या शेवटीं ‘ कस्मै देवाय हविषा विधेम ’ ‘ कोणत्या देवाला आम्हीं हवि अर्पण करावा ? ’ असें म्हटलें आहे. वस्तुतः अनेक देव नाहींतच, प्रजापति हा एकच देव आहे, हा विचार त्यांत दिसून येतो. या संदिग्धतेला स्पष्ट स्वरूप ऋ. १०.१२९ या प्रसिद्ध नासदीयसूक्तांत मिळालें. यांतील शेवटच्या दोन ( ६–७ ) मंत्रांचा अर्थ पुढीलप्रमाणें आहेः--

‘ सताचा हा पसारा कोठून आला ? हें येथें सविस्तर कोण सांगणार ? कोण हें निश्चित जाणतो ? देवहि या सृष्टीच्या उत्पत्तीनंतरचे; मग ती जेथून आली तें कोण सांगणार ? ’ सताचा हा विसर्ग कसा निर्मित झाला हें, परम आकाशांत असणारा जगाचा अध्यक्ष जो हिरण्यगर्भ तो जाणीत असेल किंवा नसेल. ’

ऋग्वेदांतील तत्त्वज्ञानाच्या बहुतेक सूक्तांमध्यें (पुरुष १०.९०, विश्वकर्मन् १०.८१, ८२, बृहस्पति, दक्ष, अदिति १०.७२, प्रजापति १०.१२१, नासदीय १०.१२९ ) एकाच जगदुत्पादक शक्तीचा कल्पना दिसून येते. तथापि ही देवता मूर्तस्वरूपाची आहे अशीच समजूत त्यांत आहे. ऋ. १.१६४.४६ या मंत्रांत एकत्वाची कल्पना स्पष्टपणें मांडली आहे.

इंद्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान् ।
एकं सद्विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥

‘ कोणी इंद्र, मित्र, वरुण, अग्नि असें म्हणतात. हाच तो दिव्य पक्षी सुपर्ण होय. हा एकच असून त्याला ज्ञानी लोक अनेक नांवांनीं संबोधतात. ते याला अग्नि, यम, मातरिश्वा असें म्हणतात. ’

या एकदेवतेच्या स्वरूपाविषयीं वैदिक ऋषींच्या कल्पना संदिग्ध होत्या. एकच एक म्हणून ज्या देवतेची ऋषींनीं स्तुति केली तिचें स्पष्ट आणि तर्क-शुद्ध स्वरूप त्यांना सांगतां आलें नाहीं. इतर प्राचीन राष्ट्रांप्रमाणें वैदिक राष्ट्रालाहि कूटसूक्तांची आवड होती. या सूक्तांतून धर्मशास्त्रासंबंधीं कोडीं ( ब्रह्मोद्य ) घातलेलीं असतात; त्यांतच तत्त्वज्ञानाचेहि तुटक भाग आढळ-तात. ऋ. १.१६४ या ‘ अस्यवामीय ’ सूक्तांत कूटमंत्र पुष्कळ आले आहेत. यांपैकीं फक्त कांहींचा अर्थ समजूं शकतो. बाकीचे दुर्ज्ञेय आहेत. उदाहरणा-दाखल एक मंत्र पुढें दिला आहेः –

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभि चाकशीति ॥ २० ॥

'परस्परांचे जिवलग मित्र असे दोघे पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय करितात. त्यांपैकीं एक त्या वृक्षाचीं गोड फळें खातो व दुसरा तीं भक्षण न करतां त्याच्याकडे पहात रहातो.'

असे कूटमंत्र ऋग्वेदांत पुष्कळ सूक्तांत आले आहेत. ( १.१०३, १६१, १६३, १८५; ३.७, ५५, ५६; ४.२३, ३६, ८.२९ इ. )

**सृष्ट्युत्पत्तिविषयक कल्पना**

ऋग्वेदसूक्तांची रचना अनेक शतकांपर्यंत आणि अनेक ऋषींकडून झाली असल्यानें सृष्ट्युत्पत्तीसंबंधींच्या कल्पना त्यांत एकत्र आणि सुव्यवस्थित आढळत नाहींत. ऋषींनीं निरनिराळ्या अपूर्ण कल्पना स्वतःच्या काव्यमय भाषेत सांगितल्या आहेत. त्यामुळें साहजिकच निरनिराळ्या ऋषींच्या, किंबहुना एकाच ऋषीच्या एतत्संबंधीं कल्पनांमध्यें साम्य दिसून येत नाहीं. निरनिराळ्या ऋषींच्या मतांतून सामान्य कल्पना काढून त्याच फक्त मांडतां येतील.

सर्वशक्तिमती आणि सर्वज्ञ अशी एक शक्ति सृष्टीची उत्पादक आहे ही कल्पना सर्व सूक्तकारांमध्यें समान आहे. नुकतेंच मागें पाहिल्याप्रमाणें या शक्तीचीं नांवें प्रत्येक सूक्तकारानुसार भिन्नभिन्न आहेत. सृष्ट्युत्पत्तीच्या रीतीबद्दल ऋषींमध्यें मतभेद आहेत. सामान्यतः ऋग्वेदांतील सृष्ट्युत्पत्तीचे तीन प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें करतां येतात. *

( १ ) एकाद्या पदार्थापासून वस्तु तयार करावी त्याप्रमाणें ( Work of Art ).

( २ ) पहिल्या प्रकाराविरुद्ध, सृष्टींतील वस्तुजाताची जशी नैसर्गिक उत्पत्ति होते त्याप्रमाणें ( Work of Nature ).

( ३ ) यज्ञामुळें सृष्टीची धारणा होते, तशी उत्पत्तिहि यज्ञापासून ( Work of Sacrifice ).

( १ ) घर बांधतांना प्रथम लांकूडकाम उभें करण्याचे वेळीं जो क्रम स्वीकारावा लागेल तोच क्रम सृष्टीची उत्पत्ति वर्णन करतांना स्वीकारण्यांत आलेला आहे. अभावापासून सृष्टीची उत्पत्ति झाली असें ऋग्वेदाचें मत नाहीं; 'असतः सदजायत' ( ऋ. १०.७२ ) या ठिकाणीं 'असत्' याचा 'अभाव'

* H. W. Wallis–Cosmology of Rgveda.

असा अर्थ नाहीं; तर सायणाचार्यांनीं केल्याप्रमाणें 'अव्याकृतं सत्' असा आहे. सृष्टीची रचना करणाऱ्या दैवी शक्तीनें कोणते अविनाशी पदार्थ आपल्या कामाकरितां उपयोगांत आणले याचें उत्तर ऋग्वेदीय ऋषि देऊं शकत नाहींत ( ऋ. १०.३१.७, ८१.४ ). सृष्टि तयार करण्यांत देवाचा हेतु काय असाहि प्रश्न त्यांनीं उपस्थित केलेला नाहीं. मनुष्यांच्या हालचालींचें भव्य प्रतिबिंब अशी दैवी कार्याची कल्पना त्यांनीं केलेली आहे. मनुष्य ज्याप्रमाणें घर बांधतो, त्याप्रमाणें देवानें सृष्टिरूपी घर बांधलें. मानवी कृत्यांचें दैवी कृतीशीं असें साम्य आहे. मनुष्यांच्या कार्यामागें जसा हेतु आहे तसा देवाच्या कार्यामागें मात्र नाहीं. ऋ. १०.७२ मध्यें सृष्टयुत्पत्तीची अंधुक रूपरेषा दिलेली आहे.

( २ ) नासदीय सूक्तांमध्यें सतापासून झालेली नैसर्गिक सृष्टयुत्पत्ति गूढ भाषेंत वर्णिली आहे. प्रथम एकच एक तत्त्व ( हिरण्यगर्भ ) होतें आणि सर्व विश्व अंधकारमय आणि पाण्यानें व्यापलेलें होतें. पाणी आणि उष्णता यांच्या मिलाफानें एक गर्भ उत्पन्न झाला. त्यावेळीं सर्व सृष्टि निराकार आणि पोकळ होती. त्या सत् आणि निराकार हिरण्यगर्भापासून ही सर्व सृष्टि उत्पन्न झाली. अवेस्त्यांतील मताप्रमाणें सृष्टीची उत्पत्ति वरीलप्रमाणेंच झाली, हें 'मज्दधात' या विशेषणावरून दिसून येतें; ग्रीकांची सृष्टयुत्पत्तीची कल्पनाहि अशीच आहे; ही कल्पना त्यांनीं मूलस्थानांतून नेली असावी; किंवा कदाचित् स्वतंत्रपणेंहि ती प्रादुर्भूत झाली असेल.

( ३ ) सृष्टयुत्पत्तिविषयक तिसरी कल्पना म्हणजे यज्ञापासून सृष्टि उत्पन्न झाल्याची होय. या कल्पनेचा आश्रय म्हणजे पुरुषसूक्त ( ऋ. १०.९० ) होय. यज्ञिय पदार्थांचें सृष्ट पदार्थांशीं साम्य आणि सृष्टयुत्पत्तीचा क्रम यांचें सविस्तर वर्णन त्यांत आलेलें आहे.

ज्या ज्या ठिकाणीं सृष्टयुत्पत्तीचा विचार केलेला आहे, त्या त्या ठिकाणीं यांपैकीं कोणती तरी एक कल्पना स्वतंत्रपणें आली आहे असें नाहीं. कांहीं ठिकाणीं दोन कल्पना संमिश्र स्वरूपांतहि मांडण्यांत आल्या आहेत.

ऋग्वेदांत नीतितत्त्वांचा निर्देश फारच थोड्या ठिकाणीं आढळतो. वरुण हें नीतीचें अधिदैवत आहे. स्वतंत्र वरुणसूक्तांत किंवा इतर देवतांशीं संलग्न असलेल्या वरुणाच्या सूक्तांत कांहीं नीतिकल्पना आढळतात. इतरहि कांहीं देवतांच्या—विशेषतः

नीतिशास्त्राचा उगम

आदित्यांच्या सूक्तांत क्वचित् नीतितत्त्वांचा निर्देश केलेला दिसतो. या देवता अंतरिक्षांतून मानवांच्या हालचालींचें निरीक्षण करीत असतात असें वारंवार म्हटलें आहे. पापाची जाणीव ही ऋग्वेदांतील नीतिशास्त्रामध्यें प्रमुख आहे. योग्य मार्गापासून किंवा कर्तव्यापासून च्युत होणें अशी पापासंबंधींची आर्यांची कल्पना होती. ( पाप–पत्–पडणें; अघस्, एनस्, अंहस्-इ–जाणें भलतीकडे जाणें, चुकणें; निर्ऋति–ऋत=सत्यपथ–सत्य मार्गापासून च्युति ). पाप म्हणजे दैवी नियमांचें स्वेच्छापूर्वक उल्लंघन अशी त्यांची समजूत होती; पण या दैवी नियमांचें ज्ञान त्यांना कोठून झालें ? ठराविक वेळीं उत्पन्न होणाऱ्या निसर्गचमत्कारांवरून त्यांनीं निसर्गनियमांची कल्पना केली व ज्याप्रमाणें बाह्य सृष्टीमध्यें नियम आहेत त्याचप्रमाणें अंतःसृष्टीमध्येंहि मनुष्याला योग्य मार्गांत ठेवणारा नीतीचा बंध आहे असा त्यांनीं तर्क बांधला, असें मॅक्समुल्लर × यांचें मत आहे. परंतु मॉरिस फिलिप्स यांनीं त्यावर आक्षेप घेतला आहे. * बाह्य सृष्टींतील नियमांवरून सत्य पथाची कल्पना कशी निघाली ? बाह्य सृष्टींतील नियमांनीं नैतिक नियम उत्पन्न केले नाहींत; तर त्यांची जाणीव करून दिली असें जर म्हटलें तर त्यावर प्रश्न असा कीं, नैतिक नियम आणि त्यांची जाणीव या दोन गोष्टी भिन्न कशा असूं शकतील ? बाह्य नियमांच्या कल्पनेनें नैतिक नियमांची सुप्त कल्पना जागृत केली असें म्हटलें तर नीतीची कल्पना मूळ अंतःस्थ होती हें स्पष्टच झालें. म्हणजे ती बाह्य सृष्टीच्या नियमांनीं उत्पन्न केली नाहीं. बाह्य निसर्गाच्या नियमाला ‘ ऋत ’ हा शब्द जेव्हां आर्यांनीं लावला तेव्हां त्यांच्या मनामध्यें ‘ ऋत ’ आणि त्याचें विरोधी ‘ अनृत ’ यांची पूर्ण कल्पना होती. नैतिक नियम हे मनुष्याच्या अंतःकरणांत निसर्गतःच आहेत. त्या नियमांवरूनच आर्यांनीं बाह्य निसर्गाच्या नियमांची कल्पना बांधली, हें फिलिप्स यांचें तात्त्विक विवेचन पटण्यासारखें आहे.

नीतितत्त्वें

पाप हें भयंकर संकट आहे; तें नाहींसें करण्याकरितां वरुणाची प्रार्थना करण्यांत येई. पापी मनुष्यावर वरुण आपले पाश टाकतो. पाप हें जड ओझ्याप्रमाणें आहे. त्याचा भार हलका करण्यास देवच समर्थ आहेत. पापाकडे मनुष्याची नैसर्गिक

× Hibbert Lectures.

* Teaching of the Vedas p. 156.

प्रवृत्ति आहे ( ऋ. १.३८.६, ४.५४.३, ७.५७.४, ८६.६ ). पापाला मनुष्य एकटाच जबाबदार नसतो. पूर्वजांचीं पातकें पुढील पिढीसहि भोगावीं लागतात ( ऋ. ७.५२.२, ८६.५ ). पापाचा परिणाम मनुष्याला देवापासून विभक्त करण्यांत होतो ( ऋ. ७.८६.२–४ ). सुरापान, बहुपत्नीकत्व, पुनर्विवाह, अनार्यांचा वध आणि त्यांच्या संपत्तीची लूट यांची पापांत गणना होत नसे. द्यूत, चोरी, मातापितरांचा अवमान, अप्रामाणिकता, मंत्रतंत्र व जादूटोणा, अदानप्रवृत्ति, परस्त्रीसंभोग हीं पापें समजलीं जात. ऋ. ४.५.५ यांत असत्याची निंदा केली आहे. खोटें बोलणाऱ्याला देव शिक्षा करतात ( ऋ. १.१५२.१, ७ ४९.३, ८४.४, १०४.१२–१४ ). लबाडी करणाऱ्या कितवाचा उल्लेख ऋ. १.९२.१० यांत आला आहे. नास्तिकतेसंबंधीं तिरस्कार ऋ. ७.१०४.१४ या मंत्रांत व्यक्त झाला आहे. ऋ.१०.११७ या सूक्तांत याचकांना दान करण्याचें महत्त्व वर्णिलें आहे. संपन्न मनुष्यानें गरीबाला धन द्यावें, भुकेलेल्यास अन्न द्यावें, सेवकांना चांगल्या रीतीनें वागवावें, स्वतः पुष्कळ धन सांचवून ठेवण्याची इच्छा धरूं नये, अतिथीला विन्मुख दवडूं नये, वगैरे नियम त्यांत सांगितले आहेत. विशेषतः ब्राह्मणांना दान देण्याचें महत्त्व जास्त वर्णिलें आहे ( ऋ. १०.१०७ ).

**मरणोत्तर जीवित**

'मरणोत्तर जीवित व मरणोत्तर मिळणारें पुण्य किंवा पाप यांच्या अस्तित्वावरील श्रद्धेशिवाय कोणताहि धर्म आजवर जिवंत राहूं शकला नाहीं'* "निराशावादी तत्त्वज्ञानी वारंवार म्हणत असतात कीं, जीवनांतील अत्यंत महत्त्वाची कोणती गोष्ट असेल तर ती मरण ही होय. म्हणून एखाद्या राष्ट्राचा आध्यात्मिक दर्जा त्या राष्ट्राचे मृतासंबंधींचे विचार, मृतांना दिला गेलेला मान, मृतांच्या अवशेषासंबंधींचे आचार आणि त्यांच्या संबंधांत केले जाणारे संस्कार यांवरून ठरतो."× या निकषानुसार ऋग्वेदीय आर्यांचा आध्यात्मिक दर्जा आत्यंतिक उच्च ठरतो. मरणोत्तर जीवनासंबंधींचा विचार विशेषतः दहाव्या मंडळांतील सूक्तांत केलेला आहे. पहिल्या आणि नवव्या मंडळांतहि कांहीं उल्लेख

---

* Max Muller–Chips from a German Workshop 2nd Edition Vol. I. p. 44.

× Ragozin–Vedic India p. 350.

सांपडतात. तथापि या विषयासंबंधींचे आर्यांचे विचार निःसंशय त्याहून प्राचीन असले पाहिजेत. कारण मरण आणि तदुत्तर जीवित यांसंबंधींच्या कल्पना नेहमीं राष्ट्राच्या प्राचीनतम अवस्थेंत उत्पन्न झालेल्या असतात.

अमरत्व, परलोक

या विषयासंबंधीं आर्यांची प्रमुख कल्पना म्हणजे अमरत्व होय. सर्व देव हे अमर आहेत आणि आपल्या पूजकांना अमरत्व देण्यास ते समर्थ आहेत ( ऋ. १.३१.७, ९१.१, ९.६३.२ ). मनुष्य मेल्याबरोबर त्याचा पार्थिव देह मृत्तिकेंत मिसळून जातो. परंतु शुद्धाचरणी मनुष्याचा आकाशांतून आलेला आत्मा जमिनीच्या गर्तेंत जात नाहीं ( ऋ. १०.१८.१, २ ). त्याच्या सत्त्वशील मृत पूर्वजांनीं त्याच्याकरितां दुसरें स्थान शोधून ठेवलेलें असतें ( ऋ. १० १६.१ ). विवस्वानाचा पुत्र यम हा प्रथम मृत आहे आणि त्यानें आपल्या मागून येणाऱ्या लोकांकरितां श्रेष्ठ स्थान शोधून काढलेलें आहे ( ऋ. १०.१४.२ ). म्हणून अग्नीनें मृत देह जाळला किंवा पृथ्वीनें तो आच्छादून टाकला तरी, सर्व विकृतींपासून मुक्त झालेला त्यांतील आत्मा अंतरिक्षांतून नवीन जीवनाकडे जातो. प्रथम पूषन् त्याला नवीन स्थानाकडे नेतो. पूषन्‌बरोबर सविताहि केव्हांकेव्हां असतो ( ऋ. १०.१७.३,४ ). प्रथम त्या आत्म्यास एक प्रवाह ओलांडावा लागतो ( ऋ. १०.६३.१० ). नंतर यमाचे पहारेकरी म्हणून असलेले रुंद नाकाचे, चार डोळ्यांचे ( याचें स्पष्टीकरण मागें आलेंच आहे ) अंगावर ठिपके असलेले, सरमेचे पुत्र जे दोन कुत्रे त्यांच्याजवळून आत्म्यांच्या निवासस्थानाकडे तो जातो ( ऋ. १०.१४.१०-१२ ). हेंच यमाचें निवासस्थान होय. या यमाच्या स्थानांत कधींहि कमी न होणारा प्रकाश आहे आणि कधींहि न आटणारें पाणी तेथें वहात असतें. त्या ठिकाणीं आत्म्याला कोणतीहि वासना राहिलेली नसते. त्या ठिकाणीं आनंद आणि सुख यांचेंच साम्राज्य असतें. या सुखमय जीवनाची स्पष्ट कल्पना ऋग्वेदांतील सूक्तांत आढळत नाहीं. त्या स्थानीं त्याला नवीन देह प्राप्त होतो ( ऋ. १०.१६.५ ). परंतु तो कसा प्राप्त होतो हा प्रश्न उपस्थित केला गेलेला नाहीं. परलोकस्थानांतील प्रवाह, त्यावरील पूल ( ऋ. ९.४१.२ ) त्या स्थानाचें रक्षण करणारे कुत्रे या कल्पना इराणी ( Vendidad 1.39. ), ग्रीक, जर्मन आणि स्कँडिनेव्हियन वाङ्मयांत आढळतात.

चिरंतन देवांप्रमाणेंच प्राचीन, मध्य आणि अर्वाचीन काळीं परलोकीं गेलेल्या

पितर

पितरांबद्दल आदर व्यक्त केलेला आहे. जेव्हां एखादा मनुष्य मरतो तेव्हां किंवा त्याच्या श्राद्धदिनीं यम आणि अग्नि यांबरोबर ज्ञात आणि अज्ञात पितरांनाहि हवि आणि सोम यांचें सेवन करण्याकरितां बोलावलें जातें. देवांप्रमाणेंच त्यांच्याकडूनाहि आशीर्वाद मागण्यांत येतात. हे अमर झालेले मृतात्मे पृथ्वीवर मर्त्यांकडे पहात असतात व आपल्या संततीची काळजी वहात असतात. ते अंतरिक्षांत संचार करीत असतात; लोकांमध्येंहि ते हिंडत असतात आणि ज्या ठिकाणीं त्यांना यज्ञांत बोलावलें गेलें असेल तेथें जाऊन यजमानास संतति, संपत्ति व आशीर्वाद देत असतात ( ऋ. १०.१५,५६ ). हे पितर कुळाचे, जातीचे आणि राष्ट्राचे असे तीन प्रकारचे आहेत. आपल्या मृत पूर्वजांच्या आत्म्यांची प्रार्थना करून त्यांच्याकडून साहाय्य आणि रक्षण यांची अपेक्षा करणें ही कल्पना बहुतेक राष्ट्रांच्या इतिहासांत आढळते. इतर राष्ट्रांच्या देवत्व पावलेल्या पूर्वजांमध्यें वीर, राष्ट्रसंस्थापक, राजकुटुंब वगैरेंचा समावेश केला गेला आहे. परंतु वैदिक आर्यांचे पितर म्हणजे धार्मिक प्रगतीचा पाया घालणार ऋषि होत, आणि हें त्यांच्या इतिहासाशीं सुसंगतच आहे.

अधोलोक

मागें वर्णन केलेले पापी, दुष्ट, मित्रावरुणांचे नियम मोडणारे नास्तिक लोक आणि पतिद्रोही स्त्रिया यांना परलोकांतील स्थान मिळत नाहीं.अमर आत्म्यांचा सहवास आणि चिरंतन प्रकाशमय आत्मजीवन यांचा मार्ग त्यांना बंद असतो. देहाबरोबरच त्यांचा आत्माहि त्या खोल अंधकारमय गर्तेंत बुडून जातो. ज्याप्रमाणें ‘ ऋत ’ पालन करणाऱ्यांकरितां उत्कृष्ट निवासस्थान शोधलेलें आहे, त्याचप्रमाणें या ‘ अनृत ’ आचरणाऱ्या लोकांकरितां अंधकारमय आणि दुःखमय निवासस्थानाची कल्पनाहि ऋग्वेदांत आहे. परंतु ती फार थोड्या ठिकाणीं आढळते. व तिचें स्वरूपहि अस्पष्ट आहे. यम ही भीतिप्रद अशी देवताहि समजली गेली आहे. यमाच्या भयंकर कुत्र्यांच्या जवळून शक्य तितक्या जलद जा असें मृतात्म्यास सांगितलें आहे ( ऋ. १०.१४.१०-१२ ). यम हा मृत्यु आहे. तो आपला दूत म्हणून कपोताला पाठवितो ( ऋ. १०.१६५.४ ). वरुणाच्या आणि यमाच्या पाशांतून मुक्त होण्याची अपेक्षा केली आहे.

( ऋ. १०.९७.१६ ). पापलोकाच्या अस्तित्वाचे प्रत्यक्ष उल्लेखहि आढळतात. अधार्मिक व दुष्ट (अव्रत) मनुष्यांना सोम गर्तेत टाकतो (कर्त-ऋ. ९.७३.८). यज्ञ न करणारांना इंद्र खोल खळग्यांत टाकतो. असत्य, पापी, आचारहीन, बंधुविरहित तरुण ( विधवा ) स्त्रीप्रमाणें किंवा पतिद्रोही स्त्रीप्रमाणें स्वच्छंदी अशा लोकांकरितां हा अधोलोक निर्माण केला आहे ( ऋ. ४ ५.५ ). बलिष्ठ शत्रूला प्रचंड आणि खोल खड्डयांत टाकण्याविषयीं इंद्राची प्रार्थना केली आहे ( ऋ. १.१३.३ )

पुनर्जन्माची कल्पना ऋग्वेदांत नाहीं. तसेंच त्यांत निराशावादाचा मागमूसहि नाहीं. जीवनाविषयीं आणि कर्माविषयीं तिरस्कार त्यांत नाहीं उलट आनंदमय जीवन आणि दीर्घकाल जगण्याची इच्छा यांचा आशापूर्ण उद्रेक सर्वत्र दृष्टीस पडतो.

# विभाग पांचवा

# ऋग्वेदकालीन समाजस्थिति

## वसति

वैदिक आर्यांची संस्कृति बरीच वरच्या दर्जाची होती; तथापि ती चंद्रगुप्तकालीन संस्कृतीच्या जवळजवळ बरोबरीची होती हें कांहीं विद्वानांचें मत अतिशयोक्तीचें आहे.

सामाजिक स्थितीच्या ज्ञानाची साधने

पशुपालन, कृषिवृत्ति आणि उद्योगवृत्ति या तिन्हीं सामाजिक अवस्थांचें संकलन वैदिक आर्य-संस्कृतींत झालें होतें. ऋग्वेदाच्या धार्मिक स्वरूपामुळें त्यांत तत्कालीन सामाजिक परिस्थितीचें वर्णन प्रत्यक्षपणें आलेलें नाहीं. तथापि निरनिराळ्या देवतांवर आरोपित केलेल्या ऐहिक जीवनाच्या वर्णनावरून समाजस्थितीची कल्पना केल्यास ती चुकीची ठरणार नाहीं. कारण विशेषतः धार्मिक प्रगतीच्या या अवस्थेंत मनुष्यें आपल्या स्वतःच्या सर्वांगीण स्वरूपाला भव्य आणि पराकाष्ठेचें स्वरूप देऊन देवतांचें वर्णन करतात. सांस्कृतिक ज्ञानाचा दुसरा मार्ग म्हणजे निरनिराळ्या सूक्तांत वर्णनप्रसंगीं ऋषींनीं दिलेल्या उपमा होत. या उपमात्मक वर्णनावरूनहि कांहीं माहिती उपलब्ध होते. कारण व्यवहारांत प्रत्यक्ष दिसणाऱ्या वस्तूंचें किंवा घडणाऱ्या गोष्टींचें काल्पनिक वस्तूंशीं साम्य दर्शविणें हा कवीचा निसर्ग होय. तिसरा मार्ग म्हणजे प्रत्यक्ष सूक्तें. ऋग्वेदांत कांहीं सूक्तें अशीं आहेत कीं, त्यांवरून सामाजिक स्थितीचें प्रत्यक्ष ज्ञान होतें. या तिन्ही मार्गांचा अवलंब करून ऋग्वेदकालीन समाजाविषयीं कोणती माहिती उपलब्ध होते व त्यावरून तत्कालीन लोकांचा सामाजिक दर्जा कशा प्रकारचा ठरतो हें या प्रकरणांत पहावयाचें आहे.

आर्यांची शरीरयष्टि

वैदिक आर्यांची शरीरयष्टि उंच होती. वर्ण गोरा आणि डोळे काळे होते. डोक्यांवर केस विपुल होते. नाक सरळ आणि चिंचोळें होतें. तथापि हिंदुस्थानांत आल्यानंतर त्यांच्यामध्यें द्राविडियन लोकांचें मिश्रण झाल्यानें गंगायमुनांच्या प्रदेशांतील

लोक शारीरदृष्ट्या मिश्रित झाले; परंतु पंजाब आणि राजपुताना यांतील आर्य अमिश्रित राहिले. यासंबंधींचा विचार तिसऱ्या विभागांत झालाच आहे.

घरें

घर या अर्थी गृह, दम, पस्त्या आणि हर्म्य असे चार शब्द ऋग्वेदांत आहेत. ज्या घराला लागून गुरें बांधण्याचे मोठमोठे सोपे होते, त्याला 'पस्त्या' किंवा 'हर्म्य' म्हणण्यांत येत असे. घराला पुढें आणि मागें असे दोन दरवाजे असत. वरुणाच्या घराला सहस्राधिक द्वारें आहेत असें म्हटलें आहे (ऋ. ७.८८.५). द्वार असल्यावरून घराला 'दुरोण' असें नांव मिळालें आहे घरामध्यें अनेक विभाग पाडलेले असत. घरांत प्रज्वलित अग्नि नेहमीं ठवलेला असे (ऋ. १.६८.२). घरें बांधण्याचे कामीं दगडांचा उपयोग केला जात नसे. प्रारंभीं घरांची रचना साधी होती. घरांचें दार बिजागऱ्यांऐवजीं पट्ट्यांनीं बांधलेलें असे. सहस्रस्तंभांच्या घराचा उल्लेख एकदोन ठिकाणीं आढळतो. (ऋ. २.४१.५, ५.६२.६) तीन मजली घराचा उल्लेख ऋ. ८.१८.२१ या मंत्रांत आहे. द्राविडियन लोकांशीं संबंध आल्यावर त्यांच्या गृहरचनेंत सुधारणा झाली असावी. विटांचा उपयोगहि त्यानंतर केला जात असावा. अशीं अनेक घरें मिळून एक खेडें होत असे (ऋ. १.४४.१०, ११४.१). रानटी जनावरांचा उपद्रव होऊं नये म्हणून गांवाभोंवतीं कुंपण घातलेलें असे. शत्रूच्या हल्ल्यापासून रक्षण करण्याकरितां मोठ्या मैदानांना तटबंदी करण्यांत येत असे व त्याच्या बाहेर खंदक खणलेले असत.

## गोपाल आणि कृषिक

गोपालन

गुरें पाळणें आणि शेती करणें यांवर लोकांची उपजीविका होत असे. गाई (गो–Gow–Slav & Lithu; Gao–Zend; Cow–English.) बैल, घोडे इत्यादि पशु देण्याबद्दल वारंवार देवांची प्रार्थना केली आहे. सर्वांत गाय ही महत्त्वाची समजली जात असे. कारण गाईच्या दुधापासून खाण्याचे अनेक जिन्नस व यज्ञांत देवतांना अर्पण करावयाचे हवि तयार होत असत. गाय ही विनिमयसामान्य होती. गाईचें कातडें विशेषतः नूतनपरिणीत दंपतीस बसण्याकरितां उपयोगीं पडत असे. गाईच्या कातड्याच्या पखाली आणि दहीं, सुरा वगैरे ठेवण्याकरितां पिशव्या करीत असत. रथाला छप्पर म्हणून गाईच्या कातड्याचें

आच्छादन घालण्यांत येत असे ( ऋ. ६.४७.६ ). वैदिक आर्यांची गाई-संबंधींची भावना ऋ. १०.१९ यांत नैसर्गिक आणि सौंदर्यपूर्ण अशी चित्रित झाली आहे. गाय ही लोकांची मुख्य संपत्ति होती, त्यामुळें तिचें रानांत जाणेंयेणें, रात्रींचें संरक्षण याविषयीं आर्यांना साहजिकच उत्सुकता वाटे. रानटी पशु आणि चोर यांच्यापासून रक्षण होण्याकरितां त्यांनीं 'गोत्र' बांधले होते. 'गोत्र' म्हणजे सर्व गाईंना एकत्र बांधण्यासाठीं केलेला सोपा व 'गोष्ठी' म्हणजे चरण्याचें कुरण. गाईंना रानांत चरण्यास नेण्यास गुराखी असे व तो सायंकाळीं त्यांना परत आणून मालकांच्या स्वाधीन करीत असे. गुरांचे रंग अनेक होते ( ऋ. १.६२.९ ). गाय काळी असली तरी ती दूध पांढरें देते असें बालसुलभ नवल ऋ. ४.३.९ या मंत्रांत व्यक्त झालें आहे. गाईंना पाणी पिण्याकरितां मोठमोठीं भांडीं ( आहाव ) ठेवलेलीं असत ( ऋ. १.३४.८, ६.७.२ इ. ). एकमेकांच्या गाई परस्परांपासून भिन्न राहण्याकरितां त्या गाईंच्या कानांना निरनिराळ्या संख्यांचे काप पाडले जात असावेत. 'अष्टकर्णी' म्हणून जें गाईचें विशेषण ऋग्वेदांत आलें आहे ( ऋ. १०.६२.७) तें तिच्या कानांच्या कापांची आठ ही संख्या दाखवितें. आर्य हिंदुस्थानांत आले ते शेतकरी म्हणून आले, त्यामुळें शेतकीच्या दृष्टीनें जनावरांचें महत्त्व काय आहे याची त्यांना पूर्ण कल्पना होती. 'आर्य लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां तेथील द्राविडियन लोक कृषिक होते, आर्य स्वतः कृषिक नव्हते, हें बेडन पॉवेलचें मत ऋग्वेदाशीं जुळत नाहीं.' +

शेती

नांगर ओढण्यास घोड्यांचा उपयोग करणें शक्य होतें. ( अश्व—Asp-Zend; Aszva—Slav & Lithu. ) परंतु तो केलेला दिसत नाहीं. फक्त धान्याची गाडी ओढण्यास घोड्यांचा उपयोग केल्याचा उल्लेख ऋग्वेदांत आढळतो ( ऋ. १०. १०१.७ ). कारण ओली जमीन नांगरण्यास घोड्याचा उपयोग होत नसल्यानें शेतीच्या कामाला बैलांचाच उपयोग करणें प्राप्त होतें. घोड्याचा मुख्य उपयोग युद्धांत व एरवीं रथाला जोडण्याकडे होत असे. प्रो. मॅक्डोनेल यांच्या मतें घोड्याचा बसण्याकरितां उपयोग केला जात नव्हता. डॉ. अविनाशचंद्र दासांच्या मतें युद्धांत घोडेस्वारांची सेना उपयोगांत आणली जात

---

+ Keith-Cambridge History of India Vol. I Chap. IV.

होती. बैलांचा आणि रेड्यांचा उपयोग ओझ्याच्या गाड्या वहाण्याकडेहि होत असे. शेणाचें खत वापरीत असत. खत म्हणून हाडांचा उपयोग करीत किंवा नाहीं तें माहीत नाहीं.*

ऋ. ४.५७ या कृषिसूक्तांत शेतीसंबंधींची आर्यांची भावना व्यक्त झाली आहे. जमीन नांगरून व कोळपून त्यांत बीं पेरण्यांत येत असे. एका पोकळ काठींतून बीं पेरीत असत. विहिरी खणलेल्या होत्या. त्यांतून शेतीकरितां व पिण्याकरितां रहाटगाडग्यानें पाणी काढीत असत (ऋ १०.२५.४, ९३.१३, १०१.५, ६, ७). विहिरीला चाक लावून त्यावरून दोर सोडूनहि पाणी काढीत असत. ( कूचक्र–ऋ. १०.१०२.११ ). दोराला पोहरा बांधलेला असे. ( कोश–ऋ. १०.४२.२ ). जरूर तेथें कालवे खणूनहि पाणी नेलें होतें. पाण्याच्या नाल्यांचा ( कुल्या ) उल्लेख ऋ. ३.४५.३, १०.४३.७, ६८.१ यांत आहे. हे नाले मुद्दाम शेतीकरितां तयार केलेले होते कीं नैसर्गिक होते हें निश्चित सांगतां येत नाहीं. पण खणलेल्या कालव्यांतून वहाणाऱ्या पाण्याचा स्पष्ट उल्लेख ऋ. ७.४९.२ या मंत्रांत आला आहे. यावरून जमिनीच्या लागवडीकरितां पाटबंधाऱ्यांचा उपयोग केला जात असे असें स्पष्ट दिसतें. स्वाभाविक वाहणाऱ्या झऱ्यांना ‘ उत्स ’ असा शब्द आहे. वाळवंटांतील झऱ्याला ‘ प्रपा ’ म्हणत ( ऋ. १०.४.१ ). जमिनींतून वर्षांतून दोनदां पिकें–विशेषतः यव काढीत. धान्य पिकल्यावर जमिनीवर बैलांच्याकडून तुडवून त्याची मळणी करीत व नंतर तें धान्य स्वच्छ करीत असत. सुपीक जमिनीचा उल्लेख अनेक ठिकाणीं आला आहे ( उर्वरा–ऋ. ५.३३.४ ). धान्यांपैकीं यव हें मुख्य होतें ( ऋ. १.२३.१५, ११७.२१ ) रोथ आणि बोथलिंक् यांच्या मताप्रमाणें × यव हा शब्द सर्व धान्यांना समान होता. धाना हें एक धान्य ऋग्वेदकाळीं उपयोगांत आणलें जात होतें. घोड्यांनाहि तें खावयास घालीत असत ( ऋ. १.१६.२, ३.३५.३,७, ५२.५ इ ). ऋग्वेदीय आर्यांना तांदूळ ( व्रीहि ) माहीत नव्हते असें बहुतक ग्रंथकारांचें मत आहे. जे. एफ्. हेविट ऽ यांनीं असें लिहिलें आहे कीं, हिंदुस्थानांत अश्म-

---

* R. Ganguli—Cattle and cattle-rearing in Ancient India—B. O. R. I. Annuls Vol. XII Part III 1931.

× St. Petersberg Lexicon.

ऽ Ruling Races of Prehistoric Times.

युगापासून द्राविडियन लोक तांदूळ पिकवीत असत. परंतु मोहेंजो-दारो येथील उत्खननांत तांदूळ सांपडलेले नाहींत. गहूं आणि यव तेथें सांपडले आहेत. त्यांपैकीं यव तर ऋग्वेदांत उल्लेखितच आहेत. गव्हाचा उल्लेख नाहीं; परंतु सेंट पीटर्सबर्ग कोशांतील अर्थ बरोबर धरला तर यव हा शब्द गोधूमालाहि लावीत असणें शक्य आहे. तिल, सर्षप, मुद्ग हीं धान्येंहि ऋग्वेदकालीं प्रचारांत होतीं असें डॉ. दास म्हणतात, परंतु त्याला आधार नाहीं.

## आहार

आहार

धान्य चाळणीमध्यें चाळीत असत ( तितउ--ऋ. १०.७१.२ ) व दगडी जात्यानें पीठ करून अगर कुटून ( उलूखल--ऋ. १.२८ ) त्याची दुधामध्यें भाकरी तयार करीत व ती भाजून नंतर खात असत. दूध, दहीं, लोणी व तूप यांचा उपयोग आहारांत जास्त प्रमाणांत होत असे. घुसळण्याच्या रवीचा उल्लेख ( मन्था ) ऋ. १.२८.४ या मंत्रांत आढळतो. फळें(ऋ. ३.४५.४,१.१४६.५, काकडी--उर्वारुक--वालुक ऋ. ७.५९.१२) व भाजीपाला ( ऋ.६.४९.१४ ) यांचाहि उपयोग आहारांत करीत असत. अन्न शिजविण्याच्या भांड्याला 'पचन' असें नांव आहे (ऋ.१.१६२.६) पात्र या शब्दाचा अर्थ प्रारंभीं पाणी पिण्याचें भांडें असा होता, परंतु पुढें भांडें असा सामान्य अर्थ त्याला प्राप्त झाला. भांडीं तांब्याचीं, लोखंडाचीं, लांकडाचीं व मातीचीं असत. कलशांचा उल्लेख अनेकदां आला आहे. 'घर्म' हें एक दूध तापविण्याचें भांडें होतें. दहीं कातड्याच्या पिशव्यांत ठेवीत ( ऋ. ६.४८.१८ ). लांकडाच्या भांड्यांत जेवीत असत. कांहीं कामांत मातीचीं भांडीं वापरीत असत. कुंभाचा उल्लेख ऋ. १०.८९.७ मध्यें आहे. धान्य ठेवण्यासंबंधीं 'ऊर्दर' हा शब्द ऋग्वेदांत २.१४.११ आढळतो. सायणाचार्यांच्या मतें त्याचा अर्थ धान्याचें कोठार असा आहे, परंतु प्रो. रोथ व झिमेर त्याचा अर्थ धान्याचें माप असा घेतात.

मांसाहार, सोमपान

मांसाचा उपयोग विशेष प्रसंगीं करीत. यज्ञप्रसंगीं मांस कापल्याचा उल्लेख ऋ. १.१६१, १६२ यांत आहे. बैल शिजविणें हा पूर्वींचा धर्म आहे असें ऋ. १.१६४.४३ मध्यें सांगितलें आहे. ऋ. ५.२९.७, ८.१२.८ या मंत्रांत देव एकत्र जमून अनेक रेडे शिजवीत व खात असल्याचें म्हटलें आहे. यावरून यज्ञांत पशुबलि देत

असत व अर्थात् खाण्यांतहि मांसाचा उपयोग करीत असत हें स्पष्ट होतें. बैल व रेडे यांचें मांस विशेषेंकरून खात असत. घोड्यांचें मांस फारसें खात असल्याचें दिसत नाहीं ( ऋ. १.१६२ ). मांस भाजून किंवा शिजवून खात असत ( ऋ. १.१६२.११ ). मासे खात नसत. मिठाचा उल्लेख आढळत नाहीं, तेव्हां वैदिक आर्य मीठ खात नसावेत असें बहुतेक विद्वानांचें मत आहे. परंतु डॉ. दासांच्या मतें ते मीठ खात असावेत; कारण पंजाबांत मिठाचे डोंगर आहेत. तथापि मीठ हा खाण्याचा पदार्थ आहे असें त्यांना समजलें तरच ते मीठ खाणार. तसा उपयोग त्यांना समजला असता तर मिठाचा उल्लेख आल्यावांचून राहिला नसता. पेयांमध्यें दूध जास्त प्रमाणांत घेतलें जाई. सोमपान हें अतिशय प्रिय होतें. सोमरस दुधांत मिसळून पीत. सोम म्हणजे कोणती वनस्पति होती याचा निर्णय अद्यापि लागला नाहीं व लागेलसें दिसतहि नाहीं. या वनस्पतीबद्दल अनेकांनीं अनेक प्रकार सुचविले आहेत. आर्य हिंदुस्थानांत उतरले, त्यावेळीं सोमपान अतिशय प्रिय होतें. त्यावेळीं ती वनस्पति आर्यनिवासाच्या प्रदेशांत काश्मीरच्या दाक्षिणेकडील प्रदेशांत होती. पुढें आर्य गंगायमुनांच्या प्रदेशांत आले तेव्हां त्यांनीं ती वनस्पति बरोबर आणली, परंतु तिची चव बदलल्याकारणानें त्यांना पूर्वीचें सोमपान मिळूं शकलें नाहीं. तेव्हां ते चव बदललेल्या सोमाचा किंवा तिच्या जागीं दुसऱ्या एकाद्या वनस्पतीचा उपयोग करूं लागले असावेत. सुरापानहि प्रचारांत होतें ( ऋ. ७.८६.६, ८.२.१२, १०.१०७ ९ ). सुरा ( हुरा–झेंद ) ही बहुधा धान्यापासून तयार करीत. लोंकरीच्या वस्त्रांतून ती गाळली जात असे ( कारोतर–ऋ. १.११६.७ ) व तिचे कुंभ भरून ठेवले जात. कलालाचा उल्लेख ( सुरावान् ) ऋ. १.१९१.१० मध्यें आला आहे.

## विवाह

संतति म्हणून मुलींची अपेक्षा कोणीं केल्याचें ऋग्वेदांत दिसत नाहीं. पुत्र देण्याविषयीं वारंवार देवतांची प्रार्थना केली आहे.

स्त्रीवाचक शब्द

मुली लग्न झाल्यानंतर दुसऱ्याच्या घरीं जात असतात, परंतु मुलगे घरीं रहातात व आपल्या घरादारांचें व जातीचें संरक्षण करण्यास समर्थ असतात( ऋ. ३.३१.२. ); याचकरितां नेहमीं पुत्रांची अपेक्षा केली जात असे. विवाहाचे बाबतींत एकपत्नीकत्व आणि बहुपत्नीकत्व अशा दोन्ही चाली ऋग्वेदांत आढळतात. तथापि

एकपत्नीत्व हें सार्वत्रिक होतें (ऋ.१.१०५.२, १२४.७, ४.३.२, १०.७१.४). फक्त राजे लोक आणि इतर श्रीमंत लोक–विशेषतः क्षत्रिय अनेक स्त्रिया करीत असत ( ऋ. १.६२.११, ७१.१, १८६.७, ७.२६.३, १०.४३.१ ). परंतु असे विवाह अपवादात्मक होते. एकपत्नीव्रत हा नियम होता. बहुपतित्व ऋग्वेदकालीं नव्हतें. स्त्री, वधू, ग्ना, जामि, जनि, जाया, नारी, योषा, योषणा व योषित् इतके स्त्रीवाचक शब्द ऋग्वेदात आहेत. ' स्त्री ' हा शब्द केवळ पुरुषविरोधी म्हणून वापरला आहे. ' ग्ना ' हा शब्द देवपत्नी या अर्थीं वापरलेला आहे. नारी हा शब्द सामान्य अर्थानें उपयोजिलेला आहे. 'जनि' अगर ' जामि ' याचा अर्थ विवाहित स्त्री असा आहे. वंशपरंपरा राखण्याच्या दृष्टीनें ' जाया ' हा शब्द स्त्रीवाचक आहे. ' योषित् ' ' योषा ' ' योषिणा ' या शब्दांचा अर्थ उपवर स्त्री असा आहे. ' वधू ' हा शब्द उपवर, विवाहसमारंभांतील अगर विवाहित स्त्री या अर्थानें उपयोगांत आणलेला आहे.

विवाह ठरविण्याची पद्धति

वैदिक आर्यांनीं विवाह ही संस्था धार्मिक आणि अतिशय पवित्र मानलेली आहे. विवाह हा देवांनीं सांगितलेला आहे व प्रजोत्पादन हा त्याचा हेतु आहे अशी त्यांची कल्पना होती. विवाहाच्या बाबतींत स्त्रीला आपला पति निवडण्याचें स्वातंत्र्य दिलें जात होतें असें ऋ. १०.२७.१२ या मंत्रावरून स्पष्ट होतें. ( भद्रा वधूर्भवति यत्सुपेशाः स्वयं सा मित्रं वनुते जने चित्।) ' जार ' हा शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे. परंतु उत्तरकालीन वाङ्मयांतील अनैतिक अर्थ ऋग्वेदांत त्या शब्दाला नाहीं. प्रणयी मनुष्य असा त्याचा अर्थ आहे. यावरून व इतर कांहीं उल्लेखांवरून ( ऋ. ३.५२.३, ६२.८ ) कन्या आपापले वर पसंत करीत असत असें दिसतें. वडिलांची संमतिहि आवश्यक असे, परंतु ती मिळतहि असे. स्त्रीपुरुषांचे विवाह पूर्ण वयांत आल्यानंतरच होत असत. बालविवाह ऋग्वेदाला माहीत नाहीं. घोषेचा विवाह वृद्धावस्थेतच झाला ( ऋ. १.११.७ इ. ) लग्न ठरविण्याकरितां वरपक्षाकडील वराचा स्नेही कन्येला मागणी घालण्याकरितां तिच्या पित्याकडे जात असे. ' वर ' या शब्दाचा ऋग्वेदांत पति असा अर्थ नाहीं. स्नेह्याकरितां कन्येला मागणी घालणारा तो ' वर ' असा त्या शब्दाचा ऋग्वेदांत अर्थ आहे ( १०.८५.८ ). पति हा अर्थ त्या शब्दाला पुढें प्राप्त झाला.

विवाहाचे बाबतींत गोत्राचें बंधन ऋग्वेदकाळीं नव्हतें. ज्येष्ठत्वाच्या क्रमानुसार कन्यांचे आणि पुत्रांचे विवाह होत असत. या नियमामुळें कोठें अडचण येत असल्यास नियमाचें बंधन सैल करण्यांत येई. स्त्रियांनीं विवाह केलाच पाहिजे अशी त्यांच्यावर सक्ति नव्हती. कांहीं अविवाहित स्त्रिया आमरण पितृगृहीं राहिल्याचीं उदाहरणें ऋग्वेदांत नमूद आहेत (ऋ. २.१७७). तथापि त्यांना विशेष मानाचें स्थान नव्हतें. विवाह करणें स्त्रीचें कर्तव्य आहे असें समजलें जात होतें. वरपक्षाकडून वधूपित्याला गाई वगैरे संपत्ति दिली जात असे. वरामध्यें कांहीं व्यंग असल्यास हें प्रमाण थोडें जास्त असे. उलट कन्येमध्यें कांहीं व्यंग असल्यास तिच्या पित्याला वरपक्षास हुंडा द्यावा लागत असे. ज्या पित्याला केवळ कन्याच असत तो कन्येचा विवाह ठरवितांना तिचा पहिला पुत्र आपणांस दिला पाहिजे अशी अट घालीत असे (ऋ. ३.३१.१). जगांतील कांहीं राष्ट्रांत अजूनहि ही प्रथा चालू आहे. § विवाहकालाच्या बाबतींत ज्योतिषाचा उपयोग केला जात नव्हता असें सामान्यतः समजण्यांत येतें. *

सूर्यासूक्त

ऋग्वेदकालीन विवाहाचें वर्णन ऋ. १०.८५ या सूर्यासूक्तांत आलें आहे. त्यांत सूर्या आणि सोम यांच्या विवाहाचें रूपकानें वर्णन केलें आहे. त्यावरून विवाहविधीची स्पष्ट कल्पना येते. 'सोम' शब्दाचा चंद्र असा अर्थ या सूक्तांत आहे. 'सूर्या' ही सूर्याची मुलगी होय. सूर्याचीं किरणें असा सूर्या-शब्दाचा अर्थ घेतां येईल. चंद्र हा सूर्यकिरणांच्यामुळें प्रकाशतो ही गोष्ट त्या लोकांना माहीत होती. सूर्यकिरणें आणि चंद्र यांचें मीलन हें मानवी विवाहाचें प्रतीक म्हणून घेण्यांत आलें आहे ही गोष्ट अत्यंत समुचित अशीच आहे. या विवाहांत अश्विनौ हे 'वर' होते. ऋग्वेदकालीं एकाच ग्रामांतील वधूवरांचे विवाह करण्याचा प्रचार साहाजिकच होता. द्राविडियन लोकांत मुलें हीं आईचीं समजत असत. या मातृप्रधान कुटुंबपद्धतीमुळें त्यांच्यामध्यें भिन्नग्रामांतील वधूवरांचे विवाह करण्याचा नियम (Exogamy) रूढ होता. आर्यांची पितृप्रधान कुटुंबपद्धति असल्यामुळें त्यांच्यामध्यें हा नियम नव्हता. द्राविडियनांच्या साह-

---

§ Westermarck–History of Human Marriage.

* R. Raghunathrao–The Aryan Marriage,

चर्यामुळें एका गांवांतीलच वधूवरांचे विवाह करण्याचा त्यांचा नियम ढिला झाला व त्यांच्यामध्यें एकाच गांवांतील किंवा भिन्न गांवांतील वधूवरांचे विवाह होऊं लागले.

विवाहसमारंभ वधूगृहीं साजरा होत असे. समारंभाकरितां मंडप उभारण्यांत येई व त्याला छत (छदि–ऋ. १०.८५.१०) लावण्यांत येत असे. वरपक्षाकडील मंडळी वरासह मिरवीत वधूगृहीं येत असत. त्यांच्या सन्मानार्थ गोमांसाची मेजवानी होत असे, असें प्रो. मॅकडोनेल म्हणतात. यानंतर विवाहविधि होत असे. अग्नि ही आर्यांची संस्कारदेवता आहे. तिच्या समक्ष सर्व संस्कार होत असत. वधूवरांचे हात परस्परांच्या हातांत मंत्रपूर्वक देणें हें विवाहाचें मुख्य अंग होतें. यासंबंधीं ऋग्वेदांतील मंत्र वाचनीय आहे:—

विवाहसमारंभ

**गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः ।**
**भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥ ३६ ॥**

(पति म्हणतो) 'हे वधू, सुमंगलासाठीं मी तुझें पाणिग्रहण करतों. वृद्धावस्थेपर्यंत तूं माझ्या सहवासांत रहा. गृहस्थाश्रमाचें आचरण करण्याकरितां भग, अर्यमा, सविता आणि उषा या देवतांनीं तुला माझ्या स्वाधीन केली आहे.'

पाणिग्रहणानंतर सप्तपदी होत असे. वधूवर हातांत हात घालून अग्नीभोंवतीं तीन प्रदक्षिणा करीत. अशा प्रकारें विधिसंस्कार झाल्यानंतर वधूची पतिगृहीं जाण्याची तयारी करण्यांत येत असे. तिच्या शुश्रूषेकरितां एक दासी (न्योचनी) व मनोविनोदनार्थ तिची एक मैत्रीण (अनुदेयी) अशा दोघीजणी तिच्याबरोबर जात असत. वधूला माहेरीं फारसें आणण्यांत येत नसे. पतिगृहीं जाण्याच्या वेळीं वधूचा पिता वस्त्रालंकार व गाई वगैरे देऊन तिचा सत्कार करीत असे (ऋ. ३.३१.२). हें सत्कारसाहित्य (वहतुः–ऋ. १०.८५.१३) गाडींतून प्रथम पुढें जात असे मागाहून वधूवर जात असत. उत्कृष्ट प्रकारें शृंगारलेल्या रथांत बसून वधूवर स्वगृहीं जात असत (ऋ. १०.८५.२०). कधीं कधीं दोन बैलांच्या गाडींतूनहि ते जात असत (मंत्र ११). त्यांचा मार्ग सुगम्य करण्यासाठीं, वाटमाऱ्यांपासून त्यांना उपद्रव पोहोचूं नये, ते सुखरूप घरीं पोहोंचावेत, यासाठीं देवांची प्रार्थना केली जात असे (मंत्र ३२). गांवांत पोंचल्यानंतर गृहप्रवेशसमारंभ होत असे (मंत्र २७,

२८). या वेळेपर्यंत वधूनें नेसलेलें वस्त्र अमंगल समजून ब्राह्मणास दान करण्यांत येई (मंत्र २९, ३०, ३४, ३५). यानंतर गांवांत वधूवरांची थाटाची मिरवणूक काढण्यांत येई. त्यावेळचा मंत्र (३३) उत्कृष्ट आहे—

**सुमंगलीरियं वधूरिमां समेत पश्यत ।**
**सौभाग्यमस्यै दत्त्वायाथास्तं वि परेतन ॥**

'ही वधू मंगलमय आहे. इकडे या व तिला पहा. तिला चांगले आशिर्वाद द्या आणि नंतर आपापल्या घरीं परत जा.'

यानंतर गर्भाधान करण्यांत येई. विवाहसमयीं मुली प्रौढ होत्या हें यावरून स्पष्टच होतें (ऋ. १०.८२.३७, १८३, १८४). सुखकर शय्या तयार करण्यांत येई (वह्य–ऋ. ७.५५.८). उपबर्हण या शब्दाचा अर्थ उशी असा आहे (ऋ. १०.८९.७). पतीच्या सहवासापूर्वी सोम, विश्वावसु गंधर्व आणि अग्नि हे त्या कन्येचा उपभोग घेतात अशी ऋग्वेदीय आर्यांची कल्पना होती (मंत्र २१, २२, ३८–४१). पतिगृहीं वधूला उपदेश करण्यांत येत असे–'पतीला शुभदायक हो. आप्तेष्ट, नोकरचाकर व पशु यांच्याशीं सहानुभूतीनें वाग. तुझी दृष्टि शांत असूं दे व तुझे विचार चांगले असूं देत. सासूसासरा, दीर व नणंद यांच्यावर तूं योग्य ती सत्ता चालीव.' (मंत्र ४३, ४४, ४६). वधूवरांना संतति व संपत्ति देऊन त्यांचा संसार आनंदपूर्ण करण्याविषयीं देवतांची प्रार्थना केली जाई (मंत्र ४७).

**इहैव स्तं मा वि यौष्टं विश्वमायुर्व्यश्नुतम् ।**
**क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिर्मोदमानौ स्वे गृहे ॥ ४२ ॥**

'तुम्ही दोघे इहलोकांत असा, तुमचा वियोग न होवो. मुलगे आणि नातू यांच्यासह आपल्या घरांत तुम्हीं आनंदानें दीर्घायुष्य उपभोगा.'

**इमां त्वमिंद्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ।**
**दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि ॥ ४५ ॥**

'हे इंद्रा, या वधूला सुपुत्र दे व तिचें कल्याण कर. हिला दहा पुत्र दे आणि तिचा पति अकरावा असूं दे.'

## स्त्रियांचा दर्जा

विवाहित होण्यापूर्वी स्त्री पित्याच्या ताब्यांत असे. विवाह न झाल्यास पिता व पित्याचे पश्चात् ज्येष्ठ बंधु तिचा नियंता असे. विवाहित स्त्रीवर तिच्या पतीचा हक्क समजला

स्त्रीचें सामाजिक स्थान

जात असे; तथापि ती सर्व घराची सत्ताधीश असे. पत्नी म्हणजे गृह होय. पत्नी हेंच पतीचें विश्रामस्थान होय, असें ऋ. ३.५३. ४ या मंत्रांत म्हटलें आहे. पतीचे मातापितर, बंधुभगिनी, नोकरचाकर इत्यादि सर्व तिच्या अधिकाराखालीं असत. यज्ञामध्यें पतीच्या बरोबरीनें तिचा भाग असे, यावरून स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीचा दर्जा होता हें सिद्ध होतें. एकपत्नीकत्व हा सार्वत्रिक नियम होता म्हणूनच हें शक्य होतें. विवाह हा देवसंस्थापित संस्कार असल्याकारणानें व वंश चालू ठेवणें हा त्याचा हेतु असल्यामुळें स्वतःच्या रक्ताची संतति असण्याबद्दल वैदिक ऋषींनीं वारंवार इच्छा प्रगट केली आहे. स्वतःच्या पुत्राची जागा दत्तक पुत्रानें कधींच भरून यावयाची नाहीं ( ऋ. ७.४.७, ८ ) असें म्हटलें आहे. स्त्रिया सुशिक्षित होत्या. पुरुषांच्या बरोबरीनें त्यांना शिक्षण मिळत असल्यानें त्यांचा बौद्धिक विकास होत असे. त्यामुळें, आध्यात्मिक उन्नतीकरितां विवाह न करतां स्वतंत्र जीवन कंठणें किंवा ऐहिक सुखाचा आनंदानें उपभोग घेत काल व्यतीत करणें यांपैकीं कोणतेंहि पसंत करण्यास त्या समर्थ असत. विवाहित स्त्री गृहस्थाश्रमासंबंधींची कर्तव्यें यशस्वीपणें पार पाडण्याच्या बाबतींत पुरुषाइतकीच समर्थ असे. स्त्रियांच्या शिक्षणासंबंधीं मोठें प्रमाण असें आहे कीं, ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांच्या कर्त्या स्त्रिया आहेत ( लोपशा—ऋ. १.१२६.७, विश्वावारा ५.२८, घोषा १०.४०, इंद्राणी १०.१४५, शची १०.१५९, अपाला ८.९१ ) स्त्रिया सारथ्य करीत असत; कधीं युद्धांतहि सामील होत असत. मुद्गलाबरोबर त्याची पत्नी मुद्गलानी युद्धांत त्याचें सारथ्य करण्यासाठीं गेली होती. ( ऋ. १०.१०२ ).

स्त्रीस्वातंत्र्य

स्त्रिया दौत्यहि करीत असत असें पणींच्याकडे दूत म्हणून गेलेल्या सरमेच्या कथेवरून मानण्यांत येतें ( ऋ. १०.१०८ ). ज्या स्त्रीला सपत्नी होत्या ती, त्यांच्यावरील पतीचें प्रेम कमी करून तें आपणांकडे ओढून घेण्याकरितां एका वनस्पतीचा मंत्रपूर्वक प्रयोग करीत असे ( ऋ. १०.१४५, १५९ ). विशेष समारंभाच्या प्रसंगीं स्त्रियाहि पुरुषांबरोबर मोकळेपणानें येत असत. अर्थात् गोषाची पद्धति नव्हतीच. ‘ उत्सवप्रसंगीं सुंदर स्त्रिया एकत्र आल्याचें जें वर्णन ऋग्वेदांत आहे तें वेश्यांचें आहे असें कांहीं ग्रंथकार समजतात, परंतु तसें समजण्याचें कारण नाहीं. त्या कालीं अभ्रातृक आणि स्वैर अशा कांहीं स्त्रिया वेश्याकर्म

करीत असत ही गोष्ट खरी आहे, परंतु अथेन्समधील पेरिक्लजच्या काळा-प्रमाणें किंवा गौतम बुद्धाच्या काळीं वैशाली नगरींतल्याप्रमाणें ऋग्वेदकालीं वेश्यावृत्ति पूर्णपणें प्रस्थापित झाली होती असें दीर्घप्रयत्नांतींहि पिशेल आणि गेल्डनेर × यांना सिद्ध करतां आलें नाहीं.' * 'अशा उत्सवप्रसंगीं अविवाहित तरुण स्त्रीपुरुषांना परस्परांमध्यें परिचय उत्पन्न करण्याला आणि तो वाढविण्याला संधि मिळे. अशा वेळीं प्रेमळ माताहि संधि वायां जाऊं न देतां आपल्या कन्यांना योग्य ती सल्ला देऊन हरएक प्रकारें त्यांना मदत करी. हा परिचय जर टिकाऊ वाटला तर विवाहाकरितां पित्याची व त्याच्या पश्चात् ज्येष्ठ भावाची परवानगी विचारण्यांत येत असे.' ऽ या परिचयप्रकाराची कल्पना केली असतां अविवाहित तरुणी (योषित्) आणि प्रणयी तरुण (जार) यांच्या ऋग्वेदांत अनेकवार आलेल्या प्रतिशब्दांचा अर्थ बरोबर बसतो.

स्त्रियांच्या मनोवृत्तीसंबंधीं ऋग्वेदांत आलेले उल्लेख मननीय आहेत.

स्त्रियांच्या मनोवृत्तीं-विषयीं ऋग्वेदांतील उल्लेख

पुरूरवा–उर्वशीसंवादांत पुरूरव्यानें अत्यंत कळकळीनें परत येण्याविषयीं विनवणी केली असतां उर्वशी म्हणते:—

**न वै स्त्रैणानि सख्यानि संति सालावृकाणां हृदयान्येता ॥**

'स्त्रियांचे स्नेह चिरकाल टिकणारे नसतात; त्यांचीं हृदयें लांडग्याच्या हृदयासारखीं असतात' (ऋ. १०.९५.१५).

स्त्री झालेल्या आसंगप्लायोगीला

**इंद्रश्चिद्घा तदब्रवीत्स्त्रिया अशास्यं मनः । उतो अह क्रतुं रघुम् ॥**

'इंद्र म्हणाला, स्त्रीच्या मनाचें शासन करणें कठीण आहे. तिची बुद्धि क्षुद्र असते' (ऋ. ८.३३.१७).

स्त्रियांच्या चालीरीतीसंबंधीं एक मजेदार उल्लेख ऋ. ८.३३.१९ मध्यें आला आहे. स्त्री झालेल्या परंतु पुरुष होऊं इच्छिणाऱ्या आसंगप्लायोगील इंद्र आकाशांतून म्हणतो—

---

× Vedische Studien.

* Winternitz—History of Indian Literature p. 67.

ऽ Adolf Kaegi—Rgveda p. 15.

**अधः पश्यस्य मोपरि संतरां पादकौ हर।**
**मा ते कशप्लकौ दृशन्स्त्री हि ब्रह्मा बभूविथ ॥**

'हे प्लायोगे, खालीं पहा, वर पाहूं नको; पावलें हळूंच टाक. तुझ्या पायाचे घोटे दिसूं देऊं नकोस. कारण तूं स्त्री झाला आहेस.'

राज्ञी शशीयसीकडे भिक्षा मागण्यास आलेला व सत्कार झाल्यामुळें प्रसन्न झालेला श्यावाश्व तिजविषयीं म्हणतो—

**उत त्वा स्त्री शशीयसी पुंसो भवति वस्यसी। अदेवत्रादराधसः॥**

'अश्रद्ध आणि लोभी पुरुषापेक्षां, शशीयसी ही स्त्री असली तरी श्रेष्ठ आहे.( ऋ. ५.६१.६ ).

पतिनिधनानंतर पत्नीनें सती जाण्याची चाल खुद्द ऋग्वेदकालीं नव्हती.

पुनर्विवाह

विधवा या शब्दाचें अस्तित्व तेंच सिद्ध करतें ( ऋ. १०.१८.८ ) या मंत्रांत गतभर्तृकेला मृतपतीच्या शेजारून उठून येण्यास सांगितलें आहे. म्हणजे खुद्द ऋग्वेदकालांत सतीची चाल नव्हती. परंतु त्याच मंत्रामुळें त्या चालीचें पूर्वास्तित्व सिद्ध होतें. आर्य प्रवास करीत जेव्हां हिंदुस्थानांत येऊं लागले, त्यावेळीं एकाद्या स्त्रीचा पति मरण पावल्यानंतर तिचें रक्षण करण्याची जबाबदारी घेण्यास दुसरें कोणी तयार होत नसल्यामुळें सती जाण्याची चाल प्रचारांत आली असावी. इंडो-युरोपियन कालीं सतीची चाल नव्हती; कारण विधवा हा शब्द सर्व इंडो-युरोपियन भाषांत आहे.

हिंदुस्थानांत आर्य स्थिर झाल्यानंतर तसें कारण नसल्यामुळें व संस्कृति तितकी उच्च बनल्यामुळें ती प्रथा साहाजिकच बंद पडली. विधवा स्त्रीला पुनर्विवाह करण्याची परवानगी असे. पतीच्या भावाबरोबर ( ऋ. १०.४०.२) अगर दुसऱ्या एकाद्या नातलगाबरोबर ( ऋ. १०.१८.८ ) पुनर्विवाह करण्यांत येत असे. एकाद्या स्त्रीचा पति अदृश्य झाल्यास व तो न सांपडल्यास किंवा त्याचा कांहीं तपास न लागल्यास त्या स्त्रीला पुनर्विवाह करण्याची परवानगी असे असें प्रो. पिशेल सिद्ध करूं पहातात. प्रो. डेलब्रुक यांस तें संमत नाहीं.

## कौटुंबिक कायदे—नीतिमत्ता

पतिपत्नींच्या प्रेमळ संबंधाशिवाय इतर आप्तसंबंधाविषयीं उल्लेख ऋग्वेदांत

कौटुंबिक संबंध

आढळत नाहींत. ‘ नना ’ व ‘ तत ’ हीं मातापित्यांचीं प्रेमळ नांवें ऋ. ९.११२.३ या मंत्रांत दिसून येतात. पितापुत्रांचा प्रेमाचा संबंध असे. पित्याची आपल्या मुलांवर सत्ता असे. परंतु तो वृद्ध झाल्यावर थोरल्या मुलाच्या हातांत कुटुंबाचीं सर्व सूत्रें देत असे व मग साहाजिकच ज्येष्ठ पुत्राची पत्नी ही गृहस्वामिनी होत असे. मृत्युपत्राचा उल्लेख नाहीं. तरी पण पितृनिधनानंतर पुत्र एकत्र राहण्याचा फारसा संभव नसे. सामान्यतः एकत्रकुटुंबपद्धति प्रचारांत होती. तीन पिढ्यांपर्यंत एकत्र रहात असत. वांटणीचा हिस्सा मागण्याकरितां एका घरांत रहाण्याची जरूरी नसे. कारण जमीन मुबलक असल्याकारणानें वांटणीच्या हिश्शाची अपेक्षा कोणी करीत नसत. तरी पण वांटणी होत असे. सर्वच ज्येष्ठ मुलाकडे जात नसे. थोडासा जास्त हिस्सा त्याला मिळे इतकेंच. कांहींतरी शारीरिक व्यंग असल्यामुळें मालमत्ता संभाळण्यास नालायक असलेल्या मुलांस हिस्सा दिला जात नसे. परंतु त्यांचें पोषण करण्याची जबाबदारी वारसावर असे. मिळकत न मिळालेल्या मुलांचे मुलगे जर अव्यंग असले तर त्यांना हिस्सा दिला जाई. मुलांची एखादी भगिनी अविवाहित अशी घरीं राहिल्यास तिलाहि एकंदर मालमत्तेंतील भाग मिळत असे ( ऋ. २.१७.७ ). शेतजमीन व कुरण आणि जंगम मालमत्ता हीं प्रत्येक कुटुंबाच्या मालकीचीं स्वतंत्र होतीं. मुलगे वेगळे झाले तरी शेजारीं शेजारींच रहात असत. त्यामुळें मूळ एका कुटुंबाचेंच एक गांव बनत असे. शेतांमधील बांधांचा उल्लेख सांपडतो. क्षेत्रमापनहि करण्यांत येत होतें. एखाद्या मनुष्याला मुलगा नसल्यास व मुलगी असल्यास त्या मुलीच्या मुलाला त्याची सर्व मिळकत मिळे. दत्तक घेण्याचाहि अधिकार होता; परंतु दत्तक घेणें श्रेयस्कर वाटत नव्हतें ( ऋ. ७.४.७, ८ ). गृहाची अंतर्व्यवस्था पहाणें व बालसंगोपन हें पत्नीचें कर्तव्य होतें. बालसंगोपनाविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं. दळणें, चटया विणणें, शिवणें आणि विणणें हीं कामें स्त्रिया करीत असत. जामाताचा नैसर्गिक स्वभाव ऋग्वेदकाळींहि लोकांना माहीत होता. अंगांत पात्रता नसलेला जांवई अनेक वेळां बोलाविलें तरी जसा संध्याकाळपर्यंत येत नाहीं, विलंब लावतो, तसा हे इंद्रा, तूं विलंब करूं नकोस असें म्हटलें आहे ( ऋ. ८.२.२० ). ऋ. १.१०९.२ या मंत्रांत कवि म्हणतो कीं, ‘ हे इंद्राग्नी, एखादा हीन दर्जाचा तरुण, पत्नी

मिळविण्याकरितां तिच्या पालकास, किंवा मुलीचा भाऊ ( स्याल ) आपल्या बहिणीकरितां तिच्या नवऱ्याला जेवढें धन देतो, त्यापेक्षां तुम्ही जास्त धन देतां असें मीं ऐकलें आहे.'

नीतिमत्ता

वैदिक कालांतील नीतिमत्ता उच्च दर्जाची होती असें आतांपर्यंतच्या विवेचनांवरून स्पष्ट झालेंच आहे. तथापि अनीतीचें आचरण अपवादादाखल होत असल्याचें दिसून येतें. स्त्रीपुरुषांच्या अनैतिक संबंधांचीं उदाहरणें आढळून येतात. ऋ. १०.३४.४ या मंत्रांत द्यूत खेळणाऱ्या कितवाच्या पत्नीसंबंधीं म्हटलें आहे कीं, 'अन्ये जायां परि मृशंत्यस्य।' ऋ. १०.४०.६ मध्यें स्त्रीच्या संकेतस्थानाकडे जाण्याची उपमा दिलेली आहे. ऋ. १०.३४.५ मध्यें व्यभिचारी स्त्रीचा ( जारिणी ) उल्लेख आहे. अशा स्त्रिया गर्भपात करीत असत. व्यभिचारामुळें गर्भिणी झालेली स्त्री आपल्या अपत्याचा गुप्तपणानें निकाल लावते, त्याप्रमाणें भक्तांचें दुरित नष्ट करण्यासाठीं मित्रावरुणांची प्रार्थना केली आहे ( ऋ. २. २९.१). भ्रातृहीन युवती पथभ्रष्ट होऊन दुराचारी वेश्या बनत असत ( ऋ. १. १२४.७, ४.५.५). कुमारीपुत्रांचे कांहीं उल्लेख ऋग्वेदांत आहेत. ऋग्वेदांतील कथा व दृष्टांत यावरून समाजाच्या नीतीची कल्पना केल्यास पितापुत्री, भ्रातृभगिनी इत्यादि संबंध आढळून येतील. परंतु असें अनुमान काढणें बरोबर होणार नाहीं. समाजस्थितीवरूनच ते दृष्टांत अगर त्या कथा निर्माण झाल्या असेंच कांहीं म्हणतां येत नाहीं. केवळ कल्पनेनेंहि अशा संबंधांचे दृष्टांत देतां येतील व कथाहि निर्माण करतां येतील. कांहीं स्त्रिया वेश्या व्यवसाय करीत असत. ऋ. १.१६७.४ यांत वेश्येचा उल्लेख ( यव्या साधारण्या ) आला आहे. ऋ. ९.६७.१०-१२ यांमध्यें तरुण कुमारिकांकडे नेण्याविषयीं पूषन्‌ची प्रार्थना केली आहे. ऋग्वेदांतील एकंदर समाजस्थितीकडे पहातां हीं उदाहरणें अपवादच होत.

## वैद्यक–मंत्रतंत्र

वैद्यक

ऋग्वेदकालांतील लोकांना कांहीं रोगांचें ज्ञान झालें होतें. क्षयरोग ( यक्ष्मा) त्यांना फार भयंकर वाटत असे. याच रोगाचा उल्लेख सर्वांत जास्त वेळां आलेला आहे ( ऋ. १. १२२, १०.१३७, १६१, १६३ ) या रोगासंबंधींची भीति वारंवार व्यक्त

केली आहे. यक्ष्मा या शब्दाचा रोग असा सामान्य अर्थ कांहीं ठिकाणीं असावासा वाटतो. कावीळ ( हरिमन् ) हाहि रोग त्यांना माहीत होता ( ऋ. १.५०.११ ). अतिशय सुरापानामुळें होणारा रोगहि उल्लेखलेला आहे. ( सुराम–ऋ. १०.१३१.५ ). ' अजका ' व ' शिपद' या रोगांचा उल्लेख ऋ. ७.५० या सूक्तांत आला आहे; परंतु हे रोग कोणते तें समजत नाहीं. शिपद हा रोग दूषित पाण्यापासून होणारा असावा. हे रोग बरे करणारे वैद्यहि ( भिषक् ) त्या काळीं होते ( ऋ. ९.११२.१, ३; १०.९७.४–६ ). रोगनाशक अशा पुष्कळ वनस्पति ज्ञात होत्या व त्यांचा उपयोग करण्यांत येत असे ( ऋ. १०.९७ ). वरुणाच्या सनातन नियमांचें उल्लंघन केल्यानें तो पाश टाकतो व त्यामुळें रोग होतात अशी त्यांची कल्पना असल्यामुळें रोगनाशनाविषयीं प्रार्थना करण्यांत येत असे व केवळ तशा प्रकारचे मंत्र म्हणून भयंकर रोग बरे करण्यांत येत. ऋ. १०.१६१ व १६३ हीं सूक्तें म्हणजे क्षयरोगांतून रोग्याला मुक्त करण्यासाठीं म्हणावयाचे मंत्र होत. औषधींचा उपयोग करतांनासुद्धां मंत्रसामर्थ्याचें साहाय्य घेण्यांत येत असे. सर्प, विंचु इत्यादिकांच्या विषापासून होणारी बाधा टाळण्यासाठीं मंत्रांचाच उपयोग करण्यांत येत असे ( ऋ. १.१९१ ). चंदन इत्यादि खनिज विषांचे परिणाम टाळण्याकरितांहि मंत्र म्हटले जात होते ( ऋ. ७.५० ).

मंत्रतंत्र

वैदिक लोकांमध्यें कांहीं समजुती प्रचलित होत्या. पारवा ( कपोत ) घरांत शिरला असतां अशुभ मानीत असत व त्या अशुभापासून बाधा होऊं नये म्हणून मंत्र म्हणत असत ( ऋ. १०.१६५ ). ऋ. २.४२ व ४३ हीं सूक्तें पक्ष्यांमुळें होणाऱ्या अपशकुनांचें निवारण करण्याकरितां म्हणावयाचीं आहेत. घुबडाचा ( खर्गला– ऋ. ७.१०४.१७, २२, उलूक १०.१६५.४ ) शब्दहि अभद्र मानला जात असे. कपोत हा मृत्यूचा दूत आहे असें म्हटलें आहे. प्रो. रोथ यांच्या मतें कपोत शब्दाचा पारवा हाच अर्थ सर्वत्र आहे असें नाहीं. कारण ऋ. १०. १६५ मध्यें त्याच्याबरोबर घुबडाचा उल्लेख आला आहे. निरनिराळ्या प्रकारची काल्पनिक पीडा देणाऱ्या राक्षसांचा उल्लेख ऋग्वेदांत आहे ( ऋ. ७. १०४, १०.८७, १६२ ). यासंबंधींचे कांहीं उल्लेख अनार्यांना उद्देशून असतील, तथापि अशा कांहीं योनींची कल्पना त्यांनीं केली होती ही गोष्ट खास आहे. सूर्यग्रहणाचा उल्लेख ऋ. ५.४८.४–९ या मंत्रांत आहे. राहु

( स्वर्भानु ) अंधकारानें सूर्याला ग्रासतो व मंत्र म्हटल्यानें सूर्य त्यांतून मुक्त होतो अशी समजूत त्यांत व्यक्त झाली आहे. मंत्रतंत्र, जादूटोणा, यांच्या वरहि लोकांचा विश्वास होता. हा विश्वास बराच प्राचीन असला पाहिजे. कारण इंडो–युरोपियन लोकांमध्यें यांपैकीं कांहीं प्रकार एकसारखे आहेत. त्यामुळें त्यांचें अस्तित्व इंडो–युरोपियन कालांतील ठरतें. ऋग्वेदकालांत मंत्रतंत्रांचा उपयोग बराच केला जात असे. ऋग्वेदांत मंत्रसूक्तें सुमारें तीस आहेत. सवतीपासून होणारा त्रास टाळण्याकरितां आणि रोगांचें व विषाचें निवारण करण्याकरितां मंत्रांचा उपयोग करीत असत. ऋ. ७.५५ मध्यें एक स्त्री रात्रीं प्रियकराला भेटण्याकरितां घरांतून बाहेर पडते, त्यावेळीं घरांतील माणसें व कुत्रा यांनीं जागें होऊं नये म्हणून मंत्र म्हणते. युद्धास निघालेल्या राजाला विजय मिळावा, त्याच्या शत्रूंचा पराजय व्हावा म्हणून त्याचा पुरोहित ऋ. ६.७५ हें सूक्त म्हणतो. सामान्यतः ऋग्वेदांतील मंत्रतंत्रांचा हेतु कल्याणकारक गोष्टी करण्याचा आहे. दुर्बुद्धीनें मंत्रतंत्रांचा प्रयोग करणारांकडे ( यातुधान ) ऋग्वेद तिरस्कारानें पहातो ( ऋ ७.१०४.१५ ). सूर्यासूक्तांत वधूनें शांत असावें, पतीचा घात करूं नये ( अर्थात् मंत्रप्रयोगानें ) असें म्हटलें आहे ( मंत्र ४४ ). गर्भिणी स्त्रीच्या गर्भाचा नाश करणाऱ्या राक्षसाची बाधा टाळून गर्भरक्षण करण्यासाठीं ऋ. १०.१६२ हें सूक्त आहे.

ऋ. ७.१०३ हें मंडूकसूक्त गमतीचें आहे—

( १ ) जणुं कांहीं व्रताचरणी ब्राह्मणच असे वर्षभर झोंपून राहिलेले मंडूक पर्जन्यामुळें आनंदित होऊन शब्द करूं लागले.

( २ ) सुकलेल्या पखालीप्रमाणें असलेल्या सरोवरांत पडलेल्या मंडूकांकडे जेव्हां स्वर्गीय उदक आलें, तेव्हां सवत्स गाईप्रमाणें मंडूकांचा शब्द येथें बाहेर पडूं लागला.

( ३ ) तृषित मंडूकांवर वर्षाकालीं जेव्हां पर्जन्यवृष्टि होते तेव्हां, जसें एकादें बालक पित्याकडे जातें तसा एक मंडूक शब्द करणाऱ्या दुसऱ्या मंडूकाकडे जातो.

( ४ ) जलवर्षावामुळें आनंद झाला असतां एक मंडूक दुसऱ्या मंडूकाकडे जातो. वृष्टीमुळें हर्षित झालेला संमिश्र रंगाचा एक मंडूक दुसऱ्या हरितवर्ण मंडूकाच्या शब्दांत आपला शब्द मिसळतो.

( ५ ) शिष्य ज्याप्रमाणें गुरूचा अनुवाद करतो त्याप्रमाणें एक मंडूक

दुसऱ्या मंडूकाच्या शब्दाप्रमाणें शब्द करतो, आणि त्या वेळेस पाण्यामध्यें प्रचंड संमिश्र ध्वनि उत्पन्न होतो.

( ६ ) एका मंडूकाचा आवाज गाईसारखा आहे. दुसऱ्याचा बोकडासारखा आहे. एकाच्या अंगावर ठिपके ठिपके आहेत व दुसरा एक हिरव्या रंगाचा आहे. त्यांचीं रूपें अनेक प्रकारचीं असलीं तरी मंडूक हें एकच नांव त्यांना आहे. भिन्नभिन्न ठिकाणीं भिन्नभिन्न आवाज करीत ते प्रादुर्भूत होतात.

( ७ ) अतिरात्र नांवाच्या सोमयागांत ज्याप्रमाणें ब्राह्मण मंत्र म्हणतात त्याप्रमाणें जलमय सरोवरासंनिध शब्द करणाऱ्या मंडूकांनो, जेव्हां वर्षाकाल सुरू होतो तेव्हां वर्षाच्या त्या ठराविक दिवशीं तुम्हीं त्या सरोवराभोंवतीं एकत्र जमतां.

( ८ ) सोमपान करणारे ब्राह्मण घामानें भिजत असतांनासुद्धां वार्षिक स्तोत्र म्हणत असतात. त्याप्रमाणें शब्द करीत मंडूक प्रकट होतात. त्यांच्यापैकीं कोणीहि लपून बसत नाहीं.

( ९ ) हे मंडूक देवांच्या आज्ञेचें पालन करीत असतात. बारा महिन्यांतील ऋतूंचे नियम ते मोडीत नाहींत. आणि उष्णतेमुळें त्रस्त झालेले ते वर्षाकाल आला असतां बाहेर पडतात.

( १० ) गाईसारखा शब्द करणारा, बोकडासारखा शब्द करणारा, ठिपक्या ठिपक्यांचा आणि हरितवर्ण अशा सर्व मंडूकांनीं आम्हांस संपत्ति दिली. वर्षाऋतूनंतर त्यांनीं शेकडों गाई दिल्या व आम्हांस दीर्घायुषी केलें.

हें संपूर्ण सूक्त मोठें मजेदार आहे. मंत्र म्हणणाऱ्या ब्राह्मणांचें तें कुत्सापूर्वक विडंबन आहे असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे ( प्रो. डॉयसन, मॅक्समुल्लर, मॅकडोनेल ). परंतु प्रो. ब्लूमफील्ड यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, हें सूक्त म्हणजे एक मंत्र आहे. मंडूक हे पर्जन्य आणतात अशी वैदिक आर्यांची समजूत होती. म्हणून पर्जन्यवृष्टि होण्यासाठीं म्हणावयाचा हा मंत्र आहे. ब्राह्मणांशीं मंडूकांची केलेली तुलना म्हणजे ब्राह्मणांचें विडंबन नव्हे, तर ती मंडूकांची स्तुति आहे.*

## अंत्यसंस्कार

आर्यांचा प्राचीनतर अंत्यसंस्कार म्हणजे मृताला जमिनींत पुरत असत.

* JAOS 17, 1896 pp. 173 off.

पूर्वकालीन अंत्यसंस्कार

इंडो-युरोपियन राष्ट्रांचा प्राचीन अंत्यसंस्कार असाच होता. ऋ. १०.१८ या सूक्तांत हा संस्कार वर्णिलेला आहे. हा संस्कार सामान्यतः असा होताः—विवाहित मृताला घेऊन त्याचे आप्त त्याच्या पत्नीसह स्मशानांत येत असत. प्रेताजवळ पत्नी बसलेली असे. यानंतर त्या सूक्ताच्या विशेष महत्त्वाच्या नसलेल्या पहिल्या दोन ऋचा म्हणण्यांत येत. यानंतर ब्राह्मण-पुरोहित तीन व चार हे दोन मंत्र म्हणून प्रेत व इतर मनुष्यें यांच्यामध्यें एक दगड ठेवीत असे. जिवंत व्यक्ति या मृतापासून भिन्न रहाव्यात व दीर्घकाल जगाव्यात, मृत्यूनें त्यांना अकालीं ग्रासूं नये अशा अर्थाचे पांच व सहा हे मंत्र म्हणण्यांत येत. नंतर तेथें जमलेल्या सुवासिनी स्त्रिया अश्रुपात न करतां अग्नीला हवि अर्पण केल्यानंतर घरीं जात असत ( मंत्र ७ ). नंतर मृतपतीसमीप बसलेल्या पत्नीला तेथून उठून जगांत परत येण्यास सांगण्यांत येई ( मंत्र ८ ). बहुधा मृताच्या पत्नीला घेऊनच स्त्रिया घराकडे जात असाव्यात. नवव्या मंत्रानें पुरोहित प्रेताच्या हातांतील धनुष्य त्याच्या पुत्रादिकांचें रक्षण होण्याकरितां काढून घेई व पुरण्याचे वेळीं मृताला उद्देशून पुढील अर्थाचे चार मंत्र म्हणत असे—

( १० ) या विस्तीर्ण व सुखदायक भूमातेच्या संनिध तूं जा. दक्षिणा देणाऱ्या यजमानाला लोंकरीप्रमाणें मृदु असणारी व तरुण स्त्रीप्रमाणें असलेली भूमि मृत्युदेवतेपासून तुझें संरक्षण करो.

( ११ ) हे पृथ्वी, याच्याकरितां तूं उघडी आणि रुंद हो. याच्यावर फार दाब देऊं नको. याचें स्वागत कर. माता ज्याप्रमाणें बालकाला वस्त्रानें आच्छादिते, त्याप्रमाणें तूं याला आच्छादन घाल.

( १२ ) याला आच्छादणारी पृथ्वी सुस्थिर असो. याच्यावर फेंकलेले हजारों मातीचे कण याच्या सभोंवार असोत. हे याला गृहाप्रमाणें होऊन उदक देवोत. हे याचें नेहमीं रक्षण करोत.

( १३ ) मी तुझ्यावर माती टाकतों; तुला त्रास न देतां मी जमिनींतील ही गर्त बुजवून टाकतों. पितर ही जमीन निश्चल करोत. यम तुजकरितां गृहें निर्माण करो.

प्रो. ओल्डेनबर्ग हे मंत्र दहनसंस्काराकडे लागूं करतात.* वेदोत्तरकालांत

---

* Religion des Veda p. 571.

प्रेताचें दहन करीत व त्यानंतर उरलेल्या अस्थि एका मृत्पात्रांत भरून तें पात्र जमिनींत पुरीत असत. या मृत्पात्राच्या पुरण्याला उद्देशून वरील मंत्र आहेत असें त्यांचें म्हणणें आहे; परंतु तें बरोबर दिसत नाहीं. 'याच्याकरितां उघडी आणि रुंद हो, त्याच्यावर फार दाब देऊं नको' इत्यादि वाक्यें प्रत्यक्ष प्रेताच्या पुरण्यालाच लागू होतात. अस्थि पुरण्याची चाल प्रेत पुरण्याच्या या प्राचीन चालीचा अवशेष असावी. ¶

ऋ. १०.१६ हें सूक्त ( मंत्र १ ते ६ ) ऋग्वेदांतील उत्तरकालीन दहनसंस्काराचें अस्तित्व सिद्ध करतें. चिता रचल्यानंतर

उत्तरकालीन अंत्यसंस्कार

तिचिर प्रेत ठेवण्यांत येई. चिता पेटविल्यानतर पुरोहित प्रार्थना करतो—

( १ ) हे अग्ने, याला जाळूं नकोस अगर तप्त करूं नकोस. त्याचें कातडें किंवा शरीर अस्ताव्यस्त उडूं देऊं नकोस. याला पूर्ण जाळल्यानंतर पितरांकडे पाठीव.

( २ ) सर्वज्ञ अग्ने, हें शरीर पूर्ण जाळतांच याला तूं पितरांकडे पाठवून दे. ज्यावेळीं हें शरीर मृत्यु पावतें, त्याचवेळीं तो देवांच्या स्वाधीन होतो.

( ३ ) हे मृत मनुष्या, तुझा नेत्र सूर्याकडे जावो, प्राण वायूंत जावो, तूं आपल्या पापपुण्याप्रमाणें स्वर्गांत किंवा पृथ्वीवर जा किंवा जळांत जा; अगर तुझ्या कर्मफलानुसार सूक्ष्म शरीरानें वनस्पतींत प्रवेश कर.

( ४ ) हे अग्ने, जन्मरहित असा ( अज–बकरा ? ) हा तुझा अंश आहे. त्याला तूं खाऊन टाक. तुझी तेजस्वी आणि भयंकर ज्वाळा त्याला जाळून टाको. तुझ्या सुखदायक भागानीं या मनुष्याला पुण्यलोकाला पोंचीव.

( ५ ) हे अग्निदेवा, जो मृत तुला स्वधा म्हणून अर्पण केला आहे, त्याला पितराकरितां पुनः उत्पन्न कर. हा पुनः जीव धारण करून शरीर प्राप्त करो. त्याला शरीर प्राप्त होवो.

( ६ ) हे मृतशरीरा, जर तुझें शरीर कावळा, मुंगी, साप किंवा हिंस्र श्वापदें यांनीं तोडलें असेल तर सर्वभक्षक अग्नि तें निर्दोष करो. तसेंच ऋत्विजानीं सेवन केलेला सोम तें शरीर निर्दोष करो.

चौथ्या मंत्रांतील 'अज' या शब्दाचा अर्थ सायणाचार्य जन्मरहित असा

---

¶ Winternitz-p. 96.

करतात व अर्वाचीन ग्रंथकार बकरा असा करतात. हा दुसरा अर्थ बरोबर धरला तर, मृताचें दहन करण्यापूर्वी एक बकरा जाळीत असत (तो बकरा अगोदर पितरांकडे जाऊन मृताच्या आगमनाची सूचना देत असे ) अशी वैदिक काळीं चाल असल्याचें दिसून येतें. ऋ. १०.१८.९ या मंत्रानुसार पुरोहित मृताच्या हातांतील धनुष्य काढून घेई, यावरून त्या काळीं चातुर्वर्ण्य रूढ झालें नसल्याचें दिसून येतें.

## राज्यव्यवस्था

राजाचा अधिकार

' वैदिक राज्यांची उत्पत्ति कुटुंबसंस्थेपासून झाली असल्यामुळें राज्यव्यवस्थेंत राजा हा सत्ताधारी होता. सामान्यतः राजाची गादी वंशपरंपरेनें चालत असे. तथापि कांहीं ठिकाणीं राजा हा निरनिराळ्या प्रदेशांतील समितींकडून निवडला जाई. केव्हां केव्हां शांततेच्या प्रसंगीं राजवंशांतील अनेक पुरुष राज्याधिकार धारण करीत. राजाचा अधिकार केव्हांहि अनिर्बंध नव्हता. तर जनतेच्या मताप्रमाणें राजाला राज्यकारभार चालवावा लागे. जनता आपलें मत राष्ट्रसमितीच्या, जनसमितीच्या व ग्रामसमितीच्या द्वारें प्रकट करीत असे. स्वराज्याविषयींची जनतेची आत्मीय दृष्टि ऋग्वेदांत व्यक्त झाली आहे ( ऋ. ५.६६.६ ). शांततेच्या प्रसंगीं राजा हा प्रजेचा रक्षक आणि न्यायाधीश असे. प्रजा त्याच्या आज्ञेंत वागत असे व प्रसंगविशेषीं त्याला नजराणे देत असे. ठराविक कर देण्याची पद्धति नव्हती. युद्धप्रसंगीं तो मुख्य सेनापति असे आणि युद्धापूर्वीं आपल्या राष्ट्राकरितां स्वतः यज्ञ करणें अगर आपल्या पुरोहिताकरवीं तो कराविणें हें त्याचें कर्तव्य असे. राजानें स्वतः यज्ञ करण्यापेक्षां पुरोहिताकडून तो करविण्याच्या या चालींतच जातिभेदाचा आणि ब्राह्मणजातीच्या श्रेष्ठत्वाचा उगम आहे. '*

ग्रामिक कारभार

वैदिक काळीं लहानलहान राष्ट्रें होतीं. राष्ट्र, जन आणि विश् असा समाजव्यवस्थेच्या दृष्टीनें वरून खालीं क्रम होता असें बहुतेक ग्रंथकारांचें मत आहे. तथापि प्रो. कीथ यांस तें मान्य नाहीं. त्यांच्या मतें या शब्दांना अशा प्रकारचा मर्यादित अर्थ त्यावेळीं नव्हता. विश् हा शब्द राज्यव्यवस्थेकरितां

---

* A. Kaegi–Rgveda p. 17.

उपयोगांत आणलेला नाहीं. ‘ ग्रामणी ’ हा ग्रामाचा प्रमुख अधिकारी होता ( ऋ. १०.६२.११, १०७.५ ). व शांततेच्या कालांतील आणि युद्धकालांतील अशा दोन्ही सत्ता त्याच्या हातीं एकवटल्या होत्या.

राजाचीं निवासस्थानें; युद्धप्रसंग

ज्या ठिकाणीं राजाची नेमणूक आनुवंशिक होत असे, त्या ठिकाणींसुद्धां त्याच्या नेमणुकीला प्रजेची संमति लागे. इतर कांहीं ठिकाणीं तर प्रत्यक्ष प्रजाच राजा निवडत असे. राजाचें निवासस्थान इतरांच्याहून भव्य असे. राजाचे बंदीजन असत व ते त्याची स्तुति करीत ( ऋ. १०.४०.३ ) त्याच्या बरोबर त्याचा लवाजमा असे. त्यांत राजवंशांतील इतर पुरुष व कांहीं रजवाडे यांचा समावेश होत असे. राजाचा चरितार्थ त्याला मिळालेल्या नजराण्यांवर चालत असे. युद्धांत मिळालेली लूट राजा आणि इतर अधिकारी व सैनिक यांच्यामध्यें वांटण्यांत येत असे. जमिनीवर मालकी राजाची नव्हती. सर्व प्रकारचा न्याय सल्लागारांच्या मदतीनें राजा करीत असे. युद्धांत प्रमुख अधिकारी म्हणून एक सेनानी नेमण्यांत येत असे. त्याच्या हाताखालीं निरनिराळ्या गांवांचे अधिकारी असत. शत्रूकडील व प्रजेंतील गुप्त बातमी आणण्याकरितां हेर नेमलेले असत असें वरुणाच्या हेरांच्या ( स्पश् ) उल्लेखावरून म्हणण्यास हरकत नाहीं. मोठ्या शत्रूशीं युद्धप्रसंग असतां अनेक आर्य राजे एकत्र होत असत ( ऋ. १०.९७.६ ). शांततेच्या वेळीं त्यांचा परस्परसंबंध विशेष नसे. त्यांच्यामध्यें सामान्यतः सलोखा असे, परंतु कांहीं आर्यराजांमध्येंहि युद्धें होत असत. सरस्वतीनदीच्या तीरावर थोडेच राजे असल्याचा उल्लेख एका मंत्रांत आलेला आहे ( ऋ. ८.२१.१८ ).

राज्यकारभार

राज्यकारभारांत राजाला सल्ला देण्यास एक समिति असे. ‘समिति ’ आणि ‘ सभा ’ असे दोन शब्द ऋग्वेदांत आढळतात. प्रो. लुडविग यांच्या मतें समिति म्हणजे सबंध राष्ट्रांतील लोकांची सभा व ‘ सभा ’ म्हणजे कांहीं मर्यादित विचारवंत लोकांचें मंडळ होय. प्रो. झिमर यांच्या मतें ‘ समिति ’ म्हणजे राष्ट्रप्रतिनिधींची सभा व ‘ सभा ’ म्हणजे ग्रामांतील लोकांचें मंडळ. प्रो. कीथ यांच्या मतें ‘ समिति ’ म्हणजे राष्ट्राचें कामकाज पहाणाऱ्या लोकांचें मंडळ व ‘ सभा ’ म्हणजे त्यांच्या बैठकीची जागा. याच जागेमध्यें उत्सव-समारंभ वगैरे साजरे होत असत.

राजाचा राज्याभिषेक व त्याला दिलेला आशीर्वाद यासंबंधीं ऋ. १०.१७३ व १७४ हीं सूक्तें महत्त्वाचीं आहेत. त्यांपैकीं १७३ व्या सूक्ताचें भाषांतर खालीं दिलें आहे:--

( १ ) हे राजा, आम्हीं तुला उदयाला आणलें आहे. तूं आमचा राजा हो. तूं नित्य आणि स्थिर रहा. सर्व लोक तूं राजा असावास अशी इच्छा करोत. तुझ्यापासून राज्य वियुक्त होऊं नये.

( २ ) राजा, तूं येथेंच अस, च्युत होऊं नकोस. पर्वतासारखा स्थिर ऐस. इंद्राप्रमाणें पृथ्वीवर स्थिर रहा व राष्ट्राचें संरक्षण कर.

( ३ ) हविर्द्रव्यानें संतुष्ट झालेला इंद्र या अभिषिक्त राजास स्थिर करो. सोम आणि ब्रह्मणस्पति त्याला आपला मानोत.

( ४ ) आकाश, पृथ्वी आणि पर्वत ज्याप्रमाणें अचल आहेत, त्याप्रमाणें लोकांचा हा राजा कायम टिको.

( ५ ) वरुण, बृहस्पति, इंद्र आणि अग्नि तुला राज्यावर स्थिर करोत आणि तुझें राष्ट्रहि स्थिर करोत.

( ६ ) हविर्द्रव्यांनीं आम्हीं सोम उत्पन्न करूं. इंद्राच्या कृपेनें सर्व प्रजा तुलाच नजराणे देवोत.

**नगर व ग्राम**

लोकांची वसति मुख्यत्वेंकरून खेड्यांतून होती ( ऋ. १.११४.१; १०. १४६.१ इ. ) नगरांचे उल्लेख ( पुर् ) ऋग्वेदांत पुष्कळ आहेत. शंभर दगडी नगरांचा उल्लेख ऋ. ४.३०.२० मध्यें आहे. लोहनगरांचे उल्लेखहि पुष्कळ आहेत ( ऋ. १.५८.८ इ. ). शतद्वारांच्या नगराचा उल्लेख ऋ. १.१६६.८ व ७.१५.१४ या दोन मंत्रांत आहे. हे उल्लेख काल्पनिक मानले तरी त्यावरून तत्सदृश नगरांचें त्याकाळीं अस्तित्व सिद्ध होतें. अर्थात् राजा हा नगरांत रहात असे. नगराधिपतीचा उल्लेख आलेला आहे ( पूर्पति--ऋ. १. १७३.१० ).

## गुन्हे व शिक्षा

**दासवृत्ति**

ऋग्वेदकाळीं श्रीमंत व गरीब असा भेदभाव असल्याचें दिसून येतें. कांहीं लोक अत्यंत गरीब होते ( ऋ. ८.६०.२०, १०. ४२. १० ). गरीबांना दानधर्म करावा असें अनेक ठिकाणीं म्हटलें आहे ( ऋ. १०.१०७, ११७ ).

गुलाम ( दास ) ठेवण्याची पद्धति त्यावेळीं होती ( ऋ. १.९२.८ ). राजे पुरोहितांना दान म्हणून दास देत असत. परंतु गुलामांचा बाजार अस्तित्वांत नव्हता. दासवृत्ति हा धनोत्पादनाचा धंदा नव्हता. गुलामांच्या बाजाराच्या अभावावरून दास ठेवणें सार्वत्रिक नसल्याचें दिसून येतें. ऋण काढण्याच्या पद्धतींचें अस्तित्व ऋग्वेदांत दिसून येतें (ऋ. २.२७.४). ऋण हप्त्याहप्त्यानें फेडीत असत ( ऋ. ८.४७. १७ ). द्यूतप्रसंगीं कर्ज काढीत असत ( ऋ. १० ३४.१० ). कर्जावर व्याज घेण्याची पद्धति असावीसें वाटतें. कर्जाची रक्कम परत न केल्यास ऋणकोला धनकोचें दास्य करावें लागे किंवा त्याच्या बांधवांनीं त्याचें कर्ज फेडावें म्हणून ऋणकोला खांबाला ( द्रुपद ) बांधून ठेवीत ( ऋ. १०.३४.४ ). अशा वेळीं त्याचे बांधव कर्ज फेडीत असावेत ( ऋ.४. ३.१३ ). ऋणको आणि धनको यांच्यामध्यें एक मध्यस्थ ( मध्यमशीः ) असे.

सामाजिक गुन्हे

नैतिक गुन्हे कोणते समजण्यांत येत, तें मागें लिहिलेंच आहे. चोरी, लबाडी, व्यभिचार, जादूटोणा हे सामाजिक गुन्हे समजले जात. या गुन्हेगारांना शिक्षा देण्यांत येई. चोरी करणारांचे अनेक प्रकार आढळतात. तायु, तस्कर, स्तेन, परिपंथिन्, हुराश्चित् व मुषीवत् इतकीं चोराचीं नांवें ऋग्वेदांत आहेत. तस्कर ( ऋ. ७.५५.३ ) म्हणजे दरोडेखोर. स्तेन ( ऋ. २.२८.१० १०.९७.१०) म्हणजे सामान्य चोर. चोर रात्रींचे हिंडत असत (ऋ. १.१९१. ५ ). त्यांना रस्ते माहीत असत ( ऋ. ८.२९.६ ) व त्या रस्त्यांनीं बिनचूक जाऊन ते घरें फोडीत असत. ऋ. १०.४.६ या मंत्रांत दोरानीं बांधल्याचा उल्लेख आहे, परंतु तो चोरांनीं घरमालकास बांधल्याचा आहे कीं शिक्षा म्हणून पकडलेल्या चोरास बांधल्याचा आहे हें स्पष्टपणें समजत नाहीं. तायु म्हणजे गुरें चोरणारा ( ऋ. १.५०.२, ७.८६.५ ). चोर कपडेहि चोरीत ( वस्त्रमाथि ऋ. ४.३८.५ ). परिपंथिन् म्हणजे वाटमारे. या सर्व गुन्हेगारांना खांबाला दोरांनीं बांधून ठेवीत असत. याहून जास्त माहिती मिळत नाहीं.

## उद्योगधंदे

वेदिक काळीं उद्योगधंदे व कलाकौशल्य यांची बरीच वाढ झाली होती. अनेक धंद्यांचे उल्लेख ऋग्वेदांत आले आहेत. सर्व धंद्यांमध्यें लाकूडकाम करणाऱ्या सुताराचा धंदा मानाचा समजला जात असे. युद्धांत आणि शर्यतींत

सुतारकाम

उपयोगांत आणावयाचे रथ, गाड्या, नावा इत्यादि वस्तु तो तयार करीत असे. सुतार या अर्थी तक्षन् ( तशन्–झेंद, टेक्टेन–ग्रीक ) व त्वष्टा असे दोन शब्द आहेत. लांकूड कापणें, सांधे जोडणें व चाकें कातणें हीं सर्व कामें एकच सुतार करीत असे. ऋषींनीं आपल्या सूक्तरचनेला सुताराच्या चाक तयार करण्याची उपमा वारंवार दिलेली आहे.

रथ आणि गाडी

' बैलगाडी ( अनस् ) व रथ यांच्या रचनेंत काय फरक होता हें समजण्यास मार्ग नाहीं. किंबहुना फरक होता कीं नाहीं, हेंहि निश्चित समजत नाहीं. रथाच्या चाकांच्या तुंब्यांतील छिद्र हें गाडीच्या चाकाच्या छिद्रापेक्षां मोठें होतें एवढी माहिती मिळते ( ऋ. ८.९१.७ ). रथाला दोन चाकें असत. चाकाला धाव ( पवि ), परिघ ( प्रधि ), अरे ( अरा ) व तुंबा ( नभ्य ) इतके भाग असत ( ऋ. ३.५३.१७, १९, २.३९.४ ). पवि व प्रधि मिळून होणाऱ्या भागाला ' नेमि ' म्हणत असत. तुंब्यांतील कणा घालावयाच्या भोंकाला ' ख ' म्हणत असत. त्या भोंकांत कणा अडकविला जात असे. ' आणि ' असा एक शब्द ऋग्वेदांत येतो. या शब्दानें कण्याचें टोंक अभिप्रेत आहे कीं, कण्यांतून चाक निसटूं नये म्हणून त्यांत अडकवावयाची पाचर अभिप्रेत आहे हें निश्चितपणें समजत नाहीं. कधींकधीं चाक भरींव असे. कण्याच्या दोन्ही टोंकांना चाकें फिरत असत. रथाचा वरील सर्व भाग ( कोश ) कण्यावर अधिष्ठित असे. कोश या शब्दाऐवजीं ' वंधुर ' हा शब्दहि केव्हां केव्हां वापरण्यांत आला आहे. परंतु त्या शब्दाचा खरा अर्थ रथांतील बैठक असा आहे. तीन चाकांचा रथ हा केवळ काल्पनिक आहे. योद्ध्याच्या बसावयाच्या जागेला ' गर्त ' असें नांव आहे. कण्याशीं काटकोन करून मधोमध एक दांडा ( ईषा, प्रउग ) जोडलेला असे. त्याच्या दोन्ही बाजूंस दोन घोडे जुंपण्यांत येत. घोड्यांच्या मानेवर जूं ( युग ) ठेवण्यांत येत असे. मधला दांडा जुवांच्या भोंकांत अडकविला जात असे आणि जूं व दांडा एकत्र बांधीत असत ( ऋ. १०.६०.८ ). जुंवांत जुंपण्या अडकविलेल्या असत व त्यांमध्यें घोड्याची मान अडकविलेली असे. घोड्याचे खांदे लगामानें बांधलेले असत. घोड्यांना वळविण्याकरितां लगाम ( रश्मि, रशना) असत. घोड्याच्या तोंडांत एक खीळ घातलेली असे व तिला लगाम बांधलेले असत. घोडे ताब्यांत ठेवण्याकरितां चाबूक वापरण्यांत येई ( ऋ. ९.

८३.३, ६.७५.१३ ). सामान्यतः रथाला दोन घोडे जुंपीत, परंतु प्रसंग-विशेषीं तीन किंवा चारहि घोडे जुंपीत ( ऋ. १०.३३.५ ). 'प्रष्टि' हें तिसऱ्या घोड्याचें नांव असे ( ऋ. १.३९.६, ८.७.२८ ). घोड्याच्या कांखे-खालून येणाऱ्या दोरीला 'कक्ष्या' ( ऋ. १०.१०.१३ ) म्हणत. तिसरा घोडा जेव्हां जुंपीत तेव्हां तो दोघांच्या पुढें जोडीत कीं, त्यांच्या बाजूला जोडीत हें स्पष्टपणें समजत नाहीं. कदाचित् दोन्ही पद्धति प्रचारांत असाव्यात रथाला बहुधा घोडे जुंपीत, परंतु गाढवेंहि जोडल्याचा उल्लेख आढळतो ( ऋ. १.१६२.२१ ). गाडीला बैल जुंपीत असत व यावरून बैलाला 'अनड्-वाह' हा शब्द योजला जाई. एखादा गरीब मनुष्य दारिद्र्यामुळें रथाला एकच घोडा जुंपीत असे ( स्थूरि:—ऋ. १०.१३१.३ ). अशा वेळीं तो दोन दांड्यांच्या मध्यें जोडला जाई व त्या दांड्यांना जूं बांधलेलें असे. ' ( ऋ ६.१५.१९ इ. ).

'सारथि हा रथामध्यें उजव्या बाजूस उभा राही व रथी हा डाव्या बाजूस उभा राही. जरूरी वाटेल तेव्हां तो रथांत बसूंहि शके. कारण रथांत बैठकीची जागा असे. विशेषत: धनुष्यानें युद्ध करीत असतां बाण मारण्यांत सोपें पडावें म्हणून तो बसत असे. रथावर आच्छादन म्हणून कातडें घालीत. ( ऋ. ६.४७.२६ ).*

घरें बांधतांना जरूर तें लांकूडकाम सुतार करीत असे. लहानमोठ्या नावाहि तो बांधीत असे. बहुधा झाडाचा बुंध पोंखरून त्याची नाव तयार करीत. ती चालविण्या करितां वल्हीं वापरीत ( ऋ. १०.१०१.२ ). शंभर वल्ह्यांच्या नावेचा उल्लेख आहे. ( ऋ. १.११६.४ ). शीड व डोलकाठ्या यांचा उल्लेख नाहीं. सुकाणूं होतें. कर्णधाराचा उल्लेख आढळतो ( ऋ.२.४२ १ ). पुष्कळ माणसें बसूं शकतील अशा प्रकारची मोठी आणि डौलदा नावाहि ते तयार करूं शकत असें वाटतें. कारण नौकानयनाच्या सुखाच अनुभव एका मंत्रांत व्यक्त केलेला आहे. ( ऋ. ७.८८.३ ). यावरून लांकड फळ्यांच्या मोठ्या नावाहि ते तयार करीत असावेत. रथ तयार करण्याच्य त्यांच्या कौशल्यावरून अशा प्रकारची कल्पना करण्यास हरकत नाहीं. सम् द्रांत नावा जात असत ( ऋ. १.२५.७, ७.८८.३ ).

नावा

* Macdonell & Keith–Vedic Index.

सोनें ( हिरण्य ), रुपें ( रजत ), तांबें आणि लोखंड इतक्या धातूंचा शोध लागला होता. नदीच्या वाळूंतून सोनें काढीत असत. सिंधुनदींतून सोनें फार निघत असे. 'अयस्' हा शब्द तांबें आणि लोखंड या दोहोंचाहि वाचक आहे. ताम्रधातूचा शोध फार प्राचीनकाळीं लागला होता. वैदिक आर्यांना लोखंड हा धातुहि माहीत होता ( ऋ. ४.२ १७ ) व लोखंडापासून पोलाद तयार करून त्याचा व्यवहारांत सार्वत्रिक उपयोग करीत. * ऋग्वेदकाळीं धिषणा, दृषद्, स्फ्य इत्यादि कांहीं यज्ञिय साधनें दगडाचीं होतीं. हा अश्मयुगाचा अवशेष समजण्यास हरकत नाहीं. S ऋग्वेदकालची धातु बनविण्याची पद्धति लोखंडाच्या मातीपासून पोलाद बनविण्यास समर्थ होती असें धातुशास्त्रज्ञांचें मत आहे ( ऋ. ९.९.५, ६.३.५ ). सुरी, तरवार, कुऱ्हाड, वगैरे आयुधें तांब्याचीं किंवा पोलादाचीं असत. कारागीर या अर्थी 'कर्मार' हा शब्द ऋग्वेदांत ( ४.२.१७, १०.७२.२ ) आला आहे.

धातुकाम

वैदिक लोक दाढीमिशा राखीत ( ऋ. १०.२३.१ ). कधींकधीं हजामत करवीत. न्हाव्याचा उल्लेख आहे ( वप्तृ–ऋ. १०.१४२.४ ). तो वस्तऱ्यानें सबंध हजामत करीत असे (क्षुर–ऋ. १. १६६.१०, ८.४.१६, १०.२८.९). अर्थात् वस्तरा पोलादी असल्यामुळें त्याला उत्तम धार येत असे. कातड्यांचें काम करण्यांत येत असे ( ऋ. १.८५.९, ६.८.३, ७.६३.१ ). पाणी व सुरा ठेवण्याकरितां कातड्याच्या पिशव्या करीत असत. ( दृति–ऋ. ४.४५.१, ३, ५.८३.७ इ. ). दोर वळून तयार करण्यांत येत होते. ( ऋ. १.१६२.८, ७.८४.२ इ. ).

## वस्त्रालंकार

लोंकर व कापूस यांपासून सूत कातण्याची व तें विणण्याची कला त्यांना माहीत होती. मंत्ररचनेचें 'वे' विणणें या धातूनें रूपात्मक वर्णन करण्यांत येतें ( ऋ. १.६१.८, ७.३३.९, १२ ). लोंकर उपयोगांत येत होती

कापूस माहीत होता

---

* Manindranath Banerji–A note on iron in Rgvedic Age–Indian Historical Quarterly, June 1932.

S Prof. S. V. Venkateshwar A.I. Ori. Conference 1924.

याबद्दल वादच नाहीं ( ऋ. १.१२६.७, ६.१५.१६, १०.७५.८ ). कापसाचा उल्लेख ऋग्वेदांत नाहीं, तेव्हां कापूस त्यांना माहीत नव्हता असें कांहींचें मत आहे; परंतु तें बरोबर नाहीं. हिंदुस्थानांत प्रारंभापासून उत्पन्न होणारा कापूस सूक्तरचनाकाळीं माहीत नव्हता व हिंदुस्थानांतील उष्ण हवामानाला अत्यंत जरूर असे कपडे त्यांना विणतां येत नव्हते अशी कल्पना उल्लेखाभावावरून करतां येणार नाहीं. कापसाच्या ज्ञानाविषयीं व उपयोगाविषयीं एक बलवत्तर पुरावा मागें दुसऱ्या विभागांत आलेलाच आहे. द्राविडियन आणि सुमेरियन यांच्या व्यापारी दळणवळणामध्यें आर्य लोकांनीं विणलेली तलम मलमल बॅबिलोनियामध्यें जात असे. यावरून आर्यांना कापूस कातून त्याचीं वस्त्रें विणण्याचें ज्ञान ऋग्वेदकालीं होतें ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध होते.

वस्त्रें

लोंकरीचें व कापसाचें सूत कातून तें विणणें हीं कामें स्त्रीपुरुष दोघेहि करीत ( ऋ. २.३.६, ३८.४, ५.४७.६, १०.७१.९ इ. ) कापड विणण्याच्या सुताच्या उभ्या व आडव्या धाग्यांना ' तंतु ' व ' ओतु ' अशीं नांवें होतीं ( ऋ. ६.९.२ ). सूत विणतांना त्याला खळ लावण्यांत येत असे ( ऋ. १.१०५.८, १०.३३.२ ). कपडे करावयास शिंपी होते. स्त्रीपुरुषांचे पोषाख कशा प्रकारचे होते तें निश्चित समजत नाहीं. पुष्कळांचें मत असें आहे कीं, अधरीय व उत्तरीय अशीं दोन वस्त्रें पुरुष वापरीत. परंतु राजे व श्रीमंत लोक एवढ्याच वस्त्रांवर खूष असतील असें वाटत नाहीं, असेंहि एक मत आहे.* ज्याअर्थीं शिंपी होते आणि शिवणकला अस्तित्वांत होती ( ऋ. २.३२.४ ) त्याअर्थीं कपडे अगदींच साधे नसावेत. वस्त्रांचे पुष्कळच उल्लेख आले आहेत. सुंदर पोषाखाचें वर्णन ऋ. ५.२९ १५, १०.११.४ यांत आढळतें. स्त्रियांचा पोषाख कसा होता हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. सुंदर वस्त्रें नेसलेल्या स्त्रियांचे उल्लेख अनेक सांपडतात. ( ऋ. ८.४६.३३ इ. )

शिरोभूषण

' आर्य डोक्यावर कांहीं घालीत नव्हते. शिरस्त्राण ( पगडी ) वापरण्याची पद्धति त्यांनीं अनार्यांपासून उचलली. ' शिप्रा ' नांवाच्या शिरस्त्राणाचा ऋग्वेदांत उल्लेख आहे. तें फक्त युद्धप्रसंगीं वापरीत. त्यानें नाक व कानशील हीं झांकलीं जात. ऋग्वेदांत

---

* R. L. Mitra – Indo-Aryans Vol. I. p. 177.

पादत्राणांचा उल्लेख नाहीं. स्त्रीपुरुषांच्या केशरचनेच्या पद्धति मूळ आर्यांच्या नव्हत्या. द्राविडियनांपासून त्यांनीं त्या उचलल्या. 'ओपश' आणि 'कपर्द' ( ऋ. १.१७३.६, ६.५३.९ ) हे केशरचनाविशेष होते. सगळे केंस एकत्र करून त्यांची शेवटीं गांठ मारीत असत; याला 'ओपश' किंवा 'अवपश' असें नांव होतें. 'कपर्द' हाहि एक केशरचनाप्रकार होता. स्त्रीपुरुष दोघेहि अशी केशरचना करीत. या पद्धतींत केंस गोलाकार ( Shell-like ) होत असत. पूषन् आणि रुद्र यांची केशरचना कपर्दाप्रमाणें कल्पिलेली आहे ( ऋ. १.११४.१, ५, ६.५५.२, २.६७.११ ).वसिष्ठकुलोत्पन्न ब्राह्मण आपल्या केंसांची गांठ उजव्या बाजूस मारीत असत ( दक्षिणतस्कपर्दाः—ऋ. ७.३३.१ ). ज्या स्त्रियांचे केंस लांब सडक होते त्या चार चार कपर्द बांधून आपले केंस शोभिवंत करीत ( ऋ. १०.११४.३ ). 'स्तोका' आणि 'कुरीर' हे फक्त स्त्रियांचे शृंगारविशेष होते.* 'कुरीर' हें काय होतें याबद्दल अनेक मतें आहेत. प्रो.ब्लूमफील्ड यांच्या मतें तें एक स्त्रियांचें वस्त्र होतें व प्रो. झिमेर यांच्या मतें तो एक डोक्यांत घालावयाचा दागिना होता.

सोन्याचे आणि चांदीचे दागिने करीत असत. गरीब लोक तांब्याचे करीत.

अलंकार

सोनाराचा उल्लेख ( ऋ. ८.४७.१५ ) यांत आला आहे. 'निष्क' हा गळ्यांत घालावयाचा दागिना होता ( ऋ ५.१९.३ ). हातांत आणि पायांत सोन्याचीं अगर चांदीचीं कडीं घालीत असत ( ऋ. १.१६८.३, ५.५४.११, ५८.२). सोन्याचे हार गळ्यांत घालीत असत. ( रुक्म–ऋ. ५.५३.४ ). कानामध्येंहि कांहीं अलंकार घालीत असत ( कर्णशोभना–ऋ. १.१२२.१४, ८.७८.३ ). दागिन्यांमध्यें रत्नांचाहि उपयोग करण्यांत येई ( ऋ. १.३३.८ ). हिमालय पर्वत व बाल्हीक देश यांत रत्नें सांपडत असत. 'मणि' हा रत्नाला सामान्य शब्द आहे. मोत्यें फार होतीं. मोत्यांच्या माळांचा उल्लेख आहे. मोत्यें इतकीं होतीं कीं, घोड्यांच्या गळ्यांत मोत्यांच्या माळा घालीत. सोन्याचे अलंकारहि घोड्यावर घालीत ( ऋ. ४.२.८ ). पुरुष कांहीं दागिने घालीत. कांहीं दागिने पुरुषांना व स्त्रियांना समान होते. अलंकारासंबंधीचें प्रेम कांहीं मंत्रांत दिसून येतें. ( ऋ. १.८५.१, ९२.४, १०.१.६ ).

---

* डॉ. सुविमलचंद्र सरकार-वेदकालीन शिरोभूषण और पदत्राण–'गंगा' पुरातत्त्वांक १९३३.

## अर्थशास्त्र

ऋग्वेदाच्या प्राथमिक कालांतील आर्यांची रहाणी साधी होती. त्यांत विलासी वृत्ति कमी होती, तसेंच गरजेच्या वस्तूंची दुर्मिळताहि नव्हती. मनुष्याच्या गरजा थोड्या होत्या व स्वतःच्या परिश्रमानें तो त्या भागवीत असे. परंतु ही स्थिति फार दिवस टिकली नाही. हळुहळु लोकांच्या गरजा वाढूं लागल्या, त्यामुळें मालाची निपज जास्त होऊन संपत्ति वाढूं लागली. संस्कृतीच्या वृद्धीबरोबर सामाजिक जीवन गुंतागुंतीचें झालें. वाढत्या गरजाबरोबर निरनिराळे उद्योगधंदे वाढले. समाजाचे निरनिराळे घटक निरनिराळे धंदे करूं लागले. श्रमविभागाचें तत्त्व अमलांत आलें व त्यामुळें कारागिरांचे अनेक प्रकार निर्माण झाले.

उद्योगस्वातंत्र्य

सामान्यतः बापाचा धंदा मुलगा पुढें चालवीत असला तरी उद्योगस्वातंत्र्य पूर्णपणें अस्तित्वांत होतें. कोणीहि कोणताहि धंदा करूं शके. ऋ. ९.११२ या सूक्तांवरून धंदेवाईक लोकांच्या स्वभाव निरीक्षणाबरोबरच उद्योग स्वातंत्र्यहि स्पष्टपणें दिसून येतें—

( १ ) हे सोमा, आमचीं कार्यें अनेक प्रकारचीं आहेत. तसेंच इतर लोकांचीं कर्मेंहि विविध आहेत. सुतार लांकूड तासण्याची, वैद्य रोगाची व ब्राह्मण सोमयाजी यजमानाची इच्छा करतो. हे सोमा, तूं इंद्राकरितां वहा.

( २ ) वाळलेल्या लांकडांनीं, पक्ष्यांच्या पिसांनीं आणि धार लावण्याच्या दगडांनीं बाण तयार केले जातात. ते करणारा लोहार श्रीमंत माणसाची इच्छा करतो. सोमा, तूं इंद्राकरितां वहा.

( ३ ) मी एक कवि आहें. माझे वडील वैद्य आहेत. आई कांडण्याचें काम करते. गाई जशा गोठ्याकडे धांवतात तसे निरनिराळीं कामें करणारे आम्हीं पैशाच्या मागें धांवतों. हे सोमा, तूं इंद्राकरितां वहा.

( ४ ) घोडा गाडी हलकी असावी अशी इच्छा करतो. खुशामते लोक राजाच्या हास्यतुषारांची अपेक्षा करतात. बेडूक पाण्याची इच्छा करतात. हे सोमा, तूं इंद्राकरितां वहा.

व्यापार

एक धंदा सोडून दुसरा धंदा स्वीकारण्याच्या स्वातंत्र्यावरून सर्व धंद्यांना सारखा मान असल्याचें दिसून येतें. लांकूडकाम करणाऱ्या सुताराला जास्त महत्त्व असण्याचें कारण त्यानें निर्माण केलेल्या वस्तूंचें महत्त्व हें होय. शेत-

करी, कारागीर व हस्तकौशल्याचे पदार्थ करणारे लोक यांचा दर्जा कोणत्याहि प्रकारें कमी मानण्यांत येत नव्हता. वस्तु चांगल्या आणि पुष्कळ निर्माण होऊं लागल्यामुळें व्यापाराची वाढ होऊं शकली. देशांतला अंतर्गत व्यापार जमिनीवरून व नद्यांतून होत असे. सुमेरिया, ईजिप्त वगैरे देशांशीं चाललेला व्यापार द्राविडियन लोकांच्या द्वारें समुद्रांतून चालत असे. मना ( ऋ.८.७८.२; Mina-Greek & Latin ) हें सुवर्णनाणें बॅबिलोनियांतून हिंदुस्थानांत आले. ' पणि ' हा शब्द ऋग्वेदांत अनेकवार आला आहे. पुष्कळशा ग्रंथकारांच्या मतानें तो ' पण् ' धातूपासून निघालेला असून व्यापारी असा त्याचा अर्थ आहे. प्रो. लुडविग यांच्या मतें पणि हे अनार्य व्यापारी होत व हाच अर्थ सयुक्तिक दिसतो. कारण द्राविडियन लोक हे व्यापारी होते. शिवाय मृध्रवाक्, अयज्यु इत्यादि त्यांच्या विशेषणांबरोबर पणि हा शब्द झाला आहे.

देवघेव

विक्रेता आणि ग्राहक यांच्या देवघेवीसंबंधीं एक मजेदार उल्लेख ऋ. ४. २४.९ या मंत्रांत आला आहे. एका विक्रेत्याला एका ग्राहकाकडून पदार्थाची किंमत त्याच्या मूळ किंमतीपेक्षां फारच कमी मिळाली तेव्हां त्यानें जास्त किंमत मागितली. ' हा जिन्नस मी अजून विकलेलाच नाहीं ' असें तो म्हणाला व ती कमी किंमत त्यानें स्वीकारली नाहीं. कवि या ठिकाणीं म्हणतो कीं, शहाणे आणि अज्ञानी असे दोघेहि पदार्थाच्या किंमतीविषयीं भांडतात आणि प्रत्यक्ष खरेदीविक्रीच्या वेळीं शेवटीं ठरलेली किंमत देतात व घेतात.

विनिमयसामान्य होतें

व्यापारी देवघेवीसंबंधीं सर्वसामान्य मत असें प्रचलित आहे कीं, प्रत्यक्ष-वस्तूंची देवघेव ( Barter ) चालत असे; विनिमयसामान्य नव्हतें. परंतु हें मत चुकीचें आहे. गाय हें विनिमयसामान्य होतें. याशिवाय ' निष्क ' या धात्वात्मक चलनाचा उल्लेख आढळतो ( ऋ. २.३३.१० ). भावयव्य राजानें कक्षीवानाला शंभर ' निष्क ' दिले असें ऋ. १.१२६.२ या मंत्रांत म्हटलें आहे. यासंबंधीं प्रो० मॅकडोनेल आणि कीथ * म्हणतात कीं, ऋग्वेदकाळीं ' निष्क ' हें चलन असल्याचें दिसून येतें. कारण एका ऋषीनें आपणांस शंभर निष्क मिळाल्याचें म्हटलें आहे. अंगावर घालावयाचे दागिने म्हणून शंभर निष्कांची

---

* Vedic Index. Vol. I p. 454.

कांहीं त्याला जरुरी नव्हती. प्रो. विल्सन यांनीं हेंच मत प्रकट केलें आहे.

' निष्क म्हणजे सोन्याचे नुसते गोळे अगर तुकडे होते कीं काय ? ऋ. २.३३ या सूक्ताच्या संबंधांत डॉ. दे. रा. भांडारकरांनीं दाखवून दिल्याप्रमाणें या प्रश्नाचें उत्तर मिळतें. रुद्राच्या गळ्यांत निष्क ( कंठा ) आहे व तो ' विश्वरूप ' आहे असें त्यांत म्हटलें आहे. ' विश्वरूप ' या शब्दाचा अर्थ काय ? अनेक स्वरूपें असा त्याचा अर्थ होणें शक्य नाहीं. कारण त्यामुळें कांहींच बोध होत नाहीं. नाणें आणि कंठा असे निष्क या शब्दाचे दोन अर्थ आहेत. या शृंगापत्तींतून कसें सुटावयाचें ? निष्क हें चलन होतेंच, परंतु अनेक निष्कांच्या योगानें बनाविलेल्या कंठ्यालाहि निष्क हेंच नांव होतें असा अर्थ केला म्हणजे हें कोडें उलगडतें. महाराष्ट्रांत गरीब लोक जशी पुतळ्यांची माळ करून गळ्यांत घालतात तशा प्रकारचा हा अलंकार असावा. ' विश्वरूप ' या शब्दाचाहि अर्थ आतां बरोबर जमतो. 'रूप' म्हणजे नाण्यावरील आकृति. रुद्राच्या गळ्यांतील कंठ्याच्या निष्कांवर निरनिराळ्या आकृति काढल्या होत्या. तेव्हां साहजिकच तो कंठा ' विश्वरूप ' होता. हिंदुस्थानांत सांपडलेल्या सर्वांत प्राचीन नाण्यांना भोंकें पाडलेलीं आढळतात व त्यांच्यावर तीनशेंहून जास्त आकृति आढळतात. यावरून ऋग्वेदकाळांत नाण्यावर छाप मारून आणि त्यांना भोंकें पाडून त्यांची माळ करून गळ्यांत घालीत असणें अशक्य नाहीं. अशा रीतीनें ऋग्वेदकालीं धातूंच्या तुकड्यांचें अगर गोळ्यांचें चलन ( Bullion currency ) नव्हतें; तर धात्वात्मक नाण्यांचें चलन होतें. तथापि याशिवाय त्या काळांत छाप नसलेलें धात्वात्मक चलनहि प्रचारांत होतें. ऋ. ६.४७.२३ या मंत्रांत गर्गऋषीला दिवोदासाकडून दशाहिरण्यपिंड मिळाल्याचें लिहिलें आहे. या उल्लेखावरून त्या नाण्याला विशिष्ट आकार व निश्चित किंमत असल्याचें दिसून येतें. ' पिंड ' या शब्दावरून त्याची आकृति बहुधा गोलाकार असावी. छापाचें व बिनछापाचें असें दोन्ही प्रकारचें चलन एकाच काळीं अस्तित्वांत होतें यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. अगदीं अलीकडेहि असा प्रकार प्रचारांत होता असें आपणांस दिसून येतें. ' *

' निष्क ' म्हणजे काय ?

---

* S. K. Das—Economic History of Ancient India.

## लेखनकला

हिंदी लिप्यांचें मूळ

हिंदुस्थानांत हल्लीं प्रचलित असलेल्या सर्व लिपि ब्राह्मी आणि खरोष्ठी यांपासून निघालेल्या आहेत. खरोष्ठीपासून निघालेल्या लिपि वायव्यसरहद्द प्रांत व अफगाणिस्तान यांत चालू आहेत व ब्राह्मीपासून निघालेल्या सर्व हिंदुस्थानभर प्रचलित आहेत. खरोष्ठी ही उजवीकडून डावीकडे लिहीत असत व ब्राह्मी ही डावीकडून उजवीकडे लिहीत असत. पश्चिम आशियांत इ. पू. ५०० पासून प्रचलित असलेल्या अरेमिक लिपीपासून खरोष्ठी निघाली व हल्लीं अफगाणिस्तानांत चालू असलेल्या लिपीला जन्म देऊन इ. स. ४०० या काळांत ती आपोआप नष्ट झाली. खरोष्ठीची मूळ लिपि अरेमिक ही सेमेटिक लिपीपासून निघालेली होती. युरोपियन लिप्या फोनीशियन म्हणजे सेमेटिक लिपीपासून निघाल्या. ब्राह्मी लिपि ही मूळ हिंदुस्थानांतील नव्हे असें मत आजपर्यंत प्रचलित होतें. ब्राह्मी लिपि ही मूळ सेमेटिक लिपीपासून निघालेली आहे; इ. पू. ८०० या काळांत फोनीशियन व्यापाऱ्यांनीं मेसोपोटेमियाच्या मार्गें ब्राह्मी लिपि हिंदुस्थानांत आणली, असा सिद्धांत आतांपर्यंत ठाम झालेला होता. परंतु अर्वाचीन पुरातत्त्वशास्त्राच्या संशोधनानें ब्राह्मी लिपीच्या मूलासंबंधींचा हा सिद्धांत आतां मागें पडला आहे. मोहेंजो-दारो व हरप्पा येथील उत्खननांत द्राविडियन लोकांची जी प्राचीन लिपि सांपडली आहे, त्या लिपीचें दक्षिण हिंदुस्थान, इलम, सुमेरिया, ईजिप्त आणि क्रीट येथील लिपींशीं अतिशय साम्य आहे. याच लिपीपासून ब्राह्मी लिपि निघाली. द्राविडियन लोकांचा काल इ. पू. ३००० वर्षें हा आहे. आर्य हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांनीं लिपि शोधलेली नव्हती. पुढें द्राविडियन लोकांना त्यांनीं आपल्यांत सामील करून घेतल्यानंतर त्यांचीच लिपि त्यांनीं स्वीकारली.

मोहेंजो-दारोची लिपि व ब्राह्मी लिपि यांमधील दुवा

' मोहेंजो-दारो येथें सांपडलेली लिपि व ब्राह्मी लिपि यांच्या लेखनांत बरेच अंतर आहे. तेव्हां ब्राह्मी लिपि मोहेंजो-दारोच्या लिपीपासून उत्क्रांत झालेली आहे हें सिद्ध होण्याच्या दृष्टीनें या दोन लिपींना जोडणारा दुवा आतांपर्यंत सांपडलेला नव्हता. परंतु पं. लोचनप्रसाद पांडेय यांनीं शोधलेल्या एका शिलालेखानें ही उणीव भरून काढलेली आहे. बिहारमधील संबलपूर जिल्ह्यांतील विक्रमखोल या गांवीं एका गुहेंत

हा लेख सांपडलेला आहे. मोहेंजो–दारो येथील लिपि व ब्राह्मी लिपि यांच्या मधल्या कालांतील लिपींत हा लेख लिहिलेला आहे. बॅ. काशीप्रसाद जयस्वालऽ यांनीं या लेखाचा काल इ. पू. १९०० वर्षे हा ठरविला आहे. *

लेखनकलेचा उगम

हिंदुस्थानांत लेखनकलेचा उपयोग पाणिनीच्या कालांत करण्यांत येऊं लागला हें प्रो. मॅक्समुल्लर यांचें मत आतां ओघानेंच मागें पडलें. तथापि लेखनकलेचा उपयोग व्यवहारांत केव्हांपासून करण्यांत येऊं लागला हें निश्चित समजण्यास मार्ग नाहीं. लेखनकलेचें मूळ सांपडलें तरी तिचा उपयोग ऋग्वेदकाळीं करीत होते कीं नाहीं हें समजत नाहीं. ऋग्वेदावरूनच पहावयाचें झालें तर, त्यावेळीं तिचा उपयोग करीत होते असें वाटत नाहीं. कारण तशा प्रकारचें प्रमाण ऋग्वेदांत उपलब्ध नाहीं. वेदमंत्र हे गुरूकडूनच शिष्यानें घ्यावयाचे असल्यामुळें लेखनाचा उपयोग या बाबतींत करण्यांत आला नाहीं. हीच प्रवृत्ति दीर्घकालपर्यंत टिकल्यानें निदान धार्मिक वाङ्मयाचे बाबतींत तरी लेखनकलेचा उपयोग लौकर केला गेला नसावा. व्यवहारांत लेखनकलेचा प्रवेश केव्हांपासून झाला हें आज कोणीच सांगूं शकणार नाहीं.

## मनोरंजन

करमणुकीच्या साधनांपैकीं द्यूत हें साधारण लोकांत प्रचारांत होतें. ऋ. १०.३४ हें द्यूतसूक्त प्रसिद्ध आहे. द्यूतासक्त मनुष्याच्या मनोवृत्तीचें प्रदर्शन त्यांत उत्कृष्ट झालें आहे—

द्यूत

( १ ) मोठे, उताराच्या प्रदेशांत उत्पन्न होणारे, सरकणारे आणि खुळखुळणारे फांसे मला उन्मत्त करतात. जागरण करविणारा विभीदक वनस्पतीचा फांसा मूजवान् पर्वतावर उत्पन्न झालेल्या सोमाप्रमाणें मला अत्यंत आनंदित करतो.

( २ ) माझ्या पत्नीनें माझा कधींच धिक्कार केला नाहीं. ती माझ्यावर कधींच क्रुद्ध झाली नाहीं. उलट तिच्या मनांत माझ्याबद्दल व माझ्या मित्रांबद्दल कल्याणबुद्धि असे. अशी जरी ती गुणवती होती, तरी एक या आंकड्याला महत्त्व असलेल्या फांशांच्या नादानें मीं तिला घालवून दिलें.

ऽ Indian Antiquary, January 1933.

* A. K. Sur–Indian Historical Quarterly, June 1933.

( ३ ) माझी सासू माझा द्वेष करते. माझी बायको मला विचारीत नाहीं. धनाची याचना केली असतां मला कोणीच दाता भेटत नाहीं. म्हाताऱ्या- घोड्याप्रमाणें मला जुगाऱ्याला कोठूनहि सुखाची आशा नाहीं.

( ४ ) फांशांनीं खेळतांना पणाला लावलेलें द्रव्य जिंकणारे परके लोक याच्या बायकोचा हात धरतात. याचे भाऊ आणि आईबाप म्हणतात, 'आम्हीं याला ओळखीत नाहीं. याला बांधून घेऊन जा.'

( ५ ) आणि जरी मीं आपल्या मनाशीं निश्चय केला कीं, आतां यापुढें फांशांनीं खेळावयाचें नाहीं व मित्रांपासून दूर रहावयाचें, तरी देखील फांशांचा आवाज कानीं पडल्याबरोबर संकेतस्थानाकडे जाणाऱ्या व्यभिचारी स्त्रीप्रमाणें माझे पाय त्यांच्याकडे धांव घेतात.

( ६ ) सर्वांत श्रीमान् असलेल्या जुगाऱ्याला मी जिंकीन असें म्हणत हा सभेंत शिरतो. प्रतिस्पर्ध्याच्या उत्साहपूर्वक खेळण्यानें याची खेळण्याची उत्कंठा वाढत जाते.

( ७ ) टोंकें असलेले हे फांसे हरलेल्या जुगाऱ्याला संताप उत्पन्न करतात व त्याच्या कुटुंबाचा नाश करतात. जिंकणाऱ्या जुगाऱ्याला समृद्ध करतात. परंतु आशेच्या अतिरेकामुळें पुनः खेळणाऱ्या त्या जुगाऱ्याचें सर्वस्व हरण करून त्याचा नायनाट करतात.

( ८ ) नियमानें चालणाऱ्या सूर्याप्रमाणें त्रेपन्न फांशांचा संघ खेळत असतो. उग्र माणसाच्या रागालाहि ते जुमानत नाहींत. राजासुद्धां खेळतांना फांशांना नमस्कार करतो.

( ९ ) फांसे सारखे उताणे आणि पालथे होत असतात. त्यांना स्वतःला हात नसले तरी दुसऱ्यांच्या हातांना ते आपल्याकडे ओढून घेतात. फलका- वर टाकलेले फांसे कोळशाप्रमाणें आहेत. ते स्वतः शीत असले तरी दुस- ऱ्यांचीं अंतःकरणें जाळतात.

( १० ) जुगाऱ्याची विरही पत्नी एकटीच झुरत असते. आपला मुलगा कोठें भटकतो तें समजत नाहीं म्हणून त्याची आईसुद्धां शोक करीत असते. हा स्वतः कर्जबाजारी झाल्यामुळें भीत असतो. परधनाची इच्छा करीत तो हिंडतो व रात्रींचा परक्यांच्या घरांत पडून असतो.

( ११ ) दुसऱ्यांच्या बायका सुखानें नांदतांना पाहून व त्यांचीं सुंदर गृहें पाहून त्यांच्याशीं स्वतःच्या पत्नीची आणि गृहाची तुलना मनांत उभी

राहिल्यानें याला अतोनात दु:ख होतें. परंतु सकाळ उजाडतांच हा पुनः फांसे घेतो व रात्रीं घरांत आश्रय न मिळाल्यामुळें बाहेरच विस्तव पेटवून तेथें पडून रहातो.

( १२ ) हे फांशांनो, तुमच्या गणाचा जो मुख्य असेल त्याला मी नमस्कार करतों. आतां यापुढें जुगारामध्यें मी पैसा घालविणार नाहीं. मी माझ्या दहा अंगुलि उघडच्या करतों. मी खोटें सांगत नाहीं.

( १३ ) मला माननीय सवितृदेवतेनें आज्ञा केली आहे कीं, फांशांनीं जुगार खेळूं नको. शेती कर. संपत्तीचा उपभोग घे. त्यांतच तुला गाई व स्त्री यांची प्राप्ति होईल.

( १४ ) हे फांशांनों, तुम्हीं आमच्याशीं मैत्री करा. आम्हांला सुखी करा. आम्हांवर भयंकर आघात करूं नका. तुमचा राजा आमच्या शत्रूंवर जावो. आमचा शत्रु पिंगट वर्णाच्या तुमच्या बंधनांत तत्काळ पडो.

फांशांची संख्या ‘ त्रिपंचाशः ’ अशी सांगण्यांत आली आहे. प्रो. रोथ आणि ग्रासमान् यांचे मतें त्रेपन्न ही ती संख्या होय. प्रो. वेबर, झिमेर व लुड्विग् यांच्या मतानें पंधरा ही संख्या तेथें अभिप्रेत आहे. दीडशें हा त्या संख्येचा अर्थ आहे असें प्रो. ल्युडर्स म्हणतात. अगणित संख्या दाखविण्याकरितां तो शब्द योजलेला आहे असेंहि त्यांचें मत आहे.

फांसे खेळतांना फसवेगिरीचा उपयोग करण्यांत येई. धूर्त आणि कितव या शब्दांचा द्यूत खेळणारा असा अर्थ ऋग्वेदांत आहे. परंतु त्याच शब्दांना ठक असा अर्थ जो उत्तरकालीन वाङ्मयांत प्राप्त झाला, त्याचें कारण हेंच. चार फांशानीं खेळत असत असें दिसतें. कारण चारानीं भाग जाईल अशी संख्या येण्यासारखे फांसे टाकण्याची इच्छा एका कितवानें व्यक्त केली आहे ( ऋ. १.४१.९ ). विभीदक नांवाच्या वृक्षाच्या फळाचे फांसे केलेले असत.

शर्यती, शिकार, संगीत

रथांच्या शर्यती हें एक मनोरंजनाचें साधन असे. ( रथसंग–ऋ.९.५३.२). शर्यत गांठण्याच्या टोकाला ‘ काष्मन्’ असें नांव आहे ( ऋ. ९.३६.१, ७४.८). रथांच्या शर्यतीपासून दुहेरी कायदा होत असे. प्रेक्षकांची करमणूक होऊन शिवाय युद्धाकरितां लागणारें रथकौशल्य सहज रीतीनें साध्य होत असे. आर्यलोक शिकारीलाहि जात असत. धनुष्यबाण, पिंजरे

आणि जाळीं यांचा या कामीं ते उपयोग करीत असत. सिंहानां जाळ्यांत पकडीत असत. हरणानां खड्ड्यांत ( ऋष्यंद ) धरीत असत. डुक्कर पकडण्याकरितां कुत्रे सोडीत ( ऋ. ७.५५.४ ). रेड्यांना बाण मारण्यांत येत. हत्ती माणसाळविण्यास सुरुवात झाली असावी. पक्षी जाळ्यांत धरीत. लोक एकत्र जमले असतां नृत्येंहि होत असत. 'नृतू' असा शब्द ऋग्वेदांत आहे ( ऋ. ५.५२.१२, ६.६३.५, ८.९२.३ ). अलंकार घातलेल्या व अभिनय करणाऱ्या नर्तकीप्रमाणें उषा प्रकट होते असें ऋ. १.९२.४ या मंत्रांत म्हटलें आहे. हंसण्यानाचण्याचा उल्लेख ऋ. १०.१८.३ यांतहि आला आहे. नृत्याचे वेळीं झांज वाजवीत असत ( आघाटि–ऋ. १०.१४६.२ ). संगीत बरेंच प्रचारांत होतें आणि प्रगत झालेलें होतें. ऋग्वेदाची रचना छंदोबद्ध आहे, यांतच तत्कालीन आर्यांची गानप्रियता व्यक्त होते. सप्तस्वर माहीत नव्हते. कांहीं वाद्येंहि तयार करण्यांत आलीं होतीं. तंतुवाद्य, वायुवाद्य, व आघातवाद्य असे वाद्यांचे तीन प्रकार होते. दुंदुभि होते ( ऋ. १.२८.५, ६.४७.२९, ३१ ). वेणु वीणा आणि कर्करि ( २.४३.४ ) हींहि वाद्यें प्रचारांत होतीं. नाळी ( तुतारी ऋ. १०.१३५.७ ) व गर्गर ( ऋ. ८.६९.९ ) हीं वाद्यांचीं नांवें आहेत. गर्गर हें चर्मवाद्य होतें. प्रो. रोथ आणि बोथलिंक यांच्या मतें 'वाणीची' ( ऋ. ९.७९.४ ) हें एक वाद्य होतें व बकुर ( ऋ. १.११७.२१ ) हें युद्धाच्या वेळीं वाजविण्याचें वायुवाद्य होतें. 'वाण' हें एक तंतुवाद्य होतें ( ऋ. १०.३२.४ ).

सारांश

ऋग्वेदकालीन सामाजिक स्थिति आतांपर्यंत वर्णिल्याप्रमाणें होती. तत्कालीन इतर संस्कृतींकडे पाहतां वैदिक संस्कृतीचा हा उच्च दर्जा आर्यांना निःसंशय भूषणावह आहे. 'ऋग्वेदाचें खरें महत्त्व केवळ वाङ्मयेतिहासदृष्ट्या नाहीं. भाषाशास्त्र आणि संस्कृतीचा इतिहास यांच्या विद्यार्थ्याला भासणाऱ्या उणीवा पूर्णपणें भरून काढण्याचें काम ऋग्वेद करतो, यांत त्याचें खरें महत्त्व आहे. या बाबतींत जगांतील कोणतेंहि वाङ्मय त्याची बरोबरी करूं शकणार नाहीं. आणि या प्राचीनतम वाङ्मयीन अवशेषाचें काव्यदृष्ट्या महत्त्व जरी अतिशयोक्तिपूर्ण असें वर्णिलें गेलें असलें, तरी त्याचें ऐतिहासिक महत्त्व, आणि मानवजातीच्या इतिहासाच्या बाबतींत त्यामुळें होणारें साहाय्य हीं अद्वितीय आहेत.'*

---

* Adolf Kaegi–Rgveda p. 91

ऋग्वेदकालाचें ऐतिहासिक, धार्मिक व सांस्कृतिक दृष्ट्या वर्णन येथपावेत यथामति केलेलें आहे. आतां पुढील लहानशा विभागांत ऋग्वेदोत्त कालांतील फेरफारांचें थोडक्यांत दिग्दर्शन करून हा विषय संपविणें युक्त होईल.

---

# विभाग सहावा

# उपसंहार

## यजुर्वेदकाल

ऋग्वेदाचा उत्तरकाल आणि यजुर्वेदकाल यांच्यामध्यें थोडें अंतर आहे.

यजुर्वेदकाल

यजुर्वेदकालांत आर्यांची वसति पूर्वेकडे वाढून बंगालपर्यंत गेली होती. कुरुपांचालाचा प्रदेश हा संस्कृतीचें केंद्र होता. धर्माचें पौराणिक दृष्टया स्वरूप पालटलें नव्हतें. प्रजापतीला सर्वांत ज्यास्त महत्त्व आलें. विष्णुदेवतेचें महत्त्व ऋग्वेदकालाहून अधिक झालें. रुद्रदेवतेचें रूपांतर शिवदेवतेंत झालें द्राविडियनांची लिंगपूजा आर्यांमध्यें सार्वत्रिक झाली. कृष्ण यजुर्वेद व शुक्ल यजुर्वेद यांच्यामध्यें कालदृष्टया व संस्कृतिदृष्टया विशेष भेद नाहीं. तसेंच सामवेदाला या दोन्ही दृष्टींनीं स्वतंत्र अस्तित्व नाहीं. ऋग्वेदानंतर गायनाच्या दृष्टीनें सामवेदाची रचना करण्यांत आली. अप्सरांची संख्या यजुर्वेदांत वाढली. नागपूजा नवीन प्रचारांत आली. कांहीं नवीन संस्कार उत्पन्न करण्यांत आले व कांहीं धार्मिक कल्पनांत बदल झाला. धर्मदृष्टया मुख्य फरक म्हणजे देवता व यजमान यांच्या संबधांतील होय. ऋग्वेदकालांत देवतांची कृपा संपादन करण्याकरितां यज्ञ करण्यांत येई. यजुर्वेदांत यज्ञालाच जास्त महत्त्व मिळालें; त्याचें स्वरूप वाढलें. यज्ञांतील लहानसहान विधीसुद्धां बरोबर झाले पाहिजेत अशी समजूत झाली. यज्ञाच्या ठायीं अशा प्रचंड शक्तीची कल्पना केली गेली कीं यज्ञ करणाऱ्या पुरोहितांच्या इच्छेप्रमाणें देवांनीं वागलेंच पाहिजे. यांत्रिक पौरोहित्य ( Mechanical Sacerdotalism ) हा यजुर्वेदाचा धर्म होऊन बसला. शुक्लयजुर्वेदांत पुरुषमेध सांगितला आहे. परंतु मागें सांगितल्याप्रमाणें त्यांत मनुष्यांचा प्रत्यक्ष वध होत नसावा. ऋग्वेदकालाच्या उच्च संस्कृती-नंतर यजुर्वेदकालीन लोक रानटी पशुवृत्तीचें आचरण करीत असतील अशी कल्पना करवत नाहीं. पुरुषमेधाच्या वर्णनावरून यजुर्वेदकालीं उद्योगधंदे वाढल्याचें दिसून येतें. तथापि चातुर्वर्ण्य तीव्र झालें नव्हतें. अर्थात् उपजातींनांहि दृढ स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. ऐतिहासिक उल्लेख यजुर्वेदांत बरेच आले

आहेत. अनार्यांशीं आतां युद्धप्रसंग नसल्याकारणानें युद्धवृत्ति जवळजवळ लुप्त झाली. यज्ञप्रधान धर्मप्रवृत्ति हीच यजुर्वेदांत प्रामुख्यानें दृष्टीस पडते.

इतर विशेष

पुरुषमेधांत द्यावयाच्या बळीमध्यें जाराचा समावेश केलेला आहे. तेव्हां त्या शब्दाला या कालांत कदाचित् अनैतिक अर्थ प्राप्त झाला असणें शक्य आहे. ऋग्वेदकालांतील द्यूतांतील चार फांशांत आणखी एकाची भर पडली. सर्वत्र शांततेचें वातावरण असल्यामुळें व उद्योगधंदे वाढल्यामुळें विलासी वृत्तीला जास्त वाव मिळाला. त्याचबरोबर आर्थिक विषमताहि वाढूं लागली. वाजसनेयिसंहितेंत ( ९.२२ ) राज्याभिषेक समारंभाचें वर्णन विस्तृत रीतीनें आलें आहे.

## अथर्ववेदकाल

अथर्ववेदाचें स्वरूप

' ऋग्वेदांतील सूक्तांची सरमिसळ, प्राचीन देवतांचें स्वरूपांतर व त्यांचें अद्वैतवादांत पर्यवसान, विचित्र देवतांची उत्पत्ति, नरकस्थानाला अनुमति, अनेक देवतांऐवजीं सर्व देवतांचा आणि निसर्गाचा प्रतिनिधि अशी एक देवता, दुरुपयोगाकरितां तसेंच चांगल्या कारणाकरितां मंत्रतंत्र, ' जे माझा द्वेष करतात व मी ज्यांचा द्वेष करतों ' त्यांच्या नाशाकरितां मंत्र, संतति आणि दीर्घायुष्य मिळण्याकरितां, दुष्ट जादूटोण्याचा नाश करण्याकरितां व विष आणि रोग यांचें अपहरण करण्याकरितां मंत्रतंत्र, हुतावशेषाला देवत्व प्राप्त झाल्याकारणानें यज्ञयागाला मिळालेली मानाची पराकाष्ठा, सर्प, रोग, निद्रा, काल, तारे यांचीं सूक्तें, पुरोहिताच्या शत्रूंना अभिशाप, अशा प्रकारचें अथर्ववेदाचें सामान्य स्वरूप प्रथमदर्शनींच दिसतें. यांपैकीं नवीन भाग किती आहे ? '

' मंत्रतंत्र, जादूटोणा, निर्जीव वस्तूंचीं सूक्तें, अद्वैतवादाचीं चिन्हें, यांचा ऋग्वेदांत अभाव आहे असें नाहीं, परंतु अशा प्रकारचीं सूक्तें आणि त्यांचें ऋग्वेदाच्या सूक्तसंग्रहांतील स्थान यांवरून एकंदरींत मत असें बनतें कीं मूळ ग्रंथाची ही पुरवणी आहे. उलटपक्षीं अथर्ववेदांतील सूक्तें वाचून असें वाटतें कीं, ऋग्वेदांत जें गौण आहे तें अथर्ववेदांत प्रधान आहे. तथापि, अथर्ववेदांतील मंत्रतंत्रांचे प्रयोगच नव्हेत, तर तीं सूक्तें सुद्धां, अथर्ववेदाचें संहितीकरण होण्यापूर्वी बराच काळ अस्तित्वांत असलीं पाहिजेत आणि जरी अथर्ववेदाचें ऐतिहासिक स्थान ऋग्वेदानंतरचें आहे तरी, अथर्ववेदांतील

बराच भाग ऋग्वेदाइतका जुना असला पाहिजे, असें अनेकदां सिद्ध करण्यांत आलें आहे. मंत्रतंत्र इत्यादि धार्मिक विषय हलक्या दर्जाचा असल्यामुळें तो ऋग्वेदांतून मुद्दाम गाळण्यांत आला असेंहि सामान्यतः समजण्यांत येतें. '*

ऋग्वेद आणि अथर्ववेद यांचा संबंध

ऋग्वेद आणि अथर्ववेद यांच्या रचनेच्या मुळाशीं यज्ञयागाच्या विनियोगाचा हेतु नव्हता. यजुर्वेदाचा आणि सामवेदाचा संग्रह केवळ यज्ञाकरितांच करण्यांत आला. अथर्वसंग्रहाचा वेदांत समावेश उशीरां झाला याचें कारण त्याची रचना उशीरां झाली हें नव्हे, तर त्याचें अंतर्गतस्वरूप हें होय. शांति, आशीर्वाद, आणि अभिशाप हा अथर्ववेदाचा हेतु होय. अथर्ववेदांत सर्व देवांचें कार्य राक्षसांचें हनन करणें हें आहे. अथर्ववेदकालांत आर्यांचा विस्तार पूर्वेस बराच झाला होता. ऋग्वेदांत मगधदेशाचा उल्लेख कीकट या नांवानें आला आहे. अथर्ववेदांत (५.२२.१४) मगध हें नांव अंगदेशाबरोबर आलें आहे. बंगाल देशापर्यंत आर्य गेले होते. वाघाचा उल्लेख अथर्ववेदांत प्रथम आला आहे. उत्तर हिंदुस्थानांपैकीं फक्त बंगाल्यांतच वाघ होते. या कालांतील लोकांचा हत्तीशीं पूर्ण परिचय झाला होता. हस्तिनीचा स्पष्ट उल्लेख आला आहे (९.३.१७). दक्षिणेकडेहि आर्य सरकत चालले होते. न्यग्रोध (वड) वृक्षाचा उल्लेख अथर्ववेदांत येतो. पूर्व आणि पश्चिम समुद्रापर्यंत आर्य या कालांत गेले होते. दोन्ही समुद्रांचा उल्लेख आढळतो. रुपें आणि लोखंड यांचें स्पष्ट ज्ञान झालें होतें. माशांचा उल्लेख अथर्ववेदांत वारंवार आलेला आहे.

अथर्ववेदकालीन विशेष

शेतकीमध्यें सुधारणा झाली होती. नांगर मोठा आणि जड असा तयार करण्यांत आला होता (अथर्व. ३.१७). एका नांगराला चोवीस बैल जोडण्यांत येत. त्याचें टोंक तीक्ष्ण करण्यांत आलें असून धरण्याची मूठ मऊ करण्यांत आली होती. पाटबंधाऱ्याच्या पाण्याबरोबर खताचाहि उपयोग करण्यांत येई (३.१३). यव, गहूं, उडीद, धाना, तिळ आणखी इतर धान्यें काढण्यांत येत. तिळाचें तेल काढण्यांत येई.

भ्रातृव्याचा शत्रुत्वानें उल्लेख वारंवार आला आहे. विवाहसंस्कार बहुतेक

* Hopkins—Religions of India p. 151-2.

ऋग्वेदाप्रमाणेंच होता. विवाहानंतर पत्नी एका दगडावर उभी राहून ध्रुवताऱ्याकडे पहात म्हणत असे, ' हे ध्रुवा, जसा तूं आपल्या स्थानांत अढळ आहेस, तशीच मी आपल्या पतिकुलांत स्थिर राहों. ' सतीच्या चालीचा स्पष्ट उल्लेख अथर्ववेदांत आहे ( १८.३.१ ). तसेंच पुनर्विवाहालाहि परवानगी देण्यांत आली आहे प्रेतसंस्कार दहनाचा असे. अथर्ववेद हा आयुर्वेदाचा प्राचीनतम ग्रंथ आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं. अनेक प्रकारचे रोग व विषें व त्यांचीं निवारक औषधें यांचें वर्णन अथर्ववेदांत पुष्कळ आलें आहे.

## ब्राह्मणकाल

ब्राह्मणग्रंथांचें स्वरूप

यजुर्वेद आणि ब्राह्मणें यांच्या धर्मात फारसा फरक नाहीं. ब्राह्मणग्रंथांत देव तेच आहेत, परंतु त्यांचें जुनें स्वरूप पालटलें आहे. ब्राह्मणवर्गाला देवत्व प्राप्त झालें. ' असुर ' शब्दाचा चांगला अर्थ जाऊन दुष्ट राक्षस हा त्याचा अर्थ दृढ झाला. यज्ञयागांत पशुबलि अद्यापिहि देण्यांत येत असे व हुतावशेष भक्षण करण्यांत येई. अर्थात् मांसाहार प्रचलित होता. याज्ञिय विधींचें कथात्मक विवरण, इतिहासाचे त्रुटित भाग, तत्त्वज्ञानाचें स्पष्टीकरण व कांहीं असंबद्ध विषय यांनीं ब्राह्मणग्रंथ बनले आहेत. मध्यदेश हा संस्कृतीचें केंद्र बनला. यजुर्वेद आणि ब्राह्मणग्रंथ यांच्या केंद्रप्रदेशांत फारसा भेद नाहीं. ब्राह्मणकालांत आर्यांची वसाति पुष्कळ वाढली.

जातिभेद तीव्र झाला नव्हता

पुष्कळसे लोक पूर्व आणि दक्षिण या भागाकडे गेले. शतपथब्राह्मणांतील माठवविदेहाच्या कथेवरून त्याकालीं लोक सदानीरा नदी ( गंडकी ) ओलांडून पलीकडे विदेहांत गेले होते, असें दिसतें. पंजाबांत थोडे लोक राहिले. जे राहिले ते आपल्या जुन्या धर्मास चिकटून राहिले; परंतु पंजाब सोडून पुढें पूर्वेस विस्तारलेल्या लोकांच्या दृष्टीनें हे मागासलेले ठरले. मुख्य वसाति गंगायमुनांच्या तीरीं होती. व्रात्यस्तोमसंस्काराचा प्रारंभ येथें याच कालांत झाला. वेदांना प्राचीन रत्नभांडार समजण्यांत येऊन त्यांना अपौरुषेयत्व प्राप्त झालें. परलोकांतील पापपुण्याची व पुनर्जन्माची कल्पना दृढ झाली ( श. ब्रा. १.५.३.१४ ). वर्णभेद तीव्र झाले नव्हते असें कवश ऐलूषाच्या कथेवरून दिसून

येतें ( ऐ. ब्रा. ८.१ ). ऋषींनीं कवश ऐलूषाला यज्ञांत प्रवेश दिला नाहीं. तहानेनें व्याकुळ होऊन तो मरावा म्हणून त्याला त्यांनीं सरस्वतीच्या वाळवंटांत हांकलून दिलें. कवशानें चांगलें अध्ययन केलें होतें त्यानें एक सूक्त ( ऋ. १०.३०.१ ) म्हणून सरस्वतीला बोलावलें. देवतांची त्याच्यावर कृपा झाली हें जेव्हां ऋषींना समजलें, तेव्हां त्यांना आपल्या क्षुद्रत्वाची जाणीव झाली. ते त्याला शरण गेले व ऋषि ही पदवी त्यांनीं त्याला दिली. अशा प्रकारें जातिभेदांना अद्यापि तीव्र स्वरूप प्राप्त झालेलें नव्हतें. हलक्या जातींतील मनुष्यानें आपलें उच्च कर्तृत्व सिद्ध केलें असतां त्याला वरच्या जातींत सामील होतां येत असे. ऐतरेयब्राह्मणाचा कर्ता म्हणून मानल्या गेलेल्या महीदास ऐतरेयाच्या कथेवरून हेंच दिसून येतें.

स्त्रियांच्या चालीरीति

' सून सासऱ्याच्या समोर दिसत नसे ( ऐ. ब्रा. १२.११ ). सासरा आल्याबरोबर ती निघून जात असे. त्याच्या दृष्टीपासून दूर रहात असे. ही पद्धति आजपावेतों चालत आलेली आहे. स्त्रियांचा प्रमाणातीत विनय समाजाच्या सर्व अवस्थांत दिसून येतो. बहुपत्नीकत्वाची चाल या कालांतहि होती (ऐ.ब्रा. १२.१२,१९. १३ ); तथापि ऋग्वेदाप्रमाणें ती फक्त राजे आणि श्रीमंत लोक यांच्यापुरतीच अस्तित्वांत होती. नीतिमत्तेची इयत्ता उच्च होती, हें प्रजापतीच्या कथेवरून ( ऐ. ब्रा. १३.९ ) दिसून येतें; पत्नी आणि भगिनी यांच्या परस्परसंबंधाची कल्पना ऐ. ब्रा. १३.१३ वरून येते. विधवा भगिनीला फारसें महत्त्व नसे. पत्नी ही घरांतील सर्वाधिकारी होती व तिच्या हाताखालीं बहिणीला वागावें लागे. '

' सूर्य केव्हांहि उगवत नाहीं व मावळतहि नाहीं ( ऐ. ब्रा. १४.८ ) अशासारखे शास्त्रीय सिद्धांत ब्राह्मणग्रंथांत तुरळक आढळतात. समुद्र आणि समुद्रयान यांचे उल्लेख वारंवार येतात. समुद्रावर जाणाऱ्या नावांचा स्पष्ट उल्लेख ऐ. ब्रा. १७.७, ८ यामध्यें आला आहे. ' *

सामाजिक विशेष

' जमिनीवर वैयक्तिक मालकी होती. बाप जिवंत असतांनाच मुलांमध्यें मालमत्तेची वांटणी करण्यांत येई ( ऐ. ब्रा. ). शेतें व सबंध गांवें सुद्धां बक्षीस दिल्याचे उल्लेख आहेत.

---

* Ashutosh Vishwas – Society & culture in Brahmana period. Annals of the B. O. R. I. Vol. XIII 1931-32

राजा स्थानिक अधिकाऱ्यांमार्फत सत्ता चालावी. जनसमूहाच्या मुख्याला गांवचा पुढारी व्हावें लागे व सारावसुलीचें काम त्याच्यावर सोंपविलेलें असे. धान्यांपैकीं तांदूळ हे रानटी व गांवरान असे दोन्ही प्रकारचे उपयोगांत आणीत. शेतकऱ्याला शेतांत नेहमीं खपावें लागे. उंदीर पेरलेलें बीं खात असत, व पक्षी आणि इतर प्राणी झाडाचे कोंब खाऊन टाकीत. अतिवर्षण आणि अवर्षण या दोहोंनींहि पिकांचा नाश होई. दुष्काळ पडत असत. कांहीं गांवें दूधदुभत्याकरितां प्रसिद्ध होतीं. गाईंना दिवसांतून तीनदां चरावयास नेत व त्यांची योग्य काळजी घेत असें ऐतरेय ब्राह्मणांवरून दिसून येतें ( १.४.९.२ ). औद्योगिक जीवनांत पुष्कळ वाढ झाली होती. उद्योगांत अनेक विभाग पडले होते. कर्मकार ( लोहार ), कुलाल ( कुंभार ), गणक (ज्योतिषी), गोपाल, तक्षन् ( सुतार ), धैवर ( कोळी ), नापित ( न्हावी ), मलग ( धोबी ), वयितृ ( विणकरी ), सुराकार इत्यादि अनेक धंदेवाईकांचे उल्लेख आले आहेत. शुक्लयजुर्वेदांतच अनेक धंद्यांची वाढ झाली होती ( अध्याय १६ व २० ). विणण्याची कला वाढली होती. रंग देणें, नक्षीकाम, टोपल्या विणणें हीं कामें स्त्रिया करीत. स्त्रिया डोक्यावर कांहींतरी वस्त्र वापरीत असत ( ऐ. ब्रा. ६.१ ). शतपथब्राह्मणांत इंद्रपत्नीनें डोक्यावर वस्त्र घेतल्याचा उल्लेख आहे. धातूंचें ज्ञान वाढलें. शुक्लयजुर्वेदांत (१८.१०) सहा धातु सांगितल्या आहेत. वैयक्तिक आणि सामुदायिक हित साधण्याकरितां कामकऱ्यांचे संघ स्थापन झाले होते असें प्रो. रोथ व गेल्डनेर यांचें मत आहे. कांहीं विद्वानांचा या मताला विरोध आहे. कारागिरांना विशेष हक्क होते. यज्ञाच्या वेदि, पाटबंधारे व सार्वजनिक इमारती बांधणाऱ्या कारागीरांना विशेष दर्जा होता. शेतीची लागवड व व्यापार हीं कामें आर्य स्वतः करीत नव्हते; दासांकडून तीं करवीत. समाजाच्या प्राथमिक अवस्थेतील मनुष्ययज्ञाचे जागीं अश्वमेध, त्याचे ठिकाणीं इतर प्राण्यांचा बलि व तदनंतर धान्यादिकांच्या आहुति असें यज्ञाचें कालदृष्ट्या प्रगतिपर स्वरूप ऐतरेय ब्राह्मणांत मान्य केलेलें आहे. वस्तूच्या किंमतीबद्दल होत असलेली घासाघीस या कालांतहि दिसून येते. एक पुरोहित यजमानाकरितां सोम विकत घेण्यास गेला असतां पांच वेळां विचारीपर्यंत सोमाची किंमत निश्चित झाली नाहीं ( श. ब्रा. ३.३.३.१–४). ‘ शातमान ’ नांवाचें एक सोन्याचें नवीन नाणें या कालीं प्रचारांत होतें. ( श. ब्रा. ) तैत्तिरीय संहितेंतहि तें उल्लेखित आहे यावरून

त्या कालांताहि तें प्रचलित असावें. ‘ शातमान ’ म्हणजे शंभर मान होत. ‘मान’ म्हणजे गुंज असें सायणाचार्य म्हणतात. प्रो. एग्‌लिंग यांनींहि तें मत स्वीकारलें आहे. ‘ सुपर्ण ’ नांवाचेंहि एक सुवर्णनाणें शतपथब्राह्मणांत व तैत्तिरीय ब्राह्मणांत आढळतें. तैत्तिरीय ब्राह्मणांतील हा उतारा तैत्तिरीय संहितेंतहि आहे. यावरून शातमान व सुपर्ण हीं नाणीं तैत्तिरीय -संहिताकाळींहि प्रचारांत असावींत. शतपथब्राह्मणाच्या शेवटच्या कांडांत ‘पाद ’ नांवाच्या नाण्याचाहि उल्लेख आला आहे. जनक राजानें यज्ञामध्यें एक हजार गाईंच्या शिंगांना प्रत्येकीं दहा असे पाद बांधविले व ब्राह्मणांपैकीं जो श्रेष्ठतम असेल त्यानें या गाई घेऊन जाव्यात असें सांगितलें. प्रो. रोथ, बोथलिंक आणि ऱ्हाइस डेव्हिड्‌स् यांच्या मतानें पाद म्हणजे विशिष्ट वजनाच्या सोन्याच्या तुकड्याचा चौथा हिस्सा होय. परंतु यावरून अशी कल्पना करावयाची काय, कीं यज्ञ चालू असतां, ब्राह्मणांची परीक्षा पाहण्याची कल्पना जनक राजाला सुचली व त्यानें त्याच क्षणीं सोन्याचे सारख्या वजनाचे वीस हजार तुकडे तयार करून घेतले? ही कल्पना हास्यास्पद आहे. उलटपक्षीं पाद या नाण्याचा उल्लेख पाणिनीनें आपल्या सूत्रांत केला आहे ( ५.१.३४ ). ‘पाद’ या शब्दाचा नाणें असा अर्थ घेतला तरच जनक राजाला कोणत्याहि वेळीं आपल्या खजिन्यांतून वीस हजार पाद काढून आणून गाईच्या शिंगांना बांधविणें शक्य होतें. ’

‘ कृष्णाल या नाण्याचाहि उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणांत आला आहे ( १.३.६.७ ). तांबडी गुंज असा कृष्णाल या शब्दाचा अर्थ आहे. यावरून कृष्णाल म्हणजे तांबड्या गुंजेच्या वजनाइतक्या सोन्याचें नाणें असावें. काठकसंहितेंत ( ११.४ ) हिरण्यकृष्णाल असा प्रयोग आला आहे. मनुस्मृतींतहि कृष्णाल हें नाणें आहे. या कालांतील संपत्ति सोनें, रुपें, रत्नें, तांबें, लोखंड, शिसें, कथील, रथ, गाड्या, घोडे, गाई, गुलाम, घरें आणि सुपीक जमिनी, अशा स्वरूपांत होती. राजे लोकांनीं ब्राह्मणांना दिलेल्या दक्षिणांवरून त्या काळच्या प्रचंड संपत्तीची कल्पना करतां येते.’ †

## सूत्रकाल

ब्राह्मणकालानंतरचा ठळक कालविभाग म्हणजे सूत्रकाल होय. या दोन

---

† S. K. Das—Economic History of Ancient India.

संस्कृतीची अधोगति

कालांत फार अंतर आहे. सूत्रकालांत आर्यांची वसति बहुतेक उत्तरहिंदुस्थान व्यापून राहिली होती. तथापि आर्यावर्ताचे शेवटचे भाग म्हणजे सिंधु, सौवीर, सुराष्ट्र, अवन्ती, दाक्षिणापथ, अंग व मगध या देशांत संकीर्णयोनि लोक रहात होते व त्यामुळें या प्रदेशांच्या बाह्य मर्यादांमध्यें प्रवेश केल्यास शुद्ध होण्याकरितां प्रायश्चित घ्यावें लागत असे. सूत्रकालांत आचारधर्माची रचना दृढ झाली. विवाहसंस्कारांत फारसा फरक झाला नाहीं. विवाहाचे सहा प्रकार होते. बालविवाह रूढ झाले. स्त्रियांचा दर्जा कमी समजण्यांत येऊं लागला. वेदाध्ययनादि गोष्टी स्त्रियांना बंद झाल्या. स्त्री ही पुरुषाची केवळ परिचारिका बनली. विवाह केलाच पाहिजे असें बंधन स्त्रियांवर आलें. आंतरजातीय विवाह मान्य होते, परंतु खालच्या जातीच्या पुरुषाला वरच्या जातीच्या स्त्रीशीं विवाह करण्यास बंदी होती. चातुर्वर्ण्य व उपजाति यांचीं बंधनें दृढ झालीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे संस्कृत भाषेच्या अर्वाचीन स्वरूपाच्या कालविभागांतील धार्मिक व सांस्कृतिक परिस्थितीचें बीजारोपण सूत्रकालांत झालें.



# सूची

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | ८ | येतां | येत. |
| ११ | ११ | चत्वारिंश्य | चत्वारिंश्यां |
| ३३ | १२ | आधुनिका | आधुनिक |
| ३९ | १२ | ताट | ताठ |
| ५६ | १३ | अभि | अपि |
| ७७ | १९ | Hydraostes | Hydraotes |
| ८६ | ८ | भरताच्या | भरतांच्या |
| ११९ | ७ | श्नि | पृश्नि |
| १२५ | २० | देशमानपद्धति | दशमानपद्धति |
| १२८ | ७ | आचारण्यांत | आचरण्यांत |
| १३१ | १४ | शक्तीचा | शक्तीची |
| १३६ | २७ | ल | पूल |

# वाचलेले किंवा उपयोजिलेले ग्रंथ

## ( Works Read or Consulted )


( १ ) ऋग्वेद-संहिता ( सायणभाष्यासहित ).

( २ ) महाराष्ट्रीय ज्ञानकोश-१ वेदविद्या, २ बुद्धपूर्वजगत्.

( ३ ) हिंदी-सुमेरी संस्कृती—दा. ना. आपटे.

( ४ ) 'गंगा' मासिक-वेदांक ( हिंदी ).

( ५ ) 'गंगा' मासिक-पुरातत्त्वांक ( हिंदी ).

( 6 ) History of Sanskrit Literature-Max Muller.

( 7 ) " " " " - Weber.

( 8 ) " " " " - Macdonell.

( 9 ) " " " " - Winternitz.

( 10 ) " " " " - C. V. Vaidya.

( 11 ) Vedic India-Z. A. Ragozin.

( 12 ) Ancient India-E. J. Rapson.

( 13 ) Antiquities of India—L. D. Barnett.

( 14 ) Ancient & Medieval India-Mrs. Manning.

( 15 ) Pre-Historic India-Panchanana Mitra.

( 16 ) History of India-R. C. Dutt.

( 17 ) History of India-V. S. Dalal.

( 18 ) Cambridge History of India.

( 19 ) History of the religion of Hindus-Dhirendranath Pal.

( 20 ) Religions of India-E. W. Hopkins.

( 21 ) Vicissitudes of Aryan Civilization-M. M. Kunte.

( 22 ) Arctic Home in The Vedas-B. G. Tilak.

( 23 ) Orion-B. G. Tilak.

( 24 ) Comparative grammar of Dravidian Languages-Caldwell.

( 25 ) Ruling races of Pre-Historic Times-J. F. Hewitt.

( 26 ) Evolution of Aryan-Ihering.

( 27 ) Origin of the Aryans-I. Taylor.

( 28 ) Indo-Aryan Mythology-Narayana Iyangar.

( 29 ) Vedic Fathers of Geology-N. B. Pawgi.

( 30 ) Aryavartic Home and the Cradle of Humanity-N. B. Pawgi.

( 31 ) Civilizations of Eastern Iranians-W. Geiger.
( 32 ) Original Sanskrit Texts Vols. V-J. Muir.
( 33 ) Ashutosha Commemorative Vol. -Calcutta University
( 34 ) Bhandarkar Commemorative Vol.-B. O. R. I., Poona.
( 35 ) Carmichael Lectures-D. R. Bhandarkar.
( 36 ) Art of war in Ancient India-G. T. Date.
( 37 ) Science of Language-Max Muller.
( 38 ) Biographies of words and Home of the Aryans-Max Muller.
( 39 ) Chips from a German Workshop-Max Muller.
( 40 ) Teachings of the Vedas-Maurice Phillips.
( 41 ) Oriental and Linguistic Studies-W. D. Whitney.
( 42 ) The Home of the Indo-Europeans-H. H. Bender.
( 43 ) Zend Avesta S. B. E.-Darmesteter.
/ 44 ) Essys on Parsees-Marthin Haug.
( 45 ) Steps to Prophet Zoroaster-Pithawala.
( 46 ) Mazdaism in the light of Vishnuism-A. Govindacharya Swamin.
( 47 ) Collected essays of Pandit A Mahadeo Shastri.
( 48 ) Cosmology of Rgveda-H. W. Waliis.
( 49 ) Rgvedic India-A. C. Das.
( 50 ) Rgvedic Culture-A. C. Das.
( 51 ) Vedic Mythology-A. A. Macdonell.
( 52 ) Vedic Index of Names and Subjects-Macdonell Keith.
( 53 ) Vedic Gods-V. G. Rele.
( 54 ) Religion of the Veda-M. Bloomfield.
( 55 ) Dravidian Elements in Indian Culture-G. Slater.
( 56 ) Indus Valley Civilization-Sir John Marshall.
( 57 ) Pre-Aryan and Pre-Dravidian India-P. C. Bagchi.
( 58 ) Chronology of Ancient India-S. N. Pradhan.
( 59 ) Economic History of Ancient India-S. K. Das.
( 60 ) Economic Conditions of Ancient India-J. N. Samaddar.
( 61 ) Economic Life and Progress in Ancient India-Narayan chandra Bandyopadhyaya.
( १ ) हिंदी प्राच्यविद्या-परिषदांचे वृत्तांत.
( २ ) प्राच्यविद्याविषयक नियतकालिकें.